# माझा चित्रपट

व

# काशीचा संपूर्ण इतिहास

लेखक



**पं. भाऊशास्त्री वझे**

ब्रह्मघांट काशी.

**किंमत एक रुपया**

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# प्रकाशकाचे दोन शब्द

ह्या पुस्तकाचें प्रकाशकत्व मजकडेच आल्यामुळें मी दोन शब्द लिहिण्याचें ठरविलें आहे. या प्राप्तसंधीबद्दल पं. भाऊशास्त्री यांचे प्रथम आभार मानतों.

एका जुन्या पठडींत शिकून तयार झालेल्या पिढीजात शास्त्रीबोवांनीं 'आत्मचरित्र' लिहिणें हें कोणासही आश्चर्यकारक वाटण्याजोगें आहे. कारण असल्या लिखाणाचा प्रचार अजून आधुनिक विद्वानांतच फारसा झालेला दिसून येत नाहीं. शास्त्री म्हटला म्हणजे ठरीव सांचाच्या जुनाट कल्पना बोलून दाखविणारा फोनोग्राफच असावयाचा. अर्थबोध न झाला तरी बिनचूक श्रुतिस्मृतिग्रंथ साद्यंत मुखोद्गत म्हणणारा आणि अक्षरशत्रु असल्यामुळें लिहिणेंवाचणें तर त्याचे गांवींही नसावयाचें, त्याचें नेहमीच घटपटादि तर्कट चालावयाचें, अशा प्रकारच्या समजुती आधुनिक शिक्षणाच्या टांकसाळींतून बाहेर पडलेल्या विद्वान म्हणून गणल्या गेलेल्या लोकांच्या झालेल्या दिसून येतात.

ह्या समजुतींचा भ्रमनिरास वे. शा. सं. भाऊशास्त्री वझे काशीकर ह्यांनीं लिहिलेल्या आपल्या आत्मचरित्रानें खास झाल्याशिवाय राहणार नाहीं. आधुनिक पद्धतींतही शास्त्रीमंडळी लिहूंबोलूं शकतात हें प्रत्यक्ष कृतीनेंच लोकांपुढें आलेलें आहे.

आत्मचरित्राबरोबरच शास्त्रीबोवांनीं काशीचा इतिहासही लिहिला आहे. हा इतिहास वाचून पाहिला म्हणजे संशोधनपूर्वक आणि साधार वृत्त लिहिण्यांत शास्त्रीबोवांची विद्वत्ता, सूक्ष्म चिकित्सक बुद्धि, त्यांचें वैदिक, पौराणिक व इंग्रजी, हिंदी आणि मराठी ग्रंथांचें वाचन चांगलेंच दिसून येतें. काशीसंबंधी किंवा तेथील इतर गोष्टींसंबंधी आजपर्यंत इतरत्र प्रसिद्ध झालेली माहिती आणि त्याच बद्दल शास्त्रीबोवांनीं प्रसिद्ध केलेली माहिती ताडून पाहतां ती कशी साधार आणि ऐतिहासिक सत्यास धरून आहे आणि त्यांचा अभ्यास आधुनिक प्राध्यापकांपेक्षांही किती अधिक सखोल आहे हें ध्यानांत येतें. याचें उदाहरण जगन्नाथपंडितांच्या चरित्रावर त्यांनीं अगदींच नवीन पाडलेला प्रकाश हें होय.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

शास्त्रीबोवांनीं हा इतिहास लिहिण्याचें ठरवून त्याप्रमाणें त्याची क्रमवार योजना मनांत आंखून ठेविली होती. शास्त्रीबोवांना टांचणें वगैरे लिहून ठेवण्याची संवय नाहीं. त्यांचीं टाचणें म्हणजे त्यांचे डोक्यांतच. त्यावरून त्यांनीं हस्तलिखितें दोनतीन दिवसांत भराभर लिहून तयारही केलीं. पण जेव्हां तीं मराठींत प्रसिद्ध झालेल्या इतर उपलब्ध माहितीशीं पडताळून पाहिलीं, तेव्हां त्यांस घोटाळ्यांत पडल्यासारखें होऊन आपण चुकतों कीं काय असें वाटूं लागलें. त्यांनीं काशीसंबंधी माहिती असलेले ग्रंथ मिळवून ते वाचून काढले. तेव्हां त्यांत कित्येक ठिकाणीं विपर्यस्त, चुकीची व अनुमानधक्क्याची माहिती लिहिली गेली आहे असें त्यांच्या लक्षांत आलें. म्हणून त्याकरितां अधिक संशोधन चालवून वेदांपासून तों प्रचलित काळापर्यंतच्या ग्रंथांतून साधार माहिती जमविली. त्यांत विशेष कौतुकाची गोष्ट म्हणजे त्यांनीं पूर्वींच निश्चित केलेलीं अनुमानें अगदीं तंतोतंत साधार ठरलीं. ही गोष्ट खरोखरीच त्यांस अभिमानास्पद आहे. एका शास्त्रीबोवांची मति ही इतिहासासारख्या विषयांत सुद्धां कशी अनिरुद्ध संचार करूं शकते हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

शास्त्रीबोवा उत्तम प्रवचनकार आहेत हें मशहूर आहे. पण त्यांनीं आजपर्यंत पत्रलेखनापलीकडे कांहीं लिखाण केलें असेल असें वाटत नाहीं. नागपूर येथें योगावर एक पुस्तक छापलें आहे पण तें प्रवचनाचें सार आहे. स्वतंत्र लिखाण झालेलें नाहीं. ह्या दृष्टीनें शास्त्रीबोवांनीं संशोधनात्मक ऐतिहासिक सत्यें एखाद्या कसलेल्या इतिहासलेखकास शोभतील अशीं संगतवार नी साधार लिहून काढलीं. ही साहित्यांतील त्यांची स्वतंत्र आणि पहिलीच निर्मिति आहे, असें पाहिलें म्हणजे त्यांच्या कुशाग्र बुद्धीची तारीफ करावी तेवढी थोडीच होईल.

छापखान्याच्या नात्यानें शास्त्रीबोवांशीं या कामीं माझा विशेष संबंध आल्यामुळें त्यांची योग्यता केवढी मोठी आहे व विशेषेंकरून त्यांची चिकाटी,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अभ्यास, हातीं घेतलेल्या कामाबद्दल त्यांस रात्रंदिवस लागून राहिलेली तळमळ, निरभिमानवृत्तीनें ज्ञान मिळविण्याची त्यांची हौस ही एखाद्या तरुण विद्यार्थ्यासही लाजवील अशी आहे हें मला कळून आलें.

लोकांचें शैथिल्य घालवावें, त्यांस कार्यप्रवृत्त करावें, त्यांची उद्बोधन शक्ति जाग्रत करून त्यांस विचारशील करावें, त्यांच्यांतील धर्माचे नांवाखालील अंधश्रद्धा काढून टाकावी, गतानुगतिकत्व सोडावयास लावून तत्त्वनिष्ठ शास्त्रानुयायी करावें ही शास्त्रीबोवांची तळमळ त्यांच्या सहवासांत गेलें असतां तावडतोब लक्षांत आल्याबांचून रहात नाहीं. त्यांच्या प्रवचनांत कित्येक वेळां असह्य टीकांचे तडाखे ह्यामुळेंच होत असतात. त्यांचें लक्ष्य लोकजागृति करणें हें आहे. त्यांचें लिखाण किंवा प्रवचनें, वेदांतपर, भक्तिपर किंवा ऐतिहासिकपर कशींहि असोत त्यांत तत्त्वाकडे दृष्टि ठेवून लोकशिक्षणानें कार्यप्रवृत्ति उत्पन्न व्हावी ही इच्छा दिसून येते. त्यांचा महाराष्ट्रीय म्हणून स्वाभिमान जाज्वल्य आहे. शास्त्रीबोवा आणि रायफल क्लबचे मेंबर, शास्त्रीबोवा आणि राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे चहाते, शास्त्रीबोवा आणि धर्माकरितां पदवीत्याग, शास्त्रीबोवा आणि निस्पृहता व निर्भीडपणा, शास्त्रीबोवा आणि 'जें जें आपणांस ठावें तें तें हळू हळू दुसऱ्यास शिकवावें,' असें त्यांचें प्रवचनाचें व्यसन, यांतच माझ्या मतें शास्त्रीबोवांचें खरें चरित्र आहे.

चरित्र वाचण्यापेक्षां चरित्र प्रत्यक्ष पाहण्यांत स्वारस्य अधिक आहे. कारण त्यांतच खरें चारित्र्य दिसून येत असतें. म्हणून शास्त्रीबोवांच्या चरित्रांत त्यांच्याशीं संबंध आलेल्या त्यांच्या स्नेही, सोबती, श्रोते, शिष्य वगैरे मंडळींस, त्यांनीं प्रत्यक्ष पाहिलेलें व अनुभविलेलें त्यांचें चारित्र्य लिहून पाठवावें म्हणून मी मुद्दाम त्यांस पत्रें लिहून विनंति केली. अपेक्षित वेळेवर ज्यांच्याकडून उत्तरें आली त्यांचीं पत्रें परिशिष्टांत छापिलीं आहेत. परंतु ज्यांच्याकडून उत्तरें उशीरां आलीं त्यांचीं पत्रें तेथें छापतां आलीं नाहींत तथापि तीं येथें देतों.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

लोकनायक श्री. **माधव श्रीहरि अणे**, मु. यवतमाळ ह्यांचें पत्र.

आपलें पत्र पोहोंचलें. आपण वे. शा. सं. भाऊशास्त्री वझे यांच्या चरित्राचें प्रकाशन करीत आहांत हें वाचून आनंद झाला. वे. शा. सं. भाऊशास्त्री वझे यांना त्यांचे पांडित्याचा व धर्मपरायणतेचा गौरव करावा म्हणून सरकारतर्फे 'महामहोपाध्याय' ही बहुमानाची पदवी समर्पण करण्यांत आली होती. परंतु शारदा बिल पास झालेवर धार्मिक विषींत हस्तक्षेप करणाऱ्या सरकारकडून मिळालेल्या पदवीचा त्यांनीं तत्काळ त्याग केला. त्यांनीं हा पदवीत्याग करूं नये असें त्यांच्या कित्येक हितचिंतकांनीं सुचविलें. परंतु त्यांनीं त्यांना मोठ्या बाणेदारपणाचीं उत्तरें देऊन आपला निश्चय कायम केला व ताबडतोब तडीस नेला. प्राचीन पंडितांतही अजून स्वाभिमान व स्वधर्माभिमान कसा जाज्वल्यतेनें जागृत असतो ही गोष्ट सर्व हिंदुस्थानच्या निदर्शनास भाऊशास्त्री यांच्या या करारी वर्तनावरून आली. त्यांच्यासारखे पंडित प्रायः दुर्लभ होत आहेत. याबद्दल कोणत्या संस्कृत्यभिमानी हिंदूस हळहळ वाटणार नाहीं !

ह. भ. प. श्री. **लक्ष्मण रामचंद्र पांगारकर**, मु. नाशिक ह्यांचें पत्र.

आपलें पत्र पावलें. वे. शा. सं. भाऊशास्त्री वझे यांचें चरित्र आपण छापीत आहां हें ऐकून समाधान वाटलें.

त्यांच्या चरित्रांत नव्याजुन्या विद्वानांनीं घेण्यायोग्य पुष्कळ गुण आहेत. त्यांची विद्वत्ता, वक्तृत्व, प्रत्युत्पन्नमतित्व, त्यागीपणा, साधेपणा, मोकळेपणा इ. गुण मोठे वाखाणण्यासारखे आहेत. महामहोपाध्याय या महनीय पदवीचा त्यांनीं त्याग केला. त्या प्रसंगीं त्यांची धर्मनिष्ठा, देशभक्ति व निःस्पृहता दिसून आली. त्यांचीं बरींच प्रवचनें मीं ऐकलीं आहेत. त्या प्रसंगीं बुद्धीची कुशाग्रता, दृढाभ्यास व स्मरणशक्ति या गुणांचें मला कौतुक वाटलें. भाऊशास्त्री हे कट्टर सनातनी आहेत व प्रतिपक्षाशीं शौर्यानें झगडण्यांत वाकबगार आहेत. हे महाराष्ट्र समाजास भूषण आहेत. कळावें, लोभ असावा.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

श्री. रामचंद्र सदाशिव आठवले, नाशिक, माजी दिवाण सांगली ह्यांचें पत्र.

वे. शा. सं. भाऊशास्त्री वझे यांचे चरित्रासंबंधानें माझ्या आठवणी व विचार मजकडून मागविलेत त्याबद्दल मी आपला फार आभारी आहें.

मी सातारा जिल्ह्यांत नोकरीस असतांना मला त्यांच्या परिचयाचा लाभ प्रथम सुमारें १९१५ ते १९२० चे दरम्यान झाला. मजबरोबर ते फिरतीवर ५–६ दिवस कऱ्हाड–मालखेड वगैरे बाजूस होते. आणि सातारा येथें महिना पंधरा दिवस त्यांचे निकट सहवासाचाही लाभ मला झाला. श्रीक्षेत्र काशी येथें पूर्वी असलेले श्री. प. प. शांताश्रमस्वामी यांचा व शास्त्रीबोवा यांचा निकट सहवास होता. ते ह्यावेळीं कऱ्हाड येथें होते. त्यांचे भेटीचा लाभ व आनंद मला शास्त्रीबुवांचे मुळेंच मिळाला असें म्हणावयास हरकत नाहीं. खुद्द सातारा येथें शास्त्रीबुवांनीं श्रीशंकराचार्यांचा ग्रंथ " सदाचार " मंडळीस समजावून सांगितला व शिवाय त्यांचीं भक्तिरसानें ओथंबलेली प्रवचनें सातान्यास मला ऐकण्यास मिळालीं व माझे मनात त्यांचेबद्दल अत्यंत आदरभाव व पूज्यबुद्धि उत्पन्न झाली. माझा अधिकार कांहींच नसल्यानें मला त्यांचेपासून शक्य तेवढा सर्व लाभ घेतां आला नाहीं हें माझें खरोखर दुर्दैव होय. परंतु त्यांची अगाध विद्वत्ता व तिजबरोबरच त्यांचा अत्यंत विनयशील स्वभाव, भिडस्तपणा व परमेश्वरावर अत्यंत गाढ अशी निष्ठा यांचा माझे मनावर अत्यंत अनुकूल परिणाम झाला हें खरें. मी सांगलीस असतांना श्रीमंत राजेसाहेब व श्री. स. सौ. राणीसाहेब व इतर मंडळींनाहि त्यांचे प्रवचनांचा लाभ मिळून त्यांना अशीच प्रेमाची मेजवानी मिळाली. पुढें नाशिक–नागपूर या ठिकाणींही त्यांचे भेटीचा लाभ वारंवार झालेला आहे व त्यांना केलेल्या विनंतीचा अव्हेर त्यांनीं न करतां सर्वदा मानच देऊन आम्हांस उपकृत केलें आहे. पूर्णश्रद्धायुक्त असलेले वेदांत व न्यायघटित असें त्यांचें हृदय असल्यानें जाणत्या भाविक श्रोत्यांवर फारच अनुकूल परिणाम होतो, हें कळविण्यास फार आनंद वाटतो. क. लोभ अ. हे विनंति.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ह्या वरील पत्रांतून वर्णन केलेल्या शास्त्रीबोवांच्या चरित्राबरोबरच त्यांचें एखाद प्रवचन देतां आलें असतें तर त्यांच्या विद्वत्तेची, विषय सुबोध मांडण्याची चुणूक कळून आली असती. परंतु ग्रंथविस्तार दुप्पट वाढल्यामुळें तो विचार मागें सारणें भाग पडलें. येथील कांहीं सद्‌गृहस्थ त्यांचीं प्रवचनें छापून काढण्याच्या विचारांत आहेत असें कळतें. तसें घडून आल्यास ही उणीव आपोआपच भरून निघेल.

नुकताच घडून आलेला एक प्रसंग लिहिण्याचा मोह आवरत नाहीं तो प्रसंग असा.

येथें नुकताच न्यू इंग्लिश स्कूलचा हीरकोत्सव झाला. त्या प्रसंगीं सर राधाकृष्णन् यांचें भाषण झालें. भाषणांत स्वाभाविकच शिक्षण, शिक्षक, त्यांची ध्येयें वगैरेवर त्यांनीं आपले अधिकारयुक्त विचार प्रकट केले, याच विषयासंबंधी मुरलीधराचे देवळांत प्रवचनें चालू असतां ओघांत विषय आला म्हणून शास्त्रीबोवांनीं आपले विचार अगदीं तंतोतंत असेच मांडले होते. ही गोष्ट दोघांचींही प्रवचनें ऐकलीं असल्यामुळें तेव्हांच ध्यानांत आली आणि खात्री पटली कीं, तत्त्वनिष्ठ पुरुष मग ते सनातनी असोत वा आधुनिक शिक्षित असोत स्वतंत्र रीतीनें जरी विचार करूं लागले तरी एकच निष्कर्ष काढतात कीं, अध्यात्माशिवाय शिक्षणाचीं अंतिम साध्यें बिनचूक असणार नाहींत.

ह्या पुस्तकाचे प्रकाशनांत अनेकांची मदत हरतऱ्हेनें झाली आहे. ज्या त्यांच्या स्नेही मंडळींनीं माझे विनंतीस मान देऊन आपले अनुभव पाठविले त्यांचेही आभार मानणें क्रमप्राप्तच आहे. श्री. गणपतराव मोघे ह्यांनीं शास्त्रीबोवांचा एक व त्यांच्या कुटुंबांचे दोन असे तीन ब्लॉक्स हौसेनें करून दिले आणि श्री. गोविंदराव चांदेकर ह्यांनीं चित्र काढून दिलें. त्याबद्दल त्या दोघांचे आणि त्याचप्रमाणें प्रुफें तपासण्याचे कामीं श्री. गानू ह्यांनीं जी मदत केली त्याबद्दल त्यांचे आभार मानतों.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ता. १४-१-४०

प्रकाशक

# थोडी प्रस्तावना व उपकृतिस्मरण

**ग्रंथस्यांशत्रयं चास्य किं केन कथमुच्यते ॥**

**स्मृतिश्चोपकृतेः सम्यक् क्रियते सहकारिणाम् ॥**

नागपुरांत आजारीपणांतच मी लिहिलेलें माझें चरित्र पुण्यांत आल्यावर छापून प्रसिद्ध करावें असें मला वाटलें. म्हणून पुन्हां तें नीट लक्ष लावून वाचलें. तेव्हां तें शिराशिवाय असलेल्या शरीराप्रमाणें निर्जीव व अपुरें वाटूं लागलें. ज्या श्रीक्षेत्र काशीच्या कुशींत माझ्या तीन पिढ्यांचें संगोपन झालें व ज्या काशींत मी जन्मलों, वाढलों, शिकलों व जगांत नांवारूपाला आलों त्या काशीचा इतिहास लिहून जर मी आपल्या चरित्राला जोडला नाहीं तर माझें चरित्र सजीव व पूर्ण कसें होणार! असें वाटून मी काशीचा इतिहास लिहिण्याचें ठरविलें. हा इतिहास थोड्या विस्तारानें लिहिण्याचें कारण असें कीं, अद्यावत् सर्व राजकीय, सामाजिक व धार्मिक इतिहासांत काशीचा उल्लेख कोणत्या ना कोणत्या तरी प्रसंगानें इतिहासलेखकांनीं केला आहे हें खरें; पण काशीचा सांगोपांग इतिहास कोठेंच कोणीही लिहिलेला आढळला नाहीं व तसा तो लिहिण्याचें त्यांना कारणही नाहीं. काशींतील कांहीं हिंदुस्थानी गृहस्थांनीं स्वतंत्र व हिंदी 'हंस' मासिकांतून तो प्रसिद्ध केला आहे; पण त्यांत काशीच्या इतिहासांत महाराष्ट्रीयांनीं किती भर घातली याचा उल्लेख न केल्याप्रमाणेंच केला आहे. या मासिकांत रा. रा. लक्ष्मण नारायण गर्दे यांनीं काशींतील महाराष्ट्रीयांची थोडी माहिती दिली आहे तेवढीच. म्हणून काशीच्या राजकीय, सामाजिक व धार्मिक इतिहासांत महाराष्ट्रीय लोकांचें स्थान किती व कोठें आहे हें दाखवावें म्हणून हा इतिहास त्याच दृष्टीनें लिहिण्याचें मी ठरवून काशी हें नांव ज्या पुस्तकांत आढळेल अशीं इंग्रजी, मराठी, हिंदी शेंकडों पुस्तकें वाचून काढिलीं.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्याचप्रमाणें ज्ञानकोश, चारित्रकोश, संस्कृत विद्येचें पुनरुज्जविन, शिलालेख, जुनीं पत्रें, ऐतिहासिक खंड हीं सर्व पुस्तकें वाचलीं.

या सर्व पुस्तकांतील माहिती कांहीं त्रोटक तर कांहीं अगदींच परस्पर विरुद्ध व कांहीं पुरावा नसलेलीच आढळली. तरी पण या सर्वांचा मला उपयोग झाला नाहीं असें मात्र नाहीं.

अहिल्याबाईनें बांधिलेल्या विश्वेश्वराच्या देवळाचा पुरावा तर खुद्द होळकर दरबारांत देखील सांपडला नाहीं. मग बाकींच्या पुस्तकांत सांपडणार कसा ? अहिल्याबाईच्या सर्व चरित्रांतून बाईनें विश्वेश्वरमंदिर बांधिलें इतकेंच लिहिलें आहे; पण त्याला पुरावा म्हणून पत्र किंवा शिलालेख दिलेला नाहीं. अशा परिस्थितींत शेवटीं मींच आपल्या वडिलांकडून व वृद्ध मंडळींकडून ऐकलेल्या गोष्टी व स्वतःची बुद्धि यांच्या साहाय्यानें वरील सर्व ग्रंथांचा समन्वय करून शक्य तितका प्रामाणिक काशीचा इतिहास लिहून काढिला. हा इतिहास विसाव्या शतकांतील भावनाशून्य व तर्ककर्कश लोकांना पटावा ही दृष्टि ठेवूनच लिहिला आहे.

याप्रमाणें माझें चरित्र व काशीचा इतिहास मी व्यवस्थितपणें लिहून काढिला खरा, पण तो प्रकाशित कसा करतां येईल ही काळजी पडली. एक वेळ मी असें म्हणेन कीं, पुस्तक लिहिण्यापेक्षां तें व्यवस्थित छापून प्रसिद्ध करणें फारच कठीण आहे. त्यांत दोन अडचणी. पहिली अडचण पैशाची व दुसरी अडचण छापखान्याच्या वाऱ्या करण्याची. जेमतेम पोटापुरते पैसे मिळवून समाधानांत राहणाऱ्या माझ्यासारख्या माणसाला आपलेंच चरित्र छापण्यांत फुकट पैसे उधळणें कसें शक्य होणार ? माझें हें पुस्तक आजकालच्या नवनीति वाङ्मयाप्रमाणें ललित नसल्यामुळें तें भराभर विकलें जाऊन त्यावर पैसे मिळणें स्वप्नांतही शक्य नाहीं. पुस्तकें छापून त्यांचीं बंडलें काखेंत मारून घरोघरीं जाऊन लोकांच्या गळ्यांत तीं अडकवावयाचीं व भिडेखातर त्यांनीं तीं घेतलीं, तरी पैशांची उधारी वसूल करण्याकरितां त्यांच्या दारांशीं खेटे घालावयाचे. ते भेटले तर ‘ उद्यां या ’

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

न भेटले तर पुनः जा अशी ही ' गतागतं कामकामा लभन्ते ' ची यातायात करण्याचें शरीरांत सामर्थ्य नाहीं व इच्छाही नाहीं. व्ही. पी. नें परगांवीं पुस्तकें पाठवावीं तर व्ही. पी. नेमकी परत येऊन पोस्टाचा दुप्पट खर्च आपल्याच अंगावर पडणार. तो तर दुष्काळांत तेरावा महिनाच.

दुसरी अडचण छापखान्याच्या वाऱ्या करण्याची. तीही पण पैसा नसल्या-मुळेंच येणारी आहे. पुस्तक छापण्याकरितां स्वतःजवळ पैसा मुबलक असल्या-वर बसल्या ठिकाणाहून नुसत्या हुकुमानेंच सर्व कामें होतात. नाहीं तर सगळीं कामें स्वतःलाच करावीं लागतात. ज्याप्रमाणें एखाद्या अगदींच लहानशा स्टेशनावरील मास्तरास त्याचा एकुलता एक हाताखालील पोर्टर आजारी पडल्यास त्याला स्टेशन मास्तरपासून तों तहत बॉटर मास्तर-पर्यंत सर्वच कामें स्वतःलाच करावीं लागतात, तोच मास्तर रुळांचे सांधे तोडून व जोडून तिकिटें देऊन गाडी येण्याची घंटा वाजवितो. रात्रीं गाडीच्या वेळेवर स्वतःच दिवे लावतो. गाडी आल्यावर गाडीच्या कागदा-वर सही करून गाडी गेल्यावर दिवे बारीक करून बाहेरील बाकावरच दुसऱ्या गाडीची वाट पहात स्वस्थ पडतो. त्याचप्रमाणें स्वतःच प्रूफांची ने, आण, तीं तपासणें, कंपॉझिटर व मालक यांच्याशीं झिगझिग घालणें वगैरे सर्व जिकीरीचीं कामें स्वतःवरच येऊन पडतात. ही सर्व दगदग माझ्यानें होणें शक्य नाहीं. म्हणून पुस्तक प्रकाशित करण्याची काळजी वाटूं लागली. पण ' कलागृह ' प्रेसचे मालक रा. शंकर सखाराम दाते यांनीं हा सर्व भार मोठ्या प्रेमानें आपल्या शिरावर घेऊन मला काळजींतून मुक्त केलें.

हा इतिहास लिहितांना भाऊसाहेब आठवले कॉंट्रॅक्टर, रा. नानासाहेब गोंधळेकर, रा. सा. बाबासाहेब देशपांडे, रा. विष्णु गोविंद लेले, रा. पांडुरंग गोविंद साने, श्री. चित्रावशास्त्री, काशीचे नारायणशास्त्री खिस्ते यांनीं लागेल त्या वेळेस लागतील तीं पुस्तकें व माहिती आळस न करितां पुरविली. चि. रामचंद्र यानें कोणालाही शोध न लागलेला व विश्वेश्वरमंदिरांतच

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

असलेला अहिल्याबाईचा शिलालेख श्रमानें शोधून काढून पाठविला व आणीकही बरीच माहिती काशीहून मोठ्या मेहनतीनें मिळवून पाठविली. आचार्यकुलसंचालक वेदान्ततीर्थ गोविंद नरहर पंढरपुरे शास्त्री यांनीं लेखन व विचारविनिमय यांचें साहाय्य केलें. रा. शंकरराव दाते यांनीं कांहीं इंग्रजी उताऱ्यांचें मराठी भाषांतर करून दिलें. मी लेखनकलेंत अनभिज्ञ असल्यामुळें छापील मजकुराची अनेक वेळां उलथापालथ करावी लागली तरी पण दात्यांचे सुशील फोरमन रा. नामदेव पांडुरंग करपे यांनीं कधींच कुरकुर केली नाहीं. श्री. पार्वतीबाई लिमये यांच्या घरीं घराप्रमाणेंच रहात असल्यामुळें कोणत्याही प्रकारचा सांसारिक व्याप माझे मागें नव्हता म्हणूनच सुचित्ततेनें मी हा इतिहास लिहूं शकलों.

अशी ही नरहर देवाची पालखी सर्वांनींच हातभार लावल्यामुळें मुक्कामास पोंचली. या सर्व माझ्या सहकाऱ्यांना काशीयात्रेचें व काशीच्या जीर्णोद्धाराचें फळ मिळालेंच. म्हणून या सर्वांचे आभार मानण्याचें कारणच राहिलें नाहीं हें खरें, तरी पण व्यवहारदृष्ट्या या सर्वांचे आभार मानणें माझें कर्तव्य आहे.

वस्तुतः या सर्वांचे आभार वेगवेगळे मानले असले तरी ज्याच्या सत्तेमुळें बुद्धींद्रियादि सर्व जडवर्ग चैतन्ययुक्त होऊन कार्यक्षम होतो त्या इंद्रियाधीश्वर श्रीकृष्णाचे उपकार न मानून कसें चालेल !

> यत्सान्निध्याच्चलन्त्येते जडा बुद्धींद्रियासवः ।
> तस्य श्रीगोकुलेन्द्रस्य न वाच्योपकृतिः कथम् ॥

पुणें, मकरसंक्रमण,
ता. १४-१-४० } भाऊशास्त्री वझे

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# विषयानुक्रमणिका

## काशीचा संपूर्ण इतिहास



CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# माझा चित्रपट

## अंक पहिला



CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## अंक दुसरा



CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## अंक तिसरा



## शुद्धिपत्र

| अशुद्ध | शुद्ध | पान | ओळ |
|---|---|---|---|
| असें म्हटल्यास... | असें म्हणत ... | | |
| वावगे नाही. ... | असतील ... | ५ | १५–१६ |
| अज्ञानवासांत ... | अज्ञातवासांत ... | २९ | २३ |
| करण्यास गागा... | करण्यास व गागा ; | २९ | २४ |
| गर्भागारांत ... | गर्भागारांत मध्यभागीं | ३८ | २५ |
| भरजन्म ... | जन्मभर | ६७ | १२ |
| १८४५ ... | १८४९ (चित्रपट) | १ | ८ |
| तांगू | सांगू ... | ४ | १७ |
| वत ... | वाटत ... | २६ | १२ |
| वक्याला | वक्त्याला | ६९ | |
| राहण्वा ... | राहण्या | १०४ | ११ |
| अमताची ... | अमृताची (परिशिष्ट) | ७ | २३ |

किरकोळ कानामात्रांच्या अशुद्धींचे निर्देश याच्यांत नाहींत.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## कै. तीर्थरूप वासुदेवशास्त्री वझे, काशी



ज्यांनीं मोठ्या श्रद्धेनें ब्राह्मणवृत्तीला अनुसरून आजन्म काशीवास केला, ज्यांनीं माझें लालन पालन करून व विद्या शिकवून ब्राह्मण वृत्तींतच मला कायम ठेविलें, ज्यांचा विरह अजूनही मला जाणवतो, त्या माझ्या पूज्य वडिलांना, त्यांना अतिशय प्रिय असलेल्या काशीचा इतिहास व माझा चित्रपट अर्पण करतों.

भाऊशास्त्री वझे

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# काशीची भौगोलिक स्थिति

## काशी देश

**काशी** ज्या भूखंडांत मोडते त्या खंडाचा प्राचीन कथाभाग असा. वैवस्वतपुत्र राजा प्रियव्रत ह्यानें सर्व भूगोलाचे सात भाग केले.या प्रत्येक भागास द्वीप असें म्हणतात.त्यानें हे सात भाग आपल्या सात मुलांस वांटून दिले.त्यापैकीं एक जंबुद्वीप हा भाग आपल ज्येष्ठ पुत्र जो आग्नीध्र त्याला दिला. आग्नीध्रानें जंबुद्वीपाचें नऊ भाग करून आपल्या मुलांना दिले. त्यापैकीं पाहिला भाग म्हणजे वर्ष, आपल्या नाभि नांवाच्या मुलाला दिलें. त्याचें नांव अजनाभवर्ष. नाभीचा मुलगा ऋषभ हा एकुलता एक होता. त्यानें आपला मुलगा जो भरत त्याला हें वर्ष दिलें म्हणून या अजनाभवर्षालाच भारतवर्ष म्हणूं लागले.

ह्याप्रमाणें सबंध पृथ्वीचीं नऊ वर्षें झालीं. त्यांपैकीं भारतवर्ष हीच कर्मभूमि आहे. बाकीचीं आठ वर्षें जीवाचीं पुण्यशेषोपभोगस्थानें आहेत. म्हणून त्यांना पृथ्वीवरील स्वर्ग असें म्हणतात. ( भा. ५-७-११ ) पुढें चक्रवर्ती दुष्यंतपुत्र भरत ह्यानें दिग्विजय करून गंगेच्या तीरावर पंचावन्न व यमुनेच्या तीरावर अठ्याहत्तर अश्वमेध केले. अशा या दिग्विजयी चक्रवर्ती भरतानें भारतवर्षाचे नऊ विभाग–खंड–केले. म्हणून याला भरतखंड ही संज्ञा पडली. ह्या भरतखंडापैकीं हल्लींचा हिंदुस्थान हा एक बराच मोठा भाग आहे.

इसवी सनापूर्वी सुमारें हजारबाराशें वर्षें भरतखंडाला म्हणजे दक्षिणापथाशिवाय हिंदुस्थानच्या सर्व भागाला, आर्यावर्त असें म्हणत. त्याविषयीं मनुस्मृतींतही आधार मिळतो. पूर्व व पश्चिम समुद्र आणि हिमनग व विंध्य यांच्या दरम्यानचा प्रदेश ' आर्यावर्त ' होय. ' आसमुद्रात्तु वै पूर्वात् आसमुद्रात्तु पश्चिमात् । तयोरेवान्तरं गिर्योरार्यावर्तं विदुर्बुधाः (मनु). या आर्यावर्ताचे तीन विभाग आहेत. ब्रह्मावर्त, ब्रह्मर्षिदेश व मध्यदेश. ह्या मध्यदेशांतच काशी प्रान्त मोडतो.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## भरतखंडाचें उत्तमांग.

मनुष्याच्या शरीरांत ज्याप्रमाणें त्याचें मस्तक हें ज्ञान, रस, आचार, विचार इत्यादि अंतर्बाह्य सर्व क्रिया यांचें मूळ उत्पत्तिस्थान असतें त्याप्रमाणें कोणत्याही राष्ट्रांत त्यांतील समाज, संस्कृति, शास्त्र, कला, आचार, विचार इत्यादि अंतर्बाह्य सर्व घडामोडी यांचें मूळ उत्पत्तिस्थान एखादें विशेष शहर होत असतें. आणि ज्याप्रमाणें अनेक प्रकारें वाहणाऱ्या रक्तप्रवाहाच्या आश्रयानें मेंदू सतेज व तरतरीत असतो, त्याचप्रमाणें एखाद्या नदीच्या प्रवाहाच्या आश्रयानें असणारें शहर भरभराटीस येऊन महत्पदास पोहोचतें. त्यांतच जर त्या शहरास अथवा त्या नदीस अथवा दोहोंसही धार्मिक अधिष्ठान असेल तर तें शहर क्षेत्र आणि ती नदी तीर्थ म्हणून आपआपल्या देशांत लोकांत पवित्र मानिलीं जाऊन अजरामर होतात.

ह्याप्रमाणें भरतखंडाचें मस्तक काशी हें मनुष्याच्या आठवणीच्याहि पलीकडच्या काळापासून झालेलें आहे. काशी ही भागीरथीच्या तीरीं वसलेली आहे. सर्व भरतखंडांत भागीरथी तीर्थ आणि काशी क्षेत्र परम पवित्रपदास जाऊन बसलेलीं आहेत. ईजिप्त देशाच्या लोकांची प्राचीन जाति व संस्कृति ह्यांचे केंद्र जें मन्फर ( मंफिस् ) गांव तें लुप्त झालें. ज्या नील नदीच्या तीरावर तें होतें ती अजून वाहातच आहे. उफरात ( युफ्राटीज् ) नदीच्या तीरावर वसलेल्या बावली आणि कॉलादी जातीच्या लोकांची राजधानी असलेल्या बाबिल नगराचीहि हीच दशा झाली. दजला ( टिग्रिस् ) च्या तीरावरील असारी जातीच्या लोकांची राजधानी नैनवाचीहि हीच कथा. बुद्धाच्या वेळेची अर्थात् आजपासून अडीच हजार वर्षांपूर्वींचीं जीं जुनीं ऐतिहासिक नगरें अद्यापिहि जिवंत आहेत अशीं, काशी सोडून फक्त तीनच. एक जार्डन नदीच्या जवळ असलेलें जेरूसलेम, हें यहुदी लोकांचे राजपुर व धर्मपुर होतें व अजून त्याला ख्रिस्ती लोक मान देतात; दुसरें ईलिस्सस् नदीच्या काठीं समुद्राच्या जवळ असलेलें अथेन्स. तें ग्रीस देशांत असून तें ग्रीक लोकांच्या राजधानीचें शहर आहे; तिसरें टैबर नदीच्या तीरावर वस-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

लेलें रोम शहर; तें इटाली देशाची राजधानी आहे. पैकीं जेरूसलेम इ. स. पूर्व पंधराशें वर्षांच्या जवळपास, अथेन्स इ. स. पूर्व चौदाशें वर्षांच्या सुमारास व रोम इ. स. पूर्व सातशेंचौपन्नमध्यें वसलें. शिवाय यावेळीं ज्या प्रख्यात राजधान्या होत्या त्या सर्व, कांहीं बुद्धाच्या पूर्वी शेकडों वर्षें, कांहीं येशूच्या वेळीं व कांहीं अगदींच अलीकडे वसलेल्या आहेत. जपानचे सुमिदावर टोकिओ, चीनचे हुनहोजवळ पेकिंग, तिबेटांत कीचुजवळ ल्हासा, अरबांचे जमजम कुंडाजवळ मक्का, रशियाचे मोसक्का नदीवर मास्को, आस्ट्रियांत डान्यूबवर व्हिएन्ना, जर्मनींत स्प्रीच्या तीरावर बर्लीन, फ्रान्समध्यें सीनवर पॅरीस; इंग्लंडांत टेम्स् नदीवर लंडन, उत्तर अमेरिकेंत हडसनचे तीरावर न्यूयार्क, दक्षिण अमेरिकेंत समुद्राच्या तीरावर रीयोओरोच्या कालव्याच्या आश्रयानें रायोडीजानीरो वगैरे. पण काशी ही केव्हांपासून वसली आहे याचा पत्ता लागत नाही. या काशीप्रान्ताच्या भोंवतालीं मगध, कोसल, व विदेह हे देश येतात. प्राचीन ग्रंथांतून काशीकोसल; काशीविदेह, काशीमगध असे प्रयोग आढळतात. काशी प्रान्ताची मर्यादा गंगागोमती संगमावर असलेल्या मार्केंडेयेश्वरापर्यंत होती. (गो. ब्रा. १–९)

शिवाय विदेह, कोसल व काशी या तीनही प्रान्तांचा एकच पुरोहित होता. (सां. श्रौ. १९–२९–५) असे उल्लेख आढळतात. "मगधेषु, कुरुषु, अवंतिषु" या प्रयोगांप्रमाणें 'काशिषु' असा बहुवचनी प्रयोग बऱ्याच ठिकाणीं दिसून येतो. त्यावरून काशी हा एक प्रान्त आहे. बौद्धवाङ्मयांतही काशी हा प्रांतच असल्याचा उल्लेख सांपडतो. ( Vol IIT. Waters on W. T. chwang page 73. ) हा काशी प्रान्त प्रथमतः सूर्यवंशीय राजांचे ताब्यांत होता. नंतर चंद्रवंशीय राजांकडे गेला. पुढें कालांतरानें मगधांच्या ताब्यांत गेला. काशी प्रान्तासाठीं नेहमीं कोसल मगध व विदेह या राजांचीं युद्धें होत असत. कारण काशींत इतर शहरांपेक्षां एक वैशिष्ट्य आणखी आहे. वर उल्लेख केलेल्या शहरांत जेरूसलेम, अथेन्स, रोम, व काशी याव्यतिरिक्त सगळ्याच राजधान्या विशेषत: राजकीय स्वरूपाच्या असल्यामुळें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्यावेळीं विख्यात व प्रभावशाली होत्या. काशी नगरी मात्र नेहमीं विशेषतः धार्मिक स्वरूपाचीच होती व अजूनही आहे. हिचें राजकीय स्वरूप पूर्वींपासूनच गौण होतें व अद्यापहि तसेंच आहे. हिच्या दीर्घायुष्याचें खरें कारण तिचें धार्मिक स्वरूप हेंच होय. भारतीय काळांत कृष्णानें राजकीय दृष्ट्याच काशीवर चढाई करून वाराणसी–राजधानीचें शहर जाळलें. तरी पण तिचें धार्मिक स्वरूप नष्ट झालें नाहीं. काशीप्रमाणें वरील तीन नगरींना विशेष धार्मिक स्वरूप असल्यामुळें त्याहि अजून टिकाव धरून आहेत. ह्यावरून असा सिद्धांत बांधण्यास हरकत नाहीं कीं राजकीय किंवा औद्योगिक कारणानें, प्रसिद्धीस आलेलीं शहरें काळाच्या उदरांत गडप झालीं. पण धार्मिक कारणामुळें मान्यता पावलेलीं शहरें, क्षेत्रें बनून अजरामर झालीं आहेत. रोम ख्रिस्तीधर्माचें, जेरूसलेम यहुदीधर्माचें, तिबेटचें ल्हासा सुमारें तेराशें पन्नास वर्षांपासून म्हणजे स्त्रोङ्–त्सांङ्–गाम्पो राजानें वसविलें तेव्हांपासून, बौद्धधर्माच्या महायान संप्रदायाचें, आणि मक्काहि जवळ जवळ त्याचवेळेपासून मुसलमानी धर्माचें मुख्य स्थान होऊन राहिलें आहे. तात्पर्य, पूर्वींपासूनच प्रसिद्ध असलेला काशी हा धार्मिक क्षेत्राचा प्रमुख प्रान्त आपल्या ताब्यांत असावा असें प्रत्येक राजाला वाटत असे.

या काशी प्रान्ताची राजधानी वाराणसी होय. ही वाराणसी वरुणा व सिता म्हणजे गंगा यांच्या संगमावर वसली होती. ही नगरी ज्या ठिकाणीं वसली गेली त्या ठिकाणाला आनंदवन अथवा अविमुक्तक्षेत्र म्हणतात. त्या जागीं असलेल्या महादेवाला अविमुक्तेश्वर म्हणतात. हल्लीं काशीप्रान्त हा स्वतंत्र न राहिल्यामुळें वाराणशीलाच लोक काशी म्हणूं लागले.

## आनंदवन

या क्षेत्राला आनंदवन, अविमुक्तक्षेत्र, वाराणशी, गौरीमुख, महास्मशान, रुद्रावास अशीं नांवें पुराणांतून आढळतात. अविमुक्तक्षेत्र हें स्वतःच पवित्र आहे. त्यांत शंकराचा निवास, गंगावरुणा असियांचा संगम व याच ठिकाणीं गंगा उत्तरवाहिनी झाल्यामुळें तर या क्षेत्राचें महात्म्य फारच मोठें वाढलें. हें क्षेत्र

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वरुणा व असि या नद्यांच्या मध्यभागीं असल्यामुळें यांला वाराणसी असें नांव पडलें. याचाच अपभ्रंश बनारस असा झाला असावा. हें क्षेत्र गंगेच्या पश्चिम तीरावर आहे. या क्षेत्राच्या दक्षिणबाजूला स्मशान आहे. " दिशं तु दाक्षिणां यत्र वाराणस्यां स्थितं सदा स्मशानम् " ( मार्कंडेय पुराण ) त्यालाच महास्मशान म्हणतात. ' महास्मशानदग्धानां पुनर्जन्म न विद्यते ' असें याचें माहात्म्य आहे. याच स्मशानावर हरिश्चंद्राचा सर्व वृत्तान्त घडून आला.

येथें दक्षयज्ञांत प्राणत्याग केलेल्या सतीचा—गौरीचा देह घेऊन शंकर हिंडत असतांना या क्षेत्रांत तिचें मुख गळून पडलें म्हणून याला गौरीमुख असेंही म्हणतात. या क्षेत्रांतील मुख्य देवी विशालाक्षी आहे असें तंत्रचूडामणींत म्हटलें आहे "वाराणस्यां विशालाक्षी क्षेत्रस्य परमेष्टदा" ( का-खं. ) हल्लीं सर्व लोक अन्नपूर्णेलाच मुख्य देवी समजतात.

काशीच्या संकल्पांत या क्षेत्राला 'त्रिकंटक—विराजिते,' असें म्हटलें आहे. याचा अर्थ आध्यात्मिक व पारमार्थिक दृष्टीनें निराळा आहे परंतु आधिभौतिक दृष्टीनें विचार केल्यास काशी ही कोस्ल, विदेह व मगध या तीन देशांच्या कचाट्यांत असल्यामुळें तिला ' त्रिकंटक—विराजिते ' असें म्हटल्यास वावगें नाहीं म्हणत असतील असें आम्हांस वाटतें.

गंगावरुणा संगमावर जें आदिकेशवाचें स्थान आहे ती वाराणशीची एक सीमा आहे. हें आदिकेशवाचें स्थान फार प्राचीन आहे. अलीकडे देखील अकराव्या शतकांत कृष्णमिश्रानें लिहिलेल्या प्रबोधचंद्रोदय नाटकांत ( अंक ४ था ) याचा उल्लेख आहे.

हल्लींच्या काशी स्टेशनच्या पलीकडच्या या आदिकेशवाच्या जवळच पूर्वी किल्ला होता. तो बंगालचे पाल व पुढें कनोजचे राठोड या राजांनीं जिंकून घेतला. त्याची पुढें मुसलमानांनीं मशीद केली. ती अद्यापि तेथें आहेच. त्या जागेला असलेला मोठा कोटहि पण अजून पडक्या स्थितींत आहे; व त्यालाच आज ' कोट ' म्हणण्यांत येतें. पूर्वीं या बाजूलाच लोकांची वस्ती असावी; व हल्लीं जेथें वस्ती आहे तें अरण्य असावें. त्या अरण्यांत अनेक देव, मुनि,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ऋषि, विद्वान व तपस्वी येऊन वास करीत व लिंगस्थापनाहि करीत. पुढें पुढें या आनंदवनांत अरण्य तोडून घरें बांधण्यास सुरुवात झाली असावी. म्हणून गंगातीरावर घरांची फारच दाटी झाली आहे. आणि म्हणूनच काशी-खंडांत वर्णन केलेलीं अनेक शिवलिंगें व तीर्थें लोकांच्या घरांत व तळघरांत आढळतात. कपिलेश्वर, पंचगंगेश्वर, पातालेश्वर, सिद्धेश्वरी, अशीं अनेक स्थानें घरांत व घराखालीं आहेत.

ह्या स्थित्यंतराचीं तीन कारणें संभवतात— ( १ ) गंगा आणि विश्वेश्वर ह्यांच्या सान्निध्याचा लोभ. ( २ ) मुसलमानांच्या आक्रमणापासून आपल्या देवस्थानांचें रक्षण. ( ३ ) राजा परधर्मी असल्यामुळें व वैदिक धर्मांचा कोणी नियन्ता नाहीं यामुळें तेथील लोकांनीं वाटेल त्या ठिकाणीं घरें बांधण्यास सुरुवात केली.

मुसलमानी अमदानींतहि येथें थोडें जंगल शिल्लक होतें असें दिसतें. कारण बिंदुमाधवाजवळील ' चौकले ' यांच्या घराच्या कागदांत ' वनकटा ' असा शब्द आहे. या शब्दाचा अर्थ असा कीं, वन कापून तेथें हें घर बांधलें. पुढें काशी हा स्वतंत्र प्रांत न राहिल्याकारणानें याच अविमुक्त किंवा आनंदवनाला लोक काशी म्हणूं लागले. या आनंदवनांतच विस्तीर्ण स्मशान होतें. पुढें त्याच्या मागें पुढें वस्ती झाल्यामुळें याचें वन व स्मशानभूमि हें रूप जाऊन तें एक शहरच झालें. पण शहरांतच लहानसें स्मशान कायम राहिलें. कोठेंहि स्मशान गांवाबाहेर असतें. परंतु हें स्मशान भरवस्तींत आहे.

## महास्मशान.

स्मशानाच्या बाबतींत सर्वांची अशी समजूत आहे कीं, हल्लीं हनुमान घांट व केदारघांट यांमध्यें जें स्मशान आहे तेंच जुनें स्मशान होय. परंतु वास्तविक तें मुख्य स्मशान नव्हे. तसें तर सर्व काशीलाच महास्मशान हें नांव आहे. पण मुख्य स्मशान मणिकर्णिकेजवळ " गंगामहाल " खालीं यमधर्मेश्वराचें जें स्थान आहे, तेंथेंच स्मशान होतें. येथेंच हरिश्चंद्रेश्वराचें मंदिर आहे. हीं दोन्ही स्थानें, व हल्लींच्या 'चौक' बाजारांत भद्रोमल्ल या

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

सावकाराच्या कोठीच्या खालीं असलेलें स्मशानविनायकाचें मंदिर हीं तीन्ही स्थाने काशीखंडोक्त आहेत. यमधर्मेश्वरापासून स्मशानविनायकापर्यंत सर्वच पूर्वी स्मशानभूमि होती. कारण वैदिक अंत्येष्टिविधानाप्रमाणें शवाला अग्निसंस्कार करून, घरीं परत येऊन, तिसरे दिवशीं अस्थिसिंचनार्थ स्मशानांत जावें असें आहे. ह्या कारणास्तव स्मशानभूमि एवढी मोठी असणें सयुक्तिक आहे. यमधर्मेश्वरघांटापासून स्मशानविनायकापर्यंत जर सरळ रेषा काढली तर तें अंतर सुमारें चार फर्लांग येईल. त्या वेळीं या बाजूला वस्ती नव्हती. यावरून एक गोष्ट स्पष्ट होते कीं पूर्वी विश्वेश्वरगंज ( हल्लीचा धान्याचा बाजार ) चौखंबा, बुलानाला, ब्रह्मनाळ वगैरे भयंकर अशा मोठमोठ्या नाल्यांनीं व गर्द झाडींनीं व्यापलेलीं म्हणूनच निर्जन होतीं. हल्लीं याच नावांनी तेथें दाट वस्तीचे मोहल्ले झाले आहेत. काशीविषयीं जेम्स मेस्टन ह्यानें Views and illustrations of Benares ह्या नांवाचें पुस्तक लिहिलें आहे. ह्या अतिशय प्राचीन पुस्तकावरूनही ह्याच गोष्टीला पुष्टि मिळते. ह्युएनत् संग वगैरे प्राचीन प्रवाश्यांनीं स्मशानाजवळच विश्वेश्वरमंदिर असल्याचा उल्लेख केलेला आहे. अवरंगजेबानें पाडलेलें विश्वेश्वराचें मंदिर स्मशानविनायकाच्या मंदिराजवळ येतें. तात्पर्य, अत्यंत प्राचीन स्मशानभूमि यमधर्मेश्वरापासून चौकबाजारांतील स्मशानविनायकापर्यंत असावी हें निश्चित. आणि तेथें असलेल्या हरिश्चंद्रेश्वराच्या मंदिरावरूनही राजा हरिश्चंद्राचें प्रसिद्ध चरित्र तेथेंच झालें असावें यांत संशय नाहीं. जसजशी वस्ती वाढूं लागली तसतसें स्मशान लहान होत गेलें. त्यामुळेंच आस्थिसिंचनाकरितां तीन दिवस वाट न पाहतां कपाळमोक्षानंतर दोनतीन तासांत उरलेला भाग 'रुद्रभाग' म्हणून गंगार्पण करण्यास सुरुवात झाली असावी. आतां हल्लीं जें स्मशान आहे तें वर सांगितलेल्या यमधर्मेश्वरापासून सुमारें एक फर्लांग लांबीवर येईल. हें स्मशान नवीन होण्याचें कारण असें कीं, याची स्थापना अयोध्येचा नवाब सफदरजंग याचा एक वरिष्ठ अधिकारी खत्री जातीचा, लाला काश्मीरीमल ह्यानें केली. कारण तो आपल्या वृद्ध मातो

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

शीला घेऊन काशींत आला व सिद्धेश्वरीमहल्यांत एक अप्रतिम वाडा इ. स. १७७५ मध्यें बांधून त्यांत तो राहिला होता. त्याची आई मेल्यावर तो तिचें शव घेऊन केदारघांटाजवळ असलेल्या स्मशानांत गेला. कारण काशींत केदाराकडील भागाला केदारखंड म्हणतात. या टापूंत मरणाऱ्यास भैरवी यातना भोगाव्या लागत नाहींत, असें वर्णन आहे. म्हणूनच हळू हळू तिकडचेंच स्मशान कायम होऊन जुनें स्मशान त्यावेळीं वस्तीनें व्यापून गेलें असावें. येथें लालाजी आल्यानंतर त्या स्मशानावरील अधिकारी डोम ह्यांशीं त्यांचें घेण्यादेण्यावरून भांडण झालें म्हणून तेथून आईचें प्रेत घेऊन लालाजी मणिकर्णिकेवर आले व तेथें घाटावरील पंडयांकडून थोडी जमीन विकत घेऊन त्याच ठिकाणीं आपल्या आईचा त्यांनीं शवसंस्कार केला. आणि निरनिराळ्या जातींना शवदहन करण्याकरितां सात स्वतंत्र पटांगणें बांधून दिलीं. व असा नियम बांधून दिला कीं, खत्री व सारस्वत यांचेकडून कर घेतला जाऊं नये. इतरांपासून तीन पैसे कर घ्यावा. याच कारणामुळें तेव्हांपासून कदाचित् हल्लींचें स्मशान चालु झालें असावें. या नवीन स्मशानाला १८० वर्षेंच झालीं आहेत. हल्लीं सात पटांगणें नाहींत. पावसाळ्यांत गंगा वाढत असल्यामुळें शवदहनास त्रास होतो म्हणून एका श्रीमंतानें तेथेंच एक दगडी, मोठी, शवदाहाला योग्य अशी इमारत नुकतीच बांधली आहे. काशींत प्रेताला डोमाचा पाय लागल्याशिवाय मुक्ति नाहीं, हा प्रवाद सपशेल खोटा आहे.

हल्लींची काशी मूळचें आनंदवन असल्यामुळें वनवासी लोकांच्या आचारांतील थोडा भाग अजूनहि तेथें दृष्टीस पडतो. गुण गेला पण वाण राहिला. उदाहरणार्थ—मंगल प्रसंगीं देखील उघडे बोडके फिरणें, भस्म हा अलंकार समजून तें नेहमीं लावणें, लग्नकार्यांत देखील मातीच्या भांड्यानें पाणी पिणें, ( पुर्वा ) सुखासुखी मातीच्या मडक्यांत स्वयंपाक करणें, पंचा किंवा लंगोटी लावून भर रस्त्यांतून फिरणें, "मरणं मंगलं यत्र विभूतिर्यत्र भूषणम्। कौपीनं यत्र कौशेयं" वगैरे प्रकार तेथें दिसतात. या ठिकाणीं नवखंड पृथ्वींतील व्यवहारापेक्षां सर्व व्यवहार निराळे असल्यामुळें याला दहावें खंड म्हणतात.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

येथें शंकराचार्यांचें आज्ञापत्र चालत नाहीं. तर येथील पंडितांनीं दिलेला निर्णयच सर्वत्र चालतो.

वाराणसी या क्षेत्राची लांबी दक्षिणोत्तर आठ मैल व एकंदर क्षेत्रफळ सुमारें ४० ते ५० मैल आहे. ४००० ली क्षेत्रफळ असल्याबद्दल ह्युएनत्संग म्हणतो.

## वेदकालीन काशी.

काशी किंवा काश्य ह्या लोकवाचक शब्दांचा वैदिक वाङ्मयांत बऱ्याच वेळां उल्लेख येतो पांचाल लोक, गांधार लोक याप्रमाणें तो देशवाचकही आहे. ऋग्वेदांत पुरूरवस् याला ऐल असें म्हटलें आहे. (ऋ. १०–९५–१८).

काशीचा राजा धृतराष्ट्र होता त्याचा पराभव शतानीक सत्राजितानें केला. व पुढें ब्राह्मणांचें वर्चस्व होईपर्यंत काश्य लोकांनीं यज्ञ करण्याचें बंद केलें. (शत. ब्रा. १३–५–५–४–१९)

दुसरा अजातरिपु हाही काशीचा राजा होता. यानें गार्ग्य बालाकी नामक एका अभिमानी ब्राह्मणाला वादांत गप्प बसविलें. (बृ. २–१–१)

त्याचप्रमाणें कौषीतकी वगैरे उपनिषदांत 'काश्यो वा वैदेहो बोग्रपुत्रः' 'सोऽवसत् काशिविदेहेषु' वगैरे वाक्यें आढळतात.

## पुराणकालीन काशी

हल्लीं उपलब्ध असलेल्या इतिहासाच्या आधारें काशीचा इतिहास पाहूं गेलें असतां साधारणपणें गौतमबुद्धाच्या वेळेपासून म्हणजे इ. स. पूर्व ५६० च्या सुमारापासून तो मिळूं लागतो. परंतु काशीचा तत्पूर्वीचाही इतिहास पाहावयाचा असल्यास, पुराणाच्या आधारानेंच तो पाहावा लागेल; व त्या दृष्टीनें पुराणांत संशोधन केलें असतां, श्रीमद्भागवत, वायुपुराण, अग्निपुराण, हरिवंश, वामनपुराण आणि स्कंदपुराण (काशीखंड) या सर्वांच्या समन्वयानें निश्चित रूपाचा पुढीलप्रमाणें इतिहास मिळतो. तो असा कीं, सृष्टीच्या प्रारंभीं ब्रह्मदेवानें स्वायंभू मनु व शतरूपा यांची उत्पत्ति केली. येथूनच प्रथम मानवी सृष्टीला प्रारंभ झाला. त्या मन्वंतरांत एकदां साठ वर्षें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अवर्षण पडलें. अवर्षणें व सुवर्षणें हीं राजाच्या पापपुण्यावर अवलंबून असतात. म्हणून राज्य करण्यास योग्य असा तपस्वी राजा जो रिपुंजय त्यास ब्रह्मदेवांनें आणून राज्यावर बसविलें. यालाच दिवोदास ( पहिला ) असें म्हणूं लागले. यानें काशीक्षेत्र आपल्या ताब्यांत घेतलें व तेथून सर्व देवांनाच नव्हे तर खुद्द शंकरांनाही काशी सोडून मंदर पर्वतावर जावयास लाविलें; असें काशीखंडांत वर्णन आहे. हें सांगण्याचें कारण असें कीं, त्यापूर्वींही काशी होतीच, हें निर्विवाद होय. हा राज्य करीत असतांनाच विष्णूंनीं भिक्षुवेष घेऊन काशींत पाखंड मताचा प्रचार केला. यालाच 'बौद्ध धर्म' म्हणतात.*

---

* पूर्वी राक्षसांनीं शुक्राचार्यांना असा प्रश्न केला कीं, विष्णु हे देवांचा पक्ष घेऊन आम्हांला कां मारतात? त्यावर शुक्राचार्य म्हणाले कीं, सुर हे वैदिक धर्मानुयायी असल्यामुळें ते यज्ञयागादि करून विष्णूला संतुष्ट करतात. म्हणून विष्णु त्यांचा पक्ष घेतो. तुम्ही यज्ञयागादिक कराल तर तुमचाहि पक्ष विष्णु घेतील. हें ऐकून असुरहि यज्ञयाग करूं लागले. त्यामुळें विष्णूला त्यांना मारतां येईना. म्हणूनच विष्णूला बलीकडे पृथ्वीची भिक्षा मागावी लागली. परंतु असुर वैदिक धर्माचा उपयोग आपल्या दुष्टवृत्तिपोषणाकडे करूं लागले. तेव्हां सर्व देवतांच्या प्रार्थनेवरून भिक्षुवेष घेऊन, असुरांमध्यें अवैदिक अहिंसात्मक धर्माचा प्रचार करून, विष्णूंनीं त्यांना वैदिक धर्मापासून च्युत केलें. वैदिक याच विष्णूच्या अवतारास बौद्ध अवतार मानतात. याचेंच वर्णन 'संमोहाय सुरद्विषां' असें भागवतांत केलेलें आहे. गौतमबुद्ध हा बुद्धावतार नव्हे. या बुद्धानेंहि आपल्या पूर्वींच्या अनेक बुद्धांचा उल्लेख केला आहे. ब्राह्मणद्वेषामुळें गौतमबुद्धानें हाच धर्म स्वीकारून त्याचा प्रसार केला. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे आस्तिक व नास्तिक यांचीं मूलतत्त्वें कोणत्यांना कोणत्या रूपानें श्रुतींत आढळतात. कोठें पूर्वपक्षरूपानें आहेत, तर कोठें तीं सिद्धांतरूपानें आहेत. हल्लीं त्या त्या मताचे आचार्य हे त्या मताचे उत्पादक नसून, कांहीं प्रकाशक तर कांहीं त्याच तत्त्वांना रूपांतर देऊन त्याचे प्रचारक झालेले आहेत.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

बौद्धमतप्रचारानें प्रजा पाखंडी बनल्यामुळें राजाला काशी सोडावी लागली. नंतर त्यानें गोमतीतीरावर आपली राजधानी वसवून परत काशींत येऊन शंकराची तपश्चर्या करून तो मुक्त झाला. नंतर पुन्हा काशींत वैदिक धर्माची स्थापना झाली.

या स्वायंभू मनूनंतर वैवस्वत मन्वंतर लागलें. वैवस्वत मनूचेंच नांव श्राद्धदेव. याला इक्ष्वाकु, नृगप्रभृति दश मुलें झालीं. यांचा जो वंश तोच सूर्यवंश होय. प्रथम यांच्याच ताब्यांत काशी होती. यांचा महाकोसल देश असून अयोध्या ही राजधानी होती. या वंशांतील राजा हरिश्चंद्र यानें आपलें सर्व राज्य विश्वामित्राला देऊन तो काशींत जाऊन राहिला. कारण काशी ही आनंदवनांत होती. प्राचीनकालीं वनावर सार्वभौम राजाचीही सत्ता नसे. त्यामुळें विश्वामित्राला दिलेल्या पृथ्वीदानाच्या कक्षेंत काशी येत नव्हती. म्हणूनच विश्वामित्रालाही कांहींच बोलतां येईना.

या श्राद्धदेवालाच इष्टीच्या द्वारा आणखी एक मुलगा झाला. त्याचें नांव सुद्युम्न. हाच पार्वतीच्या शापानें एक महिना पुरुष व एक महिना स्त्री होत असे. याच स्त्रीअवस्थेंतील त्याचें नांव 'इला' असें होतें. या स्त्रीअवस्थेंत त्याला बुधापासून पुरूरवा नांवाचा मुलगा झाला. हा चंद्रपुत्र जो बुध त्यापासून झाल्यामुळें येथून चंद्रवंशाला सुरुवात झाली. या ऐल पुरूरव्याला सुद्युम्नानें प्रयागाजवळील आपल्या प्रतिष्ठान* ( प्रचलित नांव झुसी ) नामक राज-

---

* प्रतिष्ठान—( १ ) प्रयागजवळ हल्लीं असलेलें झुसी गांव. ह्यासच प्रतिष्ठापुर किंवा प्रतिष्ठानपुर असें म्हणत.

( २ ) बिठुर ( ब्रह्मावर्त ) येथें उत्तानपाद राजाची राजधानी होती. ह्याच राजाचा मुलगा ध्रुव. ह्यानें मथुरेचे वनांत श्रीविष्णूची आराधना करून अढळपद मिळविलें.

( ३ ) पैठण ( मुंगी पट्टण ) महाराष्ट्राची एककाळ राजधानी होती. ( अश्मक राजा इ. स. पूर्व ७८ ) येथेंच एकनाथस्वामी झाले.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

धानींत बसविलें. (ह.वं.२–१०)याच्या ताब्यांत या वेळीं काशी आली होती. या पुरूरव्याला उर्वशीपासून आयु नांवाचा मुलगा झाला. आयूचा क्षत्रवृद्ध व त्याचा सुहोत्र. त्याला काश्य नांवाचा मुलगा झाला. त्याचा मुलगा काशी नांवाचा झाला. याच्यापासूनच आनंदवनाला राजकीय स्वरूप आल्यामुळें तें आनंदवन त्याच्या काशी या नांवानें प्रसिद्ध झालें. व तेथील लोक काश्य नांवानें विशेष प्रसिद्धीला येऊं लागले. काशीचा मुलगा दीर्घतम. त्याचा धन्वंतरी, त्याचा केतुमान्, त्याचा हर्यश्व, त्याचा सुदेव, ( भीमरथ ) त्याचा दिवोदास, (दुसरा) यानें माहिष्मतींतील हैहय राजांनी हर्यश्व व सुदेव यांना मारलें, म्हणून हैहयांच्या भीतीनें दिवोदासानें वाराणसी ही राजधानी करून एक मजबूत किल्ला व कोट काशीला बांधला. तरी पण हैहयांनीं चढाई करून दिवोदासाला मारलेंच. पण त्यास काशी ताब्यांत घेता आली नाहीं. पुढें दिवो-दासाचा मुलगा प्रतर्दन, यानें त्या किल्ल्याच्या आश्रयानें बापाच्या वधाचा सूड उगविण्याकरितां हैहयांचा पूर्ण पराभव करून काशींतील राज्य सुरक्षित केलें. हा दशरथाचा मित्र होता. "तथा काशीपतिं स्निग्धं सततं प्रियवादिनम् । सद्वृत्तं देवसंकाशं स्वयमेवानयस्व हि॥" असें रामायणांत म्हटलें आहे. या प्रतर्दनापासून भारतीय युद्धापर्यंत २४ पिढ्या झाल्या.

काशीराजाचा महाभारतांत अनेक वेळां उल्लेख आला आहे. अक्रूर काशीस गेला, श्रीकृष्णानें काशिराजाचा वध केल्यामुळें त्याचा मुलगा सुदक्षिण यानें कृष्णांना मारण्याकरितां अविमुक्तांत भवाची उपासना केली, कृष्णानें वारा-णसी जाळली, वगैरे उल्लेख भागवतांत आहेत. श्रीकृष्ण व बलराम यांचे विद्यागुरु काश्य सांदीपनी हे काशीहूनच उज्जयिनीस जाऊन राहिले असावे.

भारतीय युद्धापासून चंद्रगुप्तापर्यंतचा हिंदुस्थानचा राजकीय इतिहास कळण्याकरितां पुराणाशिवाय दुसरें साधन नाहीं. म्हणून काशी कोणाच्या ताब्यांत होती हें नक्की सांगतां येत नाहीं. परीक्षिताच्या जन्मापासून महा-पद्मनंदाच्या अभिषेकापर्यंत सुमारें दीड हजार वर्षें होतात, असें पुराणावरून दिसतें. भारतीय युद्धापासून बुद्धांतापर्यंतच्या काळांत भारतवर्षांत अनेक

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

राज्यें होऊन गेलीं. पण युधिष्ठिराप्रमाणें अप्रतिहत सार्वभौमत्व कोणालाच लाभलें नाहीं असें दिसतें. मग काशी कोणाच्या ताब्यांत किती वर्षें होती हें नक्की सांगणें कठीण आहे.

त्या भारतीय युद्धानंतर या वंशांत कोणी विशेष पराक्रमी न राहिल्यामुळें हैहयांनीं आपलें प्रस्थ माजवून २८ पिढ्या राज्य केलें. त्या वेळेस काशी त्यांच्या ताब्यांत होती. त्यानंतर प्रद्योत वंश उदयास आला. त्याचा पहिला पुरुष शिशुनाग. यानें काशींतून राजधानी काढून इ. स. पू. ३४२ मध्यें मगध देशांत नेली. तेव्हांपासून मागधराजांच्या ताब्यांत काशी गेली. शिशुनाग वंशांतील चवथा पुरुष बिंबिसार. ( इ. पू. ५८१–५५२ ) या बिंबिसारानें गौतम बुद्धाची दीक्षा घेतली. तेव्हांपासून काशींत बौद्ध धर्माचें प्रस्थ वाढलें. त्या वेळेस काशी अत्यंत समृद्ध होती.

## बौद्धकालीन काशी

### सारनाथ व गौतमबुद्ध

काशींत बौद्ध धर्माचें प्रस्थ माजून तें बऱ्याच काळ तेथें टिकलें. कारण असें कीं, काशी ज्या मगधांच्या ताब्यांत गेली होती त्यांनीं वर सांगितल्याप्रमाणें बौद्ध दीक्षा घेतली होती. शिवाय स्वतः गौतमबुद्ध यानें काशीजवळील सारनाथीं वास करून आपल्या धर्मप्रसाराचें केंद्र तेथेंच केलें होतें. कारण बुद्धाची अशी समजूत होती कीं, प्रलयानंतर उत्पन्न झालेल्या क्षेत्रांत काशीचा दुसरा क्रमांक लागतो. काशी हें प्रसिद्ध पवित्र क्षेत्र असून तें सर्व विद्या व विशेषतः तत्त्वज्ञान आणि व्याकरणशास्त्र ह्यांचें माहेरघर आहे. मोठमोठ्या ग्रंथकारांची प्रसिद्धी येथूनच होत असते. या सर्व कारणांचा बुद्धाचे मनावर पगडा बसून त्यानें गयेपेक्षां काशी हेंच धर्मप्रसार करण्यास उत्तम व सोयीचें केंद्र केलें.

बुद्धाचा जन्म इ.स.पूर्व ५६७ च्या सुमारास झाला. त्यानें ब्राह्मण व वेद यांच्या द्वेषावरच आपल्या धर्माची उभारणी केली. वर्णाश्रमीय संन्याशाचें सोंग घेऊन त्यानें अवैदिक संन्यास चालू केला. वेदांत केवळ ब्राह्मणांनाच

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

संन्यासाचा अधिकार आहे, म्हणून त्यानें चांडालपर्यंत सर्वांस संन्यास देऊन वैदिक जातिसंस्थेचा उच्छेद केला. स्वतः डुकराचें मांस खाऊन मरणाऱ्या बुद्धानें वैदिक पशुयाग अहिंसेच्या नांवाखालीं बंद केले. सर्व वैदिकांना अतिशय पूज्य व पवित्र अशा काशी प्रान्तांत असलेल्या मृगवनांत बसून त्यानें आपल्या धर्माचा प्रचार केला. हल्लीं त्यालाच सारनाथ असें म्हणतात. तें वाराणसीच्या बाहेर आहे. या वेळेस "यशरथ" या नांवाचा बौद्ध धर्मीय काशीचा राजा होता. त्यामुळें काशींत वैदिक धर्माला उतरती कळा लागून बौद्ध धर्माचें प्रस्थ माजलें होतें. व अनेक विहार व बौद्धमठ निर्माण झाले होते. ही स्थिति सुमारें आठशें वर्षेपर्यंत राहिली होती. तरीसुद्धां वैदिकधर्म काशींतील ब्राह्मणांनीं जिवंत राखला होता. उत्तर हिंदुस्थानांत बौद्ध धर्माचा प्रसार बुद्धाच्या देखतच झाला. इ. स. पू. ४८७ मध्यें बौद्धाचें 'निर्वाण' झालें. बौद्ध ग्रंथांपैकीं युवंजय जातकांत ( ४-७५ ) काशीचीं जुनीं नांवें सुरंधन, सुदर्शन, ब्रह्मवर्धन, पुष्पावती व रम्या अशीं आहेत.

हें सारनाथ म्हणजे पूर्वीच्या काशिराजांचें मृगयावन होतें. म्हणून बौद्ध काळीं त्याला मृगवन, मृगदाव, सारंगवन असें म्हणत. पुढें बौद्धांचें वर्चस्व कमी झाल्यानंतर तेथल्या महादेवाच्या स्थानाला उद्देशून त्याला सारनाथ म्हणूं लागले. हल्लीं तेथें श्रावणमासीं दर सोमवारीं महादेवाची यात्रा भरते. सारनाथ हें काशीच्या ईशान्य दिशेला चार मैलांवर आहे.

इ. स. पूर्वी ३२२ मध्यें "पाटलीपुत्र" येथें राज्य करीत असलेल्या महापद्मनंदाचा दासीपुत्र व चाणक्याचा प्रिय शिष्य चंद्रगुप्त मौर्य हा नंदांच्या गादीवर बसला. हा सम्राट् झाला. त्याचा नातू सम्राट् अशोक इ. स. पूर्वी २७२ मध्यें पाटलीपुत्र येथें राज्य करूं लागला. हा पूर्वी शिवभक्त होता. पण पुढें त्यानें बुद्ध धर्म स्वीकारला. त्यामुळें राजाश्रयानें बुद्धधर्म जास्तच फोफावला. त्यानें सुमारें ४० वर्षें राज्य केलें. मौर्य साम्राज्याची समाप्ति इ. पू. १८४ मध्यें झाली. बृहद्रथ नांवाच्या शेवटच्या राजाचा वध त्याचा सेनापति पुष्पमित्र यानें केला व आपण राजा झाला. अशोकाचे वंशज सातव्या शतकापर्यंत मगध

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

देशाचे किरकोळ राजे म्हणून राज्य करीत होते. पुष्पमित्रशुंग हा सनातनधर्मी असल्यामुळें त्यानें अशोकाच्या वेळीं बळावलेल्या बुद्धधर्मांच्या विध्वंसाकरितां ब्राह्मणांना फारच मदत केली. त्यानें अश्वमेधही केला. पतंजलीने ह्या अश्वमेधाचा उल्लेख केला आहे; त्यानें हा यज्ञ समक्ष पाहिला असावा असें दिसतें. या घराण्याची सत्ता इ. स. पू. ७३ पर्यंत चालू होती.

पुढें या शुंगवंशाचा नाश करून कण्ववंश राज्य करूं लागला. ह्या वंशांतील चार राजांनीं सुमारें ५० वर्षें राज्य केलें. ह्यांच्या कारकीर्दींतच मगध देशाची सत्ता खालावली. नंतर इ. स. पू. २८ च्या सुमारास आंध्र राजवंशानें कण्व कुलाचा नाश केला. अशा रीतीनें मगध देशाचें पहिलें साम्राज्य नष्ट झालें.

उत्तर हिंदुस्थानांत आंध्रवंशाचा अंमल चांगला न बसल्यानें शक नांवाच्या परकी लोकांनीं उज्जयनी ही आपली राजधानी करून ह्या सर्व प्रांतावर आपला अंमल चालू केला.

इसवी सनाच्या पहिल्या शतकांत कुशन नांवाच्या लोकांनीं शक राजास बाजूस सारून उत्तर हिंदुस्थानावर आपली सत्ता चालू केली. ह्यांच्यापैकीं कनिष्क हा इ. स. १२० पासून फार प्रसिद्ध झाला. कनिष्क हा बौद्धधर्मी असल्यामुळें पुनः बौद्ध धर्मास चालना मिळाली. कनिष्क हा इ. स. ७८ मध्यें गादीवर बसला, हाच शालीवाहन शककर्ता असावा.

कनिष्कानंतर पुढें चवथ्या शतकापर्यंत कोणताही राजवंश विशेष चमकला नाहीं.

इ. स. ३२० च्या सुमारास पाटलीपुत्र येथें राज्य करीत असलेला चंद्रगुप्त नांवाचा सामान्य राजा नांवारूपास आला. त्याचा मुलगा समुद्रगुप्त तर चक्रवर्तिच झाला. पंजाबखेरीज उत्तर हिंदुस्थानांतील सर्व प्रांत त्यानें आपल्या सत्तेखालीं आणिले. नंतर लौकरच दक्षिण हिंदुस्थान पादाक्रान्त करून त्यानें काशींत अश्वमेध केला. त्याच्या वेळेस पाडलेल्या कांहीं नाण्यांवर होमकुंड असून यज्ञाचा अश्व आहे. कांहीं नाण्यांवर राजा एका उंच

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कोचावर बसून त्याच्या हातांत वीणा असल्याचें दाखविलें आहे. त्यानें ब्राह्मणांस लक्षावधि सोन्याचांदीचीं नाणीं दिलीं. अशोकाच्या वेळेपासून मधल्या काळांत एवढें मोठें साम्राज्य कोणाचेंच झालें नव्हतें. हा कट्टर सनातनधर्मी असल्यामुळें त्यानें बौद्धांचा नाश करून पुन: वैदिक धर्माची घडी बसविली. हा प्रतापशाली राजा ३७५ मध्यें मरण पावला.

समुद्रगुप्ताचा मुलगा दुसरा चंद्रगुप्त ह्यानें सन ४१२ पर्यंत राज्य केलें. हाच विक्रमादित्य असावा. गुप्तांच्या काळीं काशीची अनेक दृष्टीनीं उन्नति झाली. वैदिक धर्माचें पुनरुज्जीवन झालें. ह्याच काळांत संस्कृत भाषेंत अनेक काव्यें, व्याकरण, कोश, यांवर अनेक ग्रंथ निर्माण झाले. ह्याच काळांत कविकुलचूडामणि कालिदास यांनी मेघदूत, रघुवंश, शाकुतल वगैरे ग्रंथ रचिले. इ. स. ५०० च्या सुमारास अमरकोश तयार झाला. गुप्तांनीं रामराज्याप्रमाणें राज्य केलें. यानें वैदिक धर्मास आश्रय दिला; पण बौद्धधर्माचा छळ केला नाहीं.

पांचव्या शतकामध्यें श्वेतहूणांच्या स्वारीमुळें इ. स. ४८० च्या सुमारास गुप्तसाम्राज्य नामशेष झालें.

इ.स. ५२८ मध्यें यशोवर्धनानें श्वेतहूणांचा पराभव करून मालव घराणें सुरू केलें व तें सार्वभौम झालें. मालव घराणें इ. स. ६०६ पर्यंत चालू होतें. यानंतर स्थानेश्वर व कनोजचा राजा श्रीहर्ष यांचा उदय झाला. हा फारच शूर व विद्वानांचा चाहता होता. त्याचा बौद्ध धर्माकडे कल असला तरी तो वैदिक धर्माला आश्रय देत असे. सर्व हिंदुस्थान त्यानें आपल्या छत्राखालीं आणिले.इ.स.६३७ पर्यंत काशी ही त्याच्या ताब्यांत होती हाच शेवटला सम्राट होऊन गेला. इ.स. ६७७ नंतर उत्तर हिंदुस्थानांत जवळ जवळ बेबंदशाहीच माजली. हर्षकाळांत अग्निहोत्री व वैदिक संन्यासीही होते. हर्षानंतर कोणी पराक्रमी सम्राट् न झाल्यामुळें हिंदुस्थानभर लहान लहान राज्यें उद्भवलीं. या कारणामुळें पुढील चारपांच शतकांच्या उत्तर हिंदुस्थानच्या इतिहासांत एकसूत्रीपणा नव्हता. हा एवढा इतिहास लिहिण्याचें कारण इतकेंच कीं,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

भारतीय युद्धापासून हर्षापर्यंत काशी ही केव्हां बौद्धधर्मीय राजांच्या ताब्यांत, तर केव्हां वैदिकधर्मीय राजांच्या ताब्यांत होती. पण काशीचें व विश्वेश्वराचें महात्म्य कधींच कमी झालेलें नव्हतें व मंदिरांचाही विध्वंस झालेला दिसत नाहीं.

याच शतकांत चिनी प्रवाशी ह्युएनत्संग हा हिंदुस्थानांत प्रवास करीत होता. त्यानें काशी व विश्वेश्वर यांचें असें वर्णन केलें आहे कीं, "मूल-स्थान ( मुलतान )* येथें सूर्याचें प्रचंड मंदिर असून त्यांत सुवर्णाची मूर्ति व त्या मूर्तीवर रत्नजडित अलंकार आहेत. याच्याच जोडीचें महत्त्वाचें मंदिर म्हणजे काशीचें देवालय होय. मोलोनिशी ( वाराणसी ) राज्याचा घेर सुमारें ६००० ली ( ८०० मैल ) आहे. पश्चिमेस गंगेच्या तीरीं या राज्याची एक सुंदर राजधानी आहे. तिची लांबी सुमारें १८ किंवा १९ ली आहे. आणि रुंदी ५ किंवा ६ ली आहे. राजधानीचे आसपास पुष्कळ खेडीं असून त्यांतील वस्ती दाट आहे. राज्यांतील लोक कुलीन असून सधन आहेत. व त्यांचे घरीं अमोल वस्तूंचा संग्रह व धान्यसमृद्धि विपुल आहे. प्रजा निष्कपटी असून चालीरीति साध्या आहेत. विद्याव्यसनी लोकांचा येथें चांगला आदरसत्कार आहे. पुष्कळ लोक ब्राह्मणधर्मानु-यायी असून कांहीं बौद्ध मतांचेही आहेत. हवा समशीतोष्ण असून सर्व प्रकारचीं धान्यें व फळफळावळ विपुल आहे. या राज्यांत बौद्धांचे तीस मठ आहेत. व त्यांत ३००० वर शिष्यवर्ग अध्ययनांत निमग्न आहेत. ब्राह्मणांचीं १०० देवालयें आहेत. खास राजधानींत २० मंदिरें आहेत. यांत

---

*मुलतान हें हिरण्यकशिपुचें ( असुर ) राज्य होतें. येथेंच नृसिंहावतार झाला. "मूलस्थान प्रसिद्ध नाम नगरी। जैसी अयोध्यापुरी। जेथें जन्म धरी नृसिंह बरवा। प्रल्हाद राखे हरी॥ असें दत्तपदांकित मुकुंद या सत्पुरुषानें वर्णन केलें आहे. मुलतानपासून ५० मैलांवरील सुलेमान पर्वताचे भागास प्रल्हादपर्वत म्हणतात. किल्ल्यांत नृसिंहमंदिर आहे.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

दररोज १०,००० शिवभक्त दर्शनास येतात, शेजारीं छायेस्तव झाडी आहे व नदी वळसा घेऊन वाहात आहे. अनेक उंच उंच मनोरे, भव्य इमारती व त्यांवर अत्युत्कृष्ट कोरीव काम केलेलें आहे. अशीं अनेक प्रेक्षणीय मंदिरें तेथें पाहण्यांत येतात. तसेंच सर्वत्र स्वच्छोदकाचे अनेक जलाशय आहेत. येथील महेश्वराचा पुतळा पितळेचा शंभर फुटास कांहींसा कमी इतका उंच आहे व तो जिवंतसा दिसतो. कांहीं लोक रस्त्यांतून अगदीं नग्न जात होते व कांहींनीं अंगास राख फासली होती. या महेश्वराजवळच स्मशान आहे."

या वर्णनावरून असें वाटतें कीं, ह्युएनत्संगला तो अनार्य असल्यामुळें मंदिरांत जाऊन शंकराचें दर्शन घेतां आलें नाहीं. कारण शास्त्रांत शंकराच्या लिंगाची पूजा व स्थापना सांगितली आहे व तसा सर्वत्र प्रघातही पण आहे. म्हणून त्याला मूळ लिंगाचें दर्शन न होतां उत्सवमूर्तीचेंच दर्शन झालें असावें. कारण तो विश्वेश्वराची मूर्ति पितळेची आहे असें म्हणतो. स्वतंत्र पितळेची उत्सवमूर्ति मनुष्यासारखी घडवून दर्शनार्थ ठेवण्याचा प्रघात अजून सर्व ठिकाणीं चालू आहे. दुसरी गोष्ट अशी कीं, मूर्तीची उंची शंभर फूट तो लिहितो; यावरूनही रथावर ठेवलेली उत्सवमूर्ति त्यानें पाहिलेली असावी. तें कांहीं असो. सातव्या शतकांत विश्वेश्वरमंदिर होतें हें निश्चित यांत संशय नाहीं. या वेळेस काशींत तीसपस्तीस बौद्ध मठ व विहार होते व शंकराचीं देवालयें होतीं. मगधांत पूर्णवर्मा नांवाचा मौर्यराजा होता.

याच शतकांत कुमारिलभट्टांचा उदय होऊन त्यांनीं बौद्ध मताचें खंडन केलें व वैदिक धर्माची स्थापना केली. बौद्धावर चिडून सरसकट संन्यासमार्गाचेंही खंडन केलें.

पुढें शंकराचार्यांचा अवतार होऊन त्यांनी कुमारिलभट्टांचें कर्मकांड मान्य करून वैदिक संन्यासधर्म चालू केला व चारी दिशांस चार मठ स्थापून वैदिक धर्माचा प्रचार केला.

ते चार मठ शृंगेरी ( दक्षिण ) द्वारका ( पश्चिम ) बदरीकेदार ( उत्तर ) जगन्नाथ ( पूर्व ) ह्या ठिकाणीं स्थापन केले. त्या मठांस पुरुषत्वेंकरून

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

चार सांप्रदायांचा प्रारंभ केला. त्या चार सांप्रदायांचीं नांवें प्रकाश, आनंद, स्वरूप, व चैतन्य अशीं आहेत. याच सांप्रदायांतील कांहीं लोक स्वतंत्र मठ स्थापन करून आपल्या संप्रदायाचें विशिष्ट नांव ठेवून पुढें आपल्या मुख्य संप्रदायाचें नांव घालतात. ब्रह्मानंद, केशवचैतन्य, स्वयंप्रकाशानंदसरस्वती इत्यादि. रंगनाथप्रभृति महाराष्ट्र संत कोणत्या तरी एका शांकरसांप्रदायाचे अनुयायी आहेत. श्रीसमर्थांनी "स्वरूपसंप्रदाय अयोध्यामठ" असें म्हटलें आहे. यावरून समर्थ आचार्यांच्या स्वरूप सांप्रदायांत राहून आपल्या श्रीरामाची जी अयोध्या तिलाच आपला मठ समजतात असें वाटतें. त्यांचे वेळेस शांकरमठांतील आचार्य धार्मिक प्रचाराबद्दल उदासीन असल्यामुळें आपल्या स्वतंत्र मठाची त्यांनीं स्थापना केली असें तर नसेल ना ?

शंकराचार्य आपल्या शारीरकभाष्यांत देवताधिकरणांत "पूर्णवर्मा" "पाटलीपुत्र" "या वेळेस कोणी सार्वभौम राजा नाही" "वर्णाश्रमधर्म पूर्वीसारखा नाहीं" वगैरे वगैरे गोष्टींचा दृष्टांत म्हणून उल्लेख करतात. यावरून त्या वेळच्या राजकीय व धार्मिक परिस्थितीवरहि थोडा प्रकाश पडतो. कांहीं दिवस त्यांचा वास काशीस झाल्यामुळें तेथें बौद्धधर्म अजिबात गाडला गेला.

हर्षाला कोणी वारस नसल्यानें अस्वस्थता माजली होती. सातव्या शतकाच्या अखेरीस कनोजमध्यें मौखरी घराण्यापैकीं यशोवर्मा नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याच्या ताब्यांत काशी होती. त्याच्या कारकीर्दीत वैदिकधर्माचा उत्कर्ष व बौद्धधर्माचा ऱ्हास झाला.

इ. स. ७४१ चे सुमारास काश्मीरचा राजा कर्कोटक घराण्याचा ललितादित्य याच्याशीं त्याचें युद्ध होऊन त्यांत यशोवर्मा मारला गेला व कनोजचें राज्यही नष्ट झाल्यासारखें झालें व त्यामुळें काशीवरूनहि त्यांचा अधिकार गेला. याच धामधुमीचे वेळीं हैहय वंशांतल्या राजांनीं येथें चंचुप्रवेश करण्यास सुरुवात केली. याच वंशांतल्या कर्णदेव नांवाच्या राजानें काशींत

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कर्णमेरू या नांवाचें मंदिरहि बांधलें होतें. प्रबंधचिंतामणि नांवाच्या ग्रंथांत याला काशिराज म्हटलें आहे. व याच्या वेळचीं बरींच ताम्रपत्रेंहि उपलब्ध आहेत. याला 'यशःकर्ण' नांवाचा मुलगा व 'गयकर्ण' नांवाचा नातु होता. हे दोन प्रबल राजे झाल्यानंतर त्यांचें राज्य जवळ जवळ नष्टच झालें.

कनोजमध्यें मौखरी वंशाचा यशोवर्मा मारला गेल्यावर कांहीं वर्षांनंतर तेथें हळु हळू प्रतिहार जातीच्या लोकांनीं राज्यस्थापनेस सुरवात करून त्याला बरेंच नांवारूपाला आणलें.

१०२७ त काशी हा गौडचा भाग झाला. त्यांचा शास्ता महिपाल होता. त्याचे वंशज स्थिरपाल व वसंतपाल यांच्या कारकीर्दीत बौद्धधर्म सरसावला. कांहीं कालानंतर चंद्रदेव राठोड नांवाच्या राजानें पूर्वीच्या पाल वंशाला नष्ट करून स्वतः राज्य बळकावलें व युक्तिप्रयुक्तीनें राज्य बळकावीत काशीवर आपला अधिकार स्थापित केला. तो हिंदुधर्माभिमानी असल्यानें त्यानें बुद्ध देवळांच्या सामानानें आदिकेशव व आदिविश्वेश्वर यांचीं मंदिरें बांधलीं. याचा मुलगा गोविंदचंद्र त्याचा विजयचंद्र व त्याचा जयचंद्र. (जयचंद) हाच कनोजचा शेवटचा प्रभावशाली राजा झाला.

याचीं व याच्या वडील व आजाच्या वेळचीं बरींच दानपत्रें काशींत मिळतात. यानें राजसूय यज्ञ केला व त्याच निमित्तानें पृथ्वीराज चव्हाणाशीं वैमनस्य उत्पन्न झालें. त्याचा परिणाम असा झाला कीं महंमद घोरी यानें दोघांच्या आपसांतील वैमनस्याचा फायदा घेऊन दोघांनाहि ठार केलें.

यावेळीं काशी इतकी समृद्ध होती कीं, महंमद घोरीला येथील लूट नेण्यास चौदाशें उंट लागले. याप्रमाणें राठोडांचें राज्य गेल्यानंतर त्यांच्याच वंशांतल्या एका राजपुत्रानें कांहीं वर्षांनीं काशींत आपलें राज्य स्थापिलें. यानंतर क्रमानें त्यांच्याच वंशांतील अकरा राजांनीं येथें राज्य केलें. याच वंशाला पुढें बुंदेल वंश म्हणूं लागले. यांतील शेवटला राजा कर्ण याचा मुलगा अर्जुनपाल यानें मात्र काशी सोडली. कारण त्या वेळेस इ. स. १३९९ च्या सुमारास मुसलमानांची [illegible] काशीवर आली. यानंतर बऱ्याच काळपर्यंत मुसलमानांचें राज्य काशीवर चालू झालें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## मुसलमानकालीन काशी ११९३

११९३ त शहाबुद्दीन घोरीनें, मुसलमानांना राज्यप्रसाराइतकाच धर्मप्रसार प्रिय असल्यानें हिंदूंचीं धर्मक्षेत्रें भ्रष्ट करून मंदिरांचा विध्वंस केला. त्याच वेळेस काशी हें हिंदूंचें धर्मक्षेत्र म्हणून तेथील विश्वेश्वराचा व एक हजार मंदिरांचाही त्यानें विध्वंस केला. तेव्हांपासून इंग्रजांच्या ताब्यांत जाईपर्यंत काशी मुसलमानांचे सत्तेखालीं होती. या वेळेपासून या काशी क्षेत्राला ‘ बनारस ’ असें नांव सर्वत्र चालू झालें. हें नांव पडण्याचें कारण असेंहि सांगण्यांत येतें कीं, येथें एक चंद्रवंशी राजा राज्य करीत असे. तो मुसलमानांचा पक्का द्वेष्टा असल्यामुळें सर्व लोक त्याला “ यवनारि ” म्हणत. हें नांव ‘यवनार’ या रूपांत सर्व ओळखीत असत. पुढें पुढें हिंदुस्थानी लोक ‘व’ चे ठिकाणीं ‘ब’ म्हणत असल्यामुळें ‘ यबनार ’ असा त्याचा अपभ्रंश झाला. नंतर ‘ य ’ जाऊन शेवटीं ‘ स ’ आला व ‘ बनारस ’ असें नांव पडलें व तेंच आजतागायत सर्वत्र रूढ आहे. तात्पर्य, ११९३ पर्यंत विश्वेश्वराचें मंदिर होतें. पुढें ११९४ पासून उत्तर हिंदुस्थान पूर्णपणें मुसलमानांच्या सत्तेखालीं गेल्यानें दिल्लीच्या गादीवर अनेक मुसलमानी घराण्यांनीं राज्य केलें. त्या सर्वांनीं हिंदूंचा, त्यांच्या धर्मक्षेत्रांचा व देव मंदिरांचा अनन्वित छळ व विध्वंस केला. त्याप्रमाणें काशीचा व विश्वेश्वरमंदिराचाहि विध्वंस केला. तेव्हांपासून नारायण भट्टापर्यंत ( म्हणजे १५८५ पर्यंत ) विश्वेश्वरमंदिर नव्हतें. तरी पण भाविकांची काशीयात्रा चालूच होती. कारण हें क्षेत्र विश्वेश्वरामुळें प्रसिद्धीस आलेलें नसून स्वतःच तें प्रसिद्ध व पवित्र आहे. धार्मिकविधींत काशीयात्रा ही प्रमुख असून विश्वेश्वरदर्शन व पूजन तिचें अंग आहे. म्हणून नारायण भट्टांनीं ‘ त्रिस्थली सेतु ’ नामक आपल्या ग्रंथांत असें लिहिलें आहे कीं, “ अनेक वेळां दुष्ट यवनांच्या अत्याचारामुळें लिंगाची किंवा मूर्तीची नेआण झाली तरी ज्या जागेवर जें लिंग असेल किंवा मूर्ति असेल त्याची किंवा नुसत्या जागेचीच पूजाअर्चा वगैरे करावी ” यावरून असें सिद्ध होतें कीं, पूर्वीं मुसलमान देवळें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पाडून ठेवीत व त्याच सामानानें जवळ किंवा दुसरीकडे मशिदी बांधीत त्यामुळें हिंदु त्या जागेवर पुनः देऊळ बांधून मूर्ति बसवीत किंवा नुसत्या जागेचीच पूजा करीत. ही गोष्ट औरंगजेबाचे लक्षांत येऊन देवळाचे जागेवर किंवा मंदिरावरच तो मशिदी बांधूं लागला असावा. या कल्पनेची साक्ष अजून विश्वेश्वराजवळची मशीद देत आहे.

इ. स. १५२६ त बाबरनें मोंगलशाहीला प्रारंभ केला. १५२८ त या प्रांतावर चढाई करून सुलतान जलालउद्दीन या नांवाचा एक अधिकारीही नेमला. पण त्याचा अफगाणांपुढें टिकाव न लागल्यानें तो पळून गेला. नंतर बाबर व त्याचा मुलगा हुमायून या दोघांनीं बऱ्याच वेळां अफगाणांना जिंकून आपला अधिकार स्थापित केला. पण शेरखान नांवाच्या अफगाणानें, नेमलेले अधिकारी अनेक वेळां मारून आपला अधिकार स्थापला. शेवटीं १५४० त कनोज येथें जोराची लढाई होऊन शेरखानानें हुमायूनला हिंदुस्थानांतून पळवून लाविलें. पुढें १५६५ पर्यंत शेरशहा आणि सूरीवंश यांच्या अधिकाराखालींच काशी होती. त्याच वर्षी स्वतः अकबर आला व त्यानें काशी हस्तगत करून तिची उत्तम व्यवस्था बांधून दिली, परंतु तो परत जातांच काशींत बंड झालें व काशींतील लोकांनीं बंडवाल्यांस साहाय्य केलें. पण १५६७ त अकबरानें पुनः काशींत येऊन स्थिरस्थावर केलें व बंडांत काशीकर सामील झाले या रागानें त्यानें काशी मनमुराद लुटली. मग मात्र काशींत दंगेधोपे झाले नाहींत; उलट काशीची भरभराटच झाली. अकबर हा राजकारणी व परधर्मसहिष्णु असत्यामुळें त्याच्या काळांत किती तरी मंदिरें बांधलीं गेलीं. उदाहरणार्थ, हिमालयांतील कांगडा जिल्ह्यांतील 'भवन' येथील वज्रेश्वरीचें देऊळ १००९ मध्यें मोहंमदानें पाडलें. त्यानंतर तें अनेक हिंदूकडून बांधलें गेलें व मुसलमानांकडून तें पुष्कळ वेळां पाडलें गेलें. अकबराचे वेळेस राजा धर्मचंदानें अकबराकडून मंजुरी मिळवून तें पुनः बांधलें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

माळव्याच्या भोजानें बांधलेलें सोमनाथाचें लांकडी मंदिर १०२९ त मोहंमदानें पाडलें. तें ११६९ त काशीच्या एका ब्राह्मणानें पुनः दगडी बांधलें. मुसलमानांनीं पाडलेल्या सर्व मंदिरांची स्थापना करीत हा ब्राह्मण सर्व हिंदुस्थानांत हिंडत असे, असें मुसलमानांनीं इतिहासांत लिहिलें आहे. पण या काशीकर महापुरुषाचें नांव मात्र कुठेंही दिलें नाहीं. पुढें हें मंदिर चौदाव्या शतकांत गुजराथच्या मुसलमान राजानें पाडलें. तें १७८५ त अहिल्याबाईनें पुनः बांधलें. तात्पर्य, अकबराच्या कारकीर्दींत हिंदूंना थोडे दिवस सुखाचे दिसले. त्या वेळेस राजा मानसिंहानें बांधलेलें "मान मंदिर" (वेधशाळा) काशींत प्रसिद्ध आहे. अकबराचे पूर्वीं किती तरी वेळां विश्वेश्वराचें देऊळ पाडलें गेलें असेल व बांधलें गेलें असेल. पण अकबराचे वेळीं विश्वेश्वराचें देऊळ नव्हतें हें मात्र निश्चित.

## श्रीविश्वेश्वर स्थापना १५८५ इ. सन

नारायणभट्टांचा जन्म सन १५१३ च्या सुमारास झाला. त्यांच्या असाधारण पांडित्याची व वैराग्याची कीर्ति राजा तोडरमल्ल याच्या कानावर गेलेली होती. स. १५८० त राजा तोडरमल्ल एका स्वारीहून दिल्लीला परत जात असतां तो अतिशय धार्मिक असल्यानें काशींत त्यानें थोडा मुक्काम केला. त्या अवधींत नारायणभट्टांनीं त्याची गांठ घेऊन विश्वेश्वराचें मंदिर बांधण्याची परवानगी मिळवून देण्याकरितां आग्रह केला. अकबर परधर्मसहिष्णु असल्यानें म्हणा किंवा राजकीय दृष्ट्या हिंदूंना न दुखविण्याची त्याची राजनीति असल्यानें म्हणा देवळाची गोष्ट तोडरमल्लानें मान्य केली. त्याप्रमाणें दिल्लींत जाऊन अकबराकडून काशींतील मुसलमान सरदारास हुकूम पाठविला कीं नारायण भट्ट म्हणतील त्याप्रमाणें व्यवस्था करावी. मंदीर बांधण्यास लागणारा पैसा सरकारी खाजन्यांतून द्यावा. हा अकबराचा हुकुमनामा ('इंडियन अँटिक्वरी' मासिकाच्या १९१२ च्या जानेवारीचा अंक) हल्लीं उपलब्ध आहे. त्यांत या मंदिरास एकंदर

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

४५००० दीनार खर्च आला असा उल्लेख आहे. हल्लीं ज्या प्रचंड मंदिरावर मशीद उभारली आहे तें मंदिर सन १५८५ मध्यें बांधून पूर्वी लपवून ठेविलेलें शिवलिंग नारायणभट्टांनीं त्यांत यथाविधि स्थापन केलें. ती जागाही पूर्वींच्याच देवळाची होती. त्या वेळेस नारायणभट्टांचें वय अदमासें ७० वर्षांचें होतें. पुढें सन १५९५ मध्यें नारायणभट्ट कैलासवासी झाले.

त्या प्रांतांत अवर्षण झाल्यामुळें तोडरमल्लाच्या सांगण्यावरून नारायणभट्टांनीं अनुष्ठान करून पाऊस पाडला. त्यामुळें अकबराकडून मंदिराची परवानगी मिळविली व भट्टांच्या म्हणण्यावरूनच सूर्योदयापूर्वी गंगास्नानास जाण्याकरितां असलेली बंदी उठविली. तोडरमल्लानें काशींत श्राद्धाचे वेळीं आपल्या पूर्वजांचें दर्शन करविण्याबद्दल आग्रह धरला असतां भट्टांनीं त्यांचें दर्शन करविलें. त्यावरून प्रसन्न होऊन तोडरमल्लानें कांहीं मागावें असा आग्रह केला तेव्हां विश्वेश्वरमंदिर बांधण्यास सांगितलें. वगैरे अशा अनेक दंतकथा आहेत पण भट्टांनीं देऊळ बांधून स्थापना केली ही गोष्ट मात्र निर्विवाद आहे. तेव्हांपासून ८४ वर्षेंपर्यंत मंदिर होतें.

सन १६६९ सप्टेंबरमध्यें शिवाजीमहाराज आग्र्याहून निसटल्यामुळें चिडून अवरंगजेबानें कांहीं ना कांहीं निमित्त उकरून काढून हिंदूंच्या अनेक क्षेत्रमंदिरांचा विध्वंस केला. त्याच वेळेस काशींतील बिंदुमाधवाचें व विश्वेश्वराचें देऊळ पाडून त्यावरच मशिदी बांधल्या. अशाच प्रकारें अनेक देवळें पाडून जागोजागीं अनेक मशिदी बांधल्या व काशीचें नांव महंमदाबाद असें ठेविलें पण तें चालू झालें नाहीं. या सपाट्यांतून भैरवनाथांचें देऊळ कसें सुटलें हें एक आश्चर्य आहे.

देवळांतून भुंगे निघाले म्हणून तें पाडलें नाहीं अशी एक दंतकथा सांगतात पण तिला ऐतिहासिक पुरावा नाहीं. आम्हाला असें वाटतें कीं, भैरवनाथांची मूर्ति बाकींच्या मूर्तींप्रमाणें डोळ्यांत भरण्यासारखी नाहीं. ती एक उभा व रुंद पाषाण स्वरूपाची आहे. त्या पाषाणावरील मूर्तीचा आकारही अस्पष्टच आहे. हल्लीं त्या मुख्य स्वरूपावर वर चांदीचा किंवा

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

सोन्याचा मुखवटा लावतात. त्या वेळेस मुखवटा लावण्याची चाल नसावी; म्हणून तिकडे यवनांचें लक्ष गेलें नसावें. देऊळही लहानच होतें. हल्लींचें मोठें देऊळ विंचुरकरांनीं बांधलें आहे. यावरून त्या वेळेस भैरवनाथमंदिर पाडलें गेलें नाहीं. खरें कारण भैरवनाथच जाणे! असो.

अवरंगजेबापासून स. १७१९ पर्यंत काशींत राजकीय दृष्ट्या विशेष असें कांहींच घडलें नाहीं. या सालीं अवरंगजेबाचा एक पणतु फर्रुखसेयर यास त्याच्या हाताखालच्या सय्यदांनीं ठार मारून महम्मदशहास तक्तावर बसविलें तेव्हां त्यानें नबाब मूर्तजाखान नांवाच्या सरदाराला जहागिरींत बनारस दिलें. त्या सरदारानें मीर रुस्तम अलीखान नांवाच्या गृहस्थाला त्याचेकडून कांहीं ठराविक कर घेण्याचें ठरवून काशी त्याच्या स्वाधीन केली. या रुस्तमअलीजवळ गंगापूर नांवाच्या गांवीं राहणारा, भूमीहार जातीचा 'मनसाराम' नांवाचा एक ब्राह्मण नोकर होता. त्यानें आपल्या बुद्धिचातुर्यानें रुस्तमअलीस वश करून ठेविलें होतें. हा रुस्तमअली विशेष चतुर नसल्यामुळें त्याचेंवर मनसारामाचें भारीच वजन असे. स. १७३८ त जहागिरीचा मालक महम्मदशहा याजकडून जहागिरीचा हिशोब तपासण्याकरितां सफदरजंग नांवाचा एक अधिकारी काशींत गेला. हिशोबांत बरीच गडबड दिसली म्हणून तो रागावला. त्याला शांत करण्यासाठीं रुस्तम अलीनें मनसारामालाच पाठविलें. मनसाराम तेथें जाण्याचा परिणाम असा झाला कीं, रुस्तमअलीच्या हातून काशीची जहागीर काढून घेऊन त्या जागीं मनसारामाचा मुलगा बलवंतसिंह याची नेमणूक झाली. या वेळीं बलवंतसिंहाचें वय फक्त २६ वर्षांचें होतें. पुढें एक वर्षानें मनसाराम वारला व महम्मदशहा बादशहाकडून बलवंतसिंहास "राजा" ही पदवी मिळाली. या वेळपर्यंत काशींतील अधिकारी केवळ जहागिरीची व्यवस्था पाहणारे म्हणून होते. त्यांच्या डोक्यावर एखादा मुसलमान अधिकारी असेच. परंतु आतां मात्र राजा बलवंतसिंहानें हळू हळू थोडा थोडा प्रदेश दाबण्यास सुरुवात केली. त्यामुळें वरच्या अधिकाऱ्यांशीं अनेक झगडे

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

व प्रसंगविशेषीं युद्धाचेही प्रसंग येत. परंतु राजा बलवंतसिंहानें प्रत्येक वेळीं केव्हां कांहीं देऊन तर केव्हां लढून तर केव्हां चार गोड गोष्टी सांगून अनेक प्रसंग चातुर्यानें निभवून नेले. आपलें गंगापुरचें ठिकाण धोक्यांत आहे असें समजून गंगेच्या पलीकडे रामनगरीं एक चांगला मजबूत किल्ला स. १७५३ च्या सुमारास बांधला. यालाच हल्लीं व्यास काशी म्हणतात. हा किल्ला बांधतांना पूर्वी मीर रुस्तम अलीनें मीर घांटावर एक किल्ला बांधण्यास सुरुवात केली होती व त्याचा धक्काही बांधला होता. हा किल्ला शेवटीं पूर्ण झाला नाहीं. त्यांतलेंच बरेंचसें सामान बलवंतसिंहानें उपयोगांत आणिलें. हल्लीं त्या धक्क्याला 'मीरका पुश्ता' असें म्हणतात.

स. १७४८ त महंमदशहा वारून अहमदशहा बादशहा झाला, वजीर सफदरजंग झाला. स. १७५१ च्या फेब्रुवारींत रोहिल्यांनीं प्रयाग काशीवर चाल करून धुमाकूळ उडवून दिला. "ब्राह्मणभोजन होत होतें एवढ्यामध्यें बापुजीपंत हिंगण्याचें पत्र जे (किं) पठाण प्रयागास आले. नवें शहर लुटलें. बायका बंद नेल्या. काशीमध्यें मोठा आकांत झाला. दोन दिवस शहरांत दिवा लागत नाहीं. दहा दिवस काशीमध्यें मोठा आकांत जाहला. ऐशी रुपये गाडीचें भाडें पाटण्याचें झालें. ओझ्यास मनुष्य मिळेना. मनुष्य निघोन ज्यास जिकडे वाट फावेल तिकडे गेले. तव पठाणास वर्तमान कळलें. तेव्हां त्यानें साता सावकारांचे नांवें परवाने पाठवले जे ( किं ) तुम्ही कां पळता. मी पातशाही बंदा आहें. शहर लुटावयासी आलों नाहीं. रयतेशीं काय आहे. लोकांस दिलासा देऊन शहरांत सुखरूप राहणें. तरी लोक बहुत गडबड करून गेले आहेत. विश्वेश्वर काय करील तें खरें!" (बाळकृष्ण दी. पाटणकर पत्र) ही सर्व धामधूम फरुखाबादचा नवाब अहंमदखान बंगश यानें उडविली होती. काशीचा राजा बलवंतसिंह यानें प्रयाग येथें अहंमदखानास भेटून सात लक्ष दंड भरून काशींत स्वस्थता केली. पुढें रोहिल्यांचे व मराठ्यांचें युद्ध झालें.

१७५४ त अहमदशहा स्थानभ्रष्ट झाला व दुसरा आलमगीर याची स्थापना

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

झाली. मीर शहाबुद्दीन हा वजीर झाला. १७६४ त सफदरजंग मेला. त्याचे जागीं त्याचा मुलगा सुजाउद्दौला आला; हा अयोध्या प्रांताचा सुभा होता. त्याचे ताब्यांत काशी गेली. तो नेहमीं मराठ्यांच्या नाशाविषयीं उद्युक्त असे. पण तो पेशव्यांना वचकत असे. १७५५ त गोविंद बल्लाळानें पुण्यास लिहून कळविलें कीं, "काशींत आपली फौज राहील तोंपावेतों भय नाहीं. फौज दूर गेली कीं नबाबाचा चणारडी (चुनारगड) काशीच्या उरावर आहे. मोठें भय आहे. काशीच्या राजानें श्रीमंतांस व वाडिलांस लिहिलें आहे ब्राह्मणांस वांचवून आपलें होईल तर उत्तम आहे. काशी लुटूं पाहतो, राजा आहे म्हणून वांचलों आहों. अयोध्येकडे श्रीमंतांच्या फौजा उतरल्यानें सर्वही कामें होतील. या कामास अंतर तरी लक्ष ब्राह्मण मरतील. यशही मोठें होईल." या पत्रावरून राजा बलवंतसिंहाचा पेशव्यांशीं पत्रव्यवहार चालू होता असें दिसतें. पेशव्यांच्या भरंवशावर तो सुजाउद्दौलाशीं बरोबरीच्या नात्यानें वागूं लागला, हें त्याचें वर्तन त्याच्या वरिष्ठ मुसलमान अधिकाऱ्यांना सहन न होऊन त्यांनीं पुष्कळ वेळां बलवंतसिंहाला पकडून कैद करण्याचा विचार केला; पण कोणाच्या ना कोणाच्या तरी मध्यस्थीनें तसें घडून आलें नाहीं. स. १७६७ त तर स्वतः लार्ड क्लाईव्हनेंच कैद करूं दिलें नाहीं. एकंदरींत याचा परिणाम असा झाला कीं, बलवंतसिंह हा जहागिरीचा व्यवस्थापक व नांवाचा राजा न राहतां आतां तो जवळ जवळ काशीचा खरा राजाच झाला. स. १७७० त राजा बलवंतसिंह वारला, चेतसिंह हा अविवाहित स्त्रीचा मुलगा असल्यामुळें आपल्या पश्चात् पुतण्या मनियारसिंह यालाच गादी मिळावी अशी बलवंतसिंहाची फार इच्छा होती; परंतु अनेक कारस्थानी लोकांच्या मदतीनें त्या जागीं राजा चेतसिंहच आला. स. १७७४ त नवाब सुजाउद्दौला मरून त्याचा मुलगा आसफउद्दौला गादीवर बसला. याच्याशीं कंपनी सरकारचा संधि झाल्यामुळें नबाबाशीं आतांपर्यंत चेतसिंहाचा जो नांवापुरता संबंध होता तोच आतां कंपनी सरकारशीं झाला.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

म्हणजे नबाबास जो वार्षिक कर द्यावा लागत असे तो चेतसिंहाकडून कंपनी सरकार घेऊं लागलें. त्या वेळीं हिंदुस्थानचा राज्यकारभार पाहण्यास गव्हर्नर जनरलला सल्ला देणारें कौन्सिल कलकत्त्यास होतें. त्या कौन्सिलांत जो पक्ष प्रबळ असेल त्याला खुष ठेवण्याचा प्रयत्न चेतसिंह नेहमीं करीत असे. स. १७७८ त ठराविक करापेक्षां ५ लक्ष रुपये सरकारनें जास्त मागितले. ते मोठ्या जबरदस्तीनें चेतसिंहानें दिले. त्याच्या पुढील वर्षीही तशीच मागणी आली पण तो देईना. म्हणून कंपनीनें फौज पाठवून मागणी वसूल केली. तिसऱ्या वर्षीं ५ लाख रुपये व दोन हजार घोडेस्वार मागितले. चेतसिंहानें ही गोष्ट नाकारली. तेव्हां स्वतः वॉरन हेस्टिंग्ज काशीस गेला. त्या वेळेस चेतसिंहानें त्याची प्रत्यक्ष भेट घेतली पण त्यांत कांहीं निष्पन्न झालें नाहीं. तेव्हां चेतसिंहाला कैद करण्याकरितां वॉरन हेस्टिंग्ज यानें काशींतील रेसिडेंट मार्क ह्यॅम यास चेतसिंहाला त्याच्या शिवालय घाटावरील राजवाड्यांत जाऊन कैद करण्याचा हुकूम केला, त्याप्रमाणें मार्क ह्यॅम राजवाड्यावर चालून गेला असतांना राजाच्या प्रजेस ही गोष्ट सहन न होऊन सर्व एकत्र होऊन कंपनीच्या फौजेवर चालून गेले व तिची काशींतल्या गल्ल्यांतून भयंकर कत्तल केली. हें वर्तमान ऐकून हेस्टिंग्जनें त्याच्या मदतीकरितां मेजर पोफॅम यास आणखी फौज देऊन पाठविलें व स्वतः वॉरन हेस्टिंग्ज रातोरात पळून गेला. त्या प्रसंगामुळें काशींत एक हिंदी म्हण पडली ती अशी— "घोडे-पर हौदा, हाथीपर जीन, जल्दीसे भाग गया वॉरन हेस्टिन." वेणी-राम पंडित व विश्वंभर पंडित या दोन भावांनीं बंद पालखींतून हेस्टिं-ग्जला चुनारच्या किल्ल्यांत पोंचविलें याबद्दल त्यांना सालीना २५०००ची जहागिर देण्यांत आली. इकडे पाठविलेल्या फौजेचाही विशेष उपयोग झाला नाहीं. कारण बाहेर ही गडबड चालू असतां चेतसिंह आपल्या राण्यांसहवर्तमान हुजऱ्यांच्या पागोट्यांचा दोर करून खिडकींतून खालीं उतरून नावेंतून रामनगरीं गेला व तेथून [illegible] किल्ल्यांत

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

गेला, ही बातमी हेस्टिंग्जला कळतांच त्यास थोडें अवसान आलें व त्यानें किल्ला लुटण्याकरितां फौजेस हुकूम दिला. इकडे चेतसिंह तेथून पळून ग्वाल्हेरला शिंद्यांच्या आश्रयास राहिला व तेथेंच त्याचा अंत स. १८१० त झाला.

नंतर बलवंतसिंहाचा नातू (मुलीचा मुलगा) महीप नारायणसिंह यास कंपनी सरकारनें गादीवर बसविलें व त्याचेकडून वार्षिक चाळीस लाख रुपये घेण्याचें ठरविलें व त्याचे दिवाणी फौजदारी हक्क काढून घेऊन तेथें आपला एक मॅजिस्ट्रेट नेमला. ही व्यवस्थाही फार दिवस टिकली नाहीं. स. १७९४ त काशी व इतरही ठिकाणें त्याच्या हातून काढून घेऊन तो राहात होता तो फक्त रामनगरचा किल्ला त्याच्या हातीं ठेवला. महीप नारायणांचे चिरंजीव उदित नारायण व त्यांचे दत्तकपुत्र ईश्वरीप्रसाद नारायण त्यांचे पुत्र प्रभुनारायण. यांना १९१२ त पुनः दिवाणी फौजदारी अधिकार मिळाला. त्यांचे औरस चिरंजीव आदित्य नारायण. त्यांचे दत्तक विभूति नारायणसिंह. हे हल्लीं १२ वर्षें वयाचे आहेत. याप्रमाणें १७९४ त काशीवर इंग्रजांचा पूर्ण अधिकार झाला. यापुढें राजकीय दृष्ट्या महत्वाची अशी एकही घडामोड काशींत झाली नाहीं. स. १८०९ त विश्वेश्वराच्या मंदिराजवळ हिंदुमुसलमानांचा मोठा दंगा झाला. सरकारच्या साहाय्यामुळें मुसलमान बचावले. स. १८५७ त क्रांतियुद्ध झालें. त्यांत काशीचा संबंध बराच होता. काशींतील हिंदुस्थानी पलटण व लोकही इंग्रज सरकारच्या विरुद्ध झाले. पण कोणाचेंही पाठबळ नसल्यामुळें कांहीं करूं शकले नाहींत.

## महाराष्ट्रीय वीरांचे काशी घेण्याबद्दलचे प्रयत्न.

सन १६६६ मध्यें प्रथमतः शिवाजी महाराज आग्र्याहून निसटले ते काशीस येऊन अशी घाटावर राहिले. त्या अज्ञानवासांत देखील ते तीर्थविधि करण्यास गागाभट्टांशीं भेटण्यास विसरले नाहींत. स्वतःचा अज्ञातवास, अवरंगजेबाचा सर्वतोमुखी उदयकाळ व स्वतःच्या राज्याची नीट न बस-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

लेली घडी या कारणत्रयीमुळें काशींतील यावनी सत्ता त्यांच्या हृदयाला टोंचत असली तरी ते राजकीयदृष्ट्या काशींत कांहीं करूं शकले नाहींत. पुढें हिंदूंच्या दुर्दैवामुळें महाराजांना उत्तर हिंदुस्थानांतील स्वराज्य स्थापनेचें कार्य न करतांच देह सोडावा लागला. पुढें पेशव्यांनीं महाराजांची इच्छा पूर्ण केली असती. पण पानिपतसंग्राम मराठ्यांच्या आंगलट आल्यानें तें कार्य तसेंच राहिलें. नंतर मोठ्या बुद्धिमत्तेनें व पराक्रमानें मराठी राज्याची घडी त्यांनीं बसविली; पण पुढें पुढें अन्तःकलहामुळें स्वतःचेंच राज्य संभाळणें कठीण झालें. मग उत्तरहिंदुस्थानाकडे कोण बघतो! तरी पण काशी व प्रयाग मुसलमानांकडून परत घेण्याबद्दल पेशव्यांनीं खटपट चालूच ठेविली होती. ( १ ) सन १७७२ त थोरले माधवरावसाहेब यांनी आपल्या मरणाच्या थोडे अगोदर राज्यांतील प्रमुख मुत्सद्द्यांकडून अंमलबजावणीबद्दल ज्या शपथा घेवविल्या त्या नऊ कलमी यादींत "काशी व प्रयाग सरकारांत ( मराठी साम्राज्यांत ) यावी. त्याबद्दल दहावीस लक्षांची जहागीर मुबदला पडली तरी हरकत नाहीं. प्रयत्न करावा. काशींत दोन लक्ष ब्राह्मणभोजन करावें. दक्षणा दोन पैसेप्रमाणें. काशीचे ब्राह्मणांस वर्षासनें आहेत तीं देऊन वर्षास पावतीं करीत जावीं" असा स्पष्ट उल्लेख आहे.

नाना फडणिसांनींहि महादजी शिंदे यांचें वजन उत्तर हिंदुस्थानांत असल्यानें त्यांच्या मार्फत काशी आपल्या ताब्यांत घेऊन मशीद पाडून पुनः मंदिर बांधण्याकरितां पुष्कळ प्रयत्न केले पण ते सर्व अनेक कारणांमुळें निष्फळ ठरले.

सन १७४८ च्या सुमारास नानासाहेबांनीं उत्तर हिंदुस्थानांत स्वारी केली त्या वेळेस ते काशी आपल्या ताब्यांत घेण्याची इच्छा धरून काशीजवळ आले. तेव्हां अयोध्येचा नबाब सफदरजंग यानें काशीच्या ब्राह्मणांना भीति घातली कीं, " तुम्हीं आपल्या ब्राह्मण राजास मागें फिरवा नाहींतर तुम्हांस बाटवून मुसलमान करूं. " यावर नारायणदीक्षित पाटणकर यांना पुढें करून चारशें काशीकर ब्राह्मण श्रीमंतांकडे आले व त्यांना विनंति

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

केली कीं, " तुम्हीं काशी घेतली तर इतके ब्राह्मण आज जुलमानें बाटवले जातील " तेव्हां " ब्राह्मणांस माझेमुळें त्रास होत असेल तर मी काशीस येत नाहीं मात्र मला गंगास्नान घडावें " असें उत्तर दिलें. नंतर ब्राह्मणांच्या घोळक्यांतून जाऊनच श्रीमंतांनीं गंगास्नान केलें.

या प्रकरणाला उद्देशून तत्कालीन परिस्थिति लक्षांत न घेतां बरेच नवीन इतिहासलेखक काशीकरांवर मूर्ख, बुद्धिमंद, स्वातंत्र्यद्रोही वगैरे शब्दांनीं टीकेची झोड उठवितात. परंतु काशीकर ब्राह्मणांबरोबर बाजीरावांचे गुरु नारायणदीक्षित पाटणकर हेहि होते, हें विसरतां कामा नये. या सर्वांना देशस्वातंत्र्य किंवा धर्म यांचा अभिमान नव्हता व काशी पेशव्यांच्या ताब्यांत जाऊं नये असें वाटत होतें, असें कसें म्हणतां येईल ?

स्वराज्यस्थापक शिवाजीमहाराजांना राज्याभिषेक करण्याकरितां गागाभट्ट हे मुद्दाम काशीहून गेले होते. यावरून काशीकर पंडित हे स्वातंत्र्यप्रिय होते हें उघड आहे.

ब्राह्मण आडवे येण्याचें कारण आम्हांला असें वाटतें कीं, त्या वेळेस उत्तरहिंदुस्थानावर पेशव्यांची सत्ता मुळींच नव्हती व पुणें हें फार दूरच्या पल्ल्यावर होतें म्हणून नानासाहेब परत गेल्यावर आमचा भयंकर छळ होईल व सध्या असलेल्या सवलतीहि नबाब काढून घेईल या भीतिनें श्रीमंतांना मशीद पाडण्याकरितां काशींत न येण्याबद्दल ब्राह्मणांनीं विनंति केली असावी.

श्रीमंत नानासाहेबांनीं ही विनंति मान्य केली याचें कारणहि असें असावें कीं, ब्राह्मणांनीं केलेल्या विनंतीमधील मजकूर स्वतःच्या बलाबलाचा विचार करून त्यांना पटला असावा. नाहींतर शिवाजीमहाराजांनीं जावळीचे चंद्रराव मोरे यांचा वध करून प्रतापगडचें खोरें आपल्या राज्यास जोडलें त्याप्रमाणें स्वातंत्र्यविरोधी ब्राह्मणांना बाजूला सारून त्यांनीं काशी ताब्यांत घेतली असती.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्या वेळेस पेशव्यांच्या दराऱ्यामुळें काशींतील मुसलमान पूर्वींइतका हिंदूंचा छळ करीतहि पण नसत.

सन १७६४ पूर्वीं अयोध्येचा नबाब सफदरजंग यानें काशी देण्याचें कबूल केलें होतें. तेव्हां पेशव्यांनीं 'बाबूराव महादेवास' अंमल बसविण्यास धाडलेंहि; पण त्या वेळीं मात्र सफदरजंग काशी देण्यास अळमटळम करूं लागला.

जयाप्पा शिंदे यांनीं काशी घेण्याकरितां फार खटपट केली. पण तो लवकरच वारला.

सन १७५८ त दत्ताजी शिंद्यांनीं काशी परत मिळविण्याचा प्रयत्न सुरू केला. पण इतक्यांत पानिपत प्रकरण झाल्यामुळें हाहि प्रयत्न मागें पडला. यानंतर हें क्षेत्र केव्हांहि मराठ्यांच्या हातीं न येतां सरळ मुसलमानांचे हांतूनच १७९४ त इंग्रजांकडे गेलें. हिंदूंचें दुर्दैव.

असा हा शोकपर्यवसायी काशीचा राजकीय इतिहास आहे.

## महाराष्ट्रीयांची काशींतील धार्मिक कामगिरी.

श्रीक्षेत्र काशीबद्दल राजकीयदृष्ट्या महाराष्ट्रीय राजपुरुषांनीं पुष्कळ प्रयत्न केले; परंतु त्यांना त्यांत यश आलें नाहीं. पण धार्मिकदृष्ट्या तेथें फार मोठें कार्य केलें आहे.

सन १७७५ त प्रतिनिधि घराण्यांतील दानशूर श्रीनिवासराव ऊर्फ श्रीपतराव प्रतिनिधि यांच्या पत्नी श्रीमंत राधाबाईसाहेब. या काशीयात्रेसाठीं गेल्या. त्यांनीं गंगेस घाट बांधला. त्याचें नांव "नृसिंह दंष्ट्रा" असें ठेविलें. हल्लीं त्या घांटाला "पंचगंगा घांट" असें म्हणतात. त्या घांटाला 'नरसिंग दाढा" असें हिंदुस्तानी जुन्या मंडळींच्या तोंडून क्वचित् ऐकूं येतें.

१७३४ त बाजीराव व चिमाजीअप्पां याचे गुरु श्री. नारायणदीक्षित पाटणकर ( कायगांवकर ) यांनीं काशींत जाऊन ब्रह्मघांटावर मोठा वाडा बांधला. तेथें राहून ते श्रीमंतांच्या उत्कर्षाकरितां अनुष्ठान करीत असत.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

नारायण दीक्षित पाटणकर हे नुसतेंच जपानुष्ठान करीत काशींत रहात होते; एवढेंच नव्हे तर ते राजकारणही करीत असावेत असें दिसतें. दीक्षितांचा कांहीं पत्रव्यवहार इतिहासाच्या दृष्टीनें महत्त्वाचा असल्यामुळें त्यापैकीं नमूना म्हणून कांहीं पत्रांचा सारांश येथें देतों. १३ फेब्रुवारी १७५१ च्या पत्रांत "काशींत १० दिवसपर्यंत पठाणांनीं प्रलय केला. काशींत येणाऱ्या महाराष्ट्रीय यात्रेकरूंवर 'मोहनसराय' येथें रात्रीचे वेळीं पठाणांची धाड पडली. त्या वेळीं सदाशिवभट इंगळे, त्यांची भावजय, नारो महादेव मुळे व त्यांचे वडील ठार झाले. त्या तिघांच्याही बायका सती गेल्या." असें आहे. एका पत्रांत रघूजी भोसले यानें दीक्षितांजवळ कैक हजार रुपये कर्ज मागितलें. १७५२ च्या पत्रांत बाळाजी बाजीराव पेशवे दीक्षितांस लिहितात कीं, "निजाम राज्यांत हेरांचें काम करण्याकरितां ५० माणसें पाठवा." १७४२ च्या पत्रांत दीक्षित लिहितात कीं "मल्हारराव होळकर हे ज्ञानवापीजवळील मशीद पाडून तेथें मंदिर बांधण्याचा विचार करीत आहेत. मंदिर बांधूं नये असें कोण म्हणेल! पण मशीद पाडणें बरोबर नाहीं असें मला वाटतें."१७५४ च्या पत्रांत "बाळकृष्ण दीक्षित दिल्लींत गेले होते. त्या वेळेस बादशहानें त्यांचा मोठा सत्कार केला. आणि तो म्हणाला कीं, मोठे महाराजांची ( नारायण दीक्षितांची ) आमच्या कुटुंबावर फार कृपा होती त्याचप्रमाणें आपली असली पाहिजे. आपण शाहूमहाराजांप्रमाणेंच मला पूज्य आहां." असें लिहिलें आहे.

पुण्यास श्रीमंतांना काशीहून लिहिलेल्या पत्रांत दीक्षित लिहितात कीं, "काशी येथें वैशाख मासी पंचपक्वान्नाचें लक्षभोजन करावयाचा प्रारंभ करून मग कार्तिक मासापर्यंत वाचलो तर त्या प्रांतीं सिंहस्थास गोदास्नान करून गोदातीरीं लक्षभोजन करून सर्वांच्या भेटी घेऊन यावें." नारायण दीक्षितांनीं बाजीरावाजवळ 'मथुरेसंनिध धर्मकृत्यास दहा गांव' मागितले, याचा अर्थ, बाजीरावानें तो प्रांत जिंकण्याचा उद्योग करावा, असा दीक्षितांचा उद्देश दिसतो. त्या वेळच्या महाराष्ट्रीय विद्वान व साधुसंत यांच्या

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

भावना कशा प्रकारच्या होत्या हें यावरून कळतें. दीक्षित १७४८ मध्यें वारले. त्यांचे चिरंजीव बाळकृष्ण दीक्षितही काशींत होते असें वाटतें. १७५४ मध्यें काशीहून पाठविलेल्या आपल्या पत्रांत बाळकृष्ण दीक्षित लिहितात कीं, "काशीतून स्वार होऊन श्री. दादांचे ( रघुनाथराव ) भेटीस गेलों. सर्वांशीं भेटी झाल्या. चाळीस दिवस दिल्लींत होतों. श्रीमंतांनीं बहुत स्नेह कृपा केली. कांहीं मिळवावें म्हणून गेलों नाहीं. दिल्ली शहर पहावें निमित्य गेलों. रघुनाथपंत दादांनीं आम्हांस पालखी, मोत्यांचा चौकडा व तीन हजार रुपयांचा गांव दिला. बादशहाकडून पंधरा हजार रुपयांचें गांव 'असी' अलीकडे नेमून घेतले. काशीच्या राजानें हें आर्घी मान्य केलें आहे." वगैरे.

हल्लीं दीक्षितांचा काशींतील वाडा एका श्रीमंत नेपाळ्यानें विकत घेऊन त्यांत शंकराची स्थापना केली आहे.

१७३६ मध्यें बाजीरावांच्या मातोश्री श्रीराधाबाई काशीला गेल्या. त्यांनीं त्या यात्रेंत एक लाख रुपये खर्च केले.

१७४२ मध्यें श्री. परशुराम त्र्यंबक प्रतिनिधि यांचे थोरले चिरंजीव कृष्णराव यांची पत्नी श्री. सत्यभामाबाईसाहेब यांनीं आपल्या व आपल्या पतीच्या नांवानें नृसिंहदंष्ट्रा घांटावर म्हणजे पंचगंगा घांटावर माघ शुद्ध द्वादशी रोजीं सत्यभामाकृष्णेश्वर नांवाच्या लिंगाची स्थापना केली.

१७४६ मध्यें बाजीरावांची पत्नी श्री. काशीबाई काशीस गेल्या. त्यावेळीं काशी बलवंतसिंगाच्या ताब्यांत होती.

१७५५ मध्यें श्रीशाहुमहाराजांच्या प्रतिनिधि घराण्याचे मूळपुरुष श्री. परशुराम त्र्यंबक प्रतिनिधि यांचे धाकटे चिरंजीव श्री. जगजीवनराव यांचें धाकटें कुटुंब श्री. सुंदराबाईसाहेब या आपल्या पतिनिधनाचे दुसरेच वर्षीं काशी येथें जाऊन राहिल्या. त्या वेळेस तेथें बिंदुमाधवाचें मंदिर नव्हतें. त्याचा पूर्वींचा इतिहास असा आहे कीं, प्रथम मोठा पंचगंगा घांट राजा मानसिंहानें बांधला. या घांटावर एक अत्यंत जुना शिलालेख आहे. त्या-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वरून असें कळतें कीं, मिर्झा राजा मानासिंहाचा मुलगा महाराजाधिराज जयसिंह यानें स. १६४२ मध्यें बिंदुमाधवाचें मंदिर बांधलें. पुढें १६६९ मध्यें अवरंगजेबानें विश्वेश्वरमंदिराप्रमाणें बिंदुमाधवमंदिराचा व त्याचे जवळच असलेल्या रामानंदाच्या मठाचा विध्वंस केला. त्या ठिकाणीं मशीद बांधून सुमारें २०० फूट उंचीचे दोन मनोरे बांधले. त्यासंबंधी असलेल्या शिलालेखांत असें वाक्य आहे कीं, " मंदिर बेनिमाधव आला हजरतके हुक्मे कजाशमे से तोडा गया. उसके स्थानपर उसीके मसालेसे जामए मस्जिद का निर्माण हुवा." तेव्हांपासून बरींच वर्षे बिंदुमाधव मंदिर नव्हतें. अवरंगजेबाच्या धामधुमींत काशींतील एका श्रीमंत सावकारानें पूर्वीची मूर्ति पळवून आपले घरांत ठेवली, ती अजून आहे असें तो म्हणतो. पण देऊळ नव्हतें हें मात्र निश्चित. म्हणून श्रीमंत सुंदराबाईसाहेब यांनीं मशीदीजवळ आपल्या थोरल्या जावांनीं बांधलेल्या पंचगंगा घांटावर सत्यभामाकृष्णेश्वराचे मंदिराजवळ मंदिर बांधून त्यांत कार्तिक शुद्ध १४ ( वैकुंठ चतुर्दशी ) रोजीं **श्रीबिंदुमाधवाची** स्थापना केली. त्याच दिवशीं आपले पति जगजीवनराव यांचे नांवानें त्याच मंदिरांत माधवाचे डाव्या बाजूस **जगज्जीवनेश्वर** या नांवाने लिंगस्थापना केली.

या देवळावरील शिलालेखांत " सुंदराबाईनें पंचगंगा घांटावर ब्रह्मपुरीसहित हरिहरप्रासादाचें निर्माण करून हरिहरांची स्थापना केली." असें लिहिलें आहे.

१७५७ मध्यें बाजिरावांची सून **सगुणाबाई** ह्या काशीस गेल्या.

१७७१ मध्यें प्रतिनिधि घराण्याचे मूळ पुरुष परशुराम त्र्यंबक यांच्या पत्नी बयाबाईसाहेब यांनीं पंचक्रोशीच्या वाटेवर श्रीदेहली विनायकाच्या दक्षिण बाजूला का. शु. १५ या दिवशीं आपल्या पतीच्या नांवानें **परशुरामेश्वर** लिंगाची स्थापना केली. त्याचेजवळ **ईश्वरगंगा** नांवाचा तलाव बांधला.

१७८१ मध्यें श्री. **सुंदराबाई** प्रतिनिधि यांनीं चै. शु. १ रविवारीं श्रीदेहली विनायकाजवळ एक तलाव बांधून आमराई लावली. तलावाचा उत्सर्ग रामनवमीचे दिवशीं केला.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

इ. स. १७७७ मध्ये श्री. अहिल्याबाईसाहेब होळकर यांनी श्रीविश्वेश्वर मंदिराचा जीर्णोद्धार केला. हें सर्व कार्य 'जयराम शर्मा' या नांवाच्या ब्राह्मणाकडून करविलें, असा एक शिलालेख मंदिरांत आहे. तो मूळ जुन्या दगडावरचा नसून जुना दगड झिजत आला म्हणून त्यावरून नवीन दगडावर कोरून लावला आहे, लेख मात्र जुनाच आहे. तो संस्कृत-श्लोकात्मक असून त्यांत सर्व तिथिवारनक्षत्र यांचा स्पष्ट उल्लेख केला आहे. तो शिलालेख असा—

स्वस्ति श्रीमदसीमभूमिवलयालंकारपाथोनिधेः
शेषोत्तीर्णसुधानिधानकलिकापूर्णाब्जजारोधसि ॥
माहेशाख्यपुरं जगत्प्रियकरं स्वःसंपदां श्रीहरं ।
स्वःसाम्राज्यविडम्बि निस्तुलगुणं भूमंडलीमंडनम् ॥१॥

तत्राऽभूद्वसुधाधिपोऽतिमतिमान्सत्यप्रतिज्ञो महा—
वीरः सत्यपराक्रमोऽतिवशगाः पृथ्वीश्वराद्या यतः ॥
मार्तंडेश्वरसेवनात्तसकलो मार्तंडनिष्ठाग्रणीः ।
मल्लाजीत्यभिधानको द्विजपरः श्रीहोल्करोपाख्यकः ॥२॥

तस्येयं वसुधेश्वरी विजयते यात्रैकसक्ता स्नुषा ।
पत्नी तत्प्रतिमात्ततद्गुणवरापत्यस्य धर्मैक्यतः ॥
मार्तंडापरनामकस्य जगति ख्याता सतीनां मुखे—
ऽहल्याख्याऽपरमूर्तिदेवपरमा नाम्नाऽप्यहल्याऽमदा ॥३॥

आनंदकाननसुवासिनरादिजन्तु—
मोक्षप्रदानसमये खलु तारकोक्तिः ॥
एवं व्रतं परिगृहीतमनादि येन
तस्याशया खलु तया जगदीश्वरस्य ॥४॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

यत्कारितं द्विजवरात्तसपर्यया ऽनया
श्रीभारतप्रमुखसंश्रवणार्द्रचित्तया ॥
विश्वेश्वरस्य रमणीयतरं सुमंदिरं
श्रीपंचमंडपयुतं सदृशं च वेश्म ॥५॥
काश्यामन्तर्गृहे स्थाने स्वीये कैलासतोऽधिके ।
तदाज्ञया तदाप्तेन जयरामसुशर्मणा ॥६॥
कृतं तत् द्विजवर्येण काश्यां निवसता सदा ।
गतं विश्वेशकृपया निर्विघ्नं परिपूर्णताम् ॥७॥
वार्धिवन्हिहस्तिचन्द्रमितसंवति वत्सरे ।
ग्रहरन्ध्रप्रतीकेन्दुमिते शाकेऽत्र कीलके ॥८॥
अब्दे याम्यायने भाद्रपदे मासि सितेतरे ।
पक्षे जन्माष्टमीनामतिथौ वारे विधोः शुभे ॥९॥
प्राजापत्ये तु नक्षत्रे योगे हर्षणसंज्ञके ।
तेन तुष्टो भवत्वीशो वांच्छितार्थप्रदः प्रभुः ॥१०॥

या श्लोकांचा सारांश असाः—

सर्व पृथ्वीला कंकणाप्रमाणें अलंकारभूत अशा समुद्रांतून शेषाप्रमाणें वर आलेल्या अमृतमय कलापूर्ण चंद्ररूपी कमलापासून निघालेल्या नर्मदेच्या तीरावर, जगताला आनंद देणारें, स्वर्गसंपत्तीच्या शोभेला हरण करून स्वर्गीय साम्राज्याला लाजविणारें, भूमंडलाला अलंकारभूत व निरुपम असें 'महेश्वर' नांवाचें नगर आहे.

त्या नगरीचा, अत्यंत बुद्धिमान्, सत्यप्रतिज्ञ, महावीर, सत्यपराक्रमी, सर्व राजे ज्याच्या ताब्यांत आहेत असा, ब्राह्मणभक्त, मल्लारी मार्तंडाच्या भक्तीमुळें सकलैश्वर्यसंपन्न मल्लारिभक्तश्रेष्ठ **मल्हारराव होळकर** या नांवाचा राजा झाला. त्याला त्याच्याच प्रमाणें गुणशीलवान **मार्तंड** या नांवाचा मुलगा

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

होता. त्याची, देवयात्रेंत प्रीति असणारी, विनयसंपन्न, पतिव्रतेच्या मुखांत जिचें नांव आहे, जणुं दुसरी अहिल्याच, भारतादि ग्रंथश्रवणानें आर्द्रचित्त झालेली अशी **अहिल्या** या नांवाची धर्मपत्नी होती.

तिनें ब्राह्मणांच्या विनंतीला मान देऊन, आनंदवनांत राहणाऱ्या सर्व जंतूंना तारकोपदेश करून मोक्ष देण्याचें व्रत अनादिकालापासून ज्याने स्वीकारलें आहे अशा श्रीविश्वेश्वराच्या आज्ञेनें, काशींत राहणाऱ्या आपल्या **जयरामशर्मा** नामक हितैषी ब्राह्मणाकडून, संवत् १८३४ शके १६९९ कीलकसंवत्सर, दक्षिणायन, भाद्रपद ( श्रावण ) वद्य ८ ( जन्माष्टमी ) सोमवार, रोहिणी नक्षत्र, हर्षण योग, या दिवशीं वाराणसींत, स्वतःच्या कैलासापेक्षांहि अधिक प्रिय अशा **अन्तर्गृहांत पंचमंडपयुक्त** अत्यंत सुंदर **मंदिर** व त्याचप्रमाणें एक सुंदर गृह निर्माण करविलें. तें विश्वेश्वरकृपेनें निर्विघ्न परिपूर्ण झालें. या योगानें इच्छित फलदाता ईश्वर प्रसन्न होवो."

विश्वेश्वराच्या उजव्या बाजूला प्रदक्षिणेच्या डाव्या बाजूला कोपऱ्यांत एका बाईच्या मूर्तीची स्थापना आहे. तिच्या हातांत शिवाची पिंडी आहे. ही मूर्ति अहिल्याबाईचीच होय. पण हल्लीं तिला पंडे अज्ञानामुळें 'अन्नपूर्णा' असें म्हणतात.

१८३९ मध्यें रणजितसिंहानें विश्वेश्वराच्या देवळाच्या कळसावर सोनें चढविलें.

त्याचप्रमाणें १७८५ मध्यें बाईनीं "गोविंद रघुनाथ गानु यांचे करवीं मणिकर्णिकेचा घांट व दशाश्वमेधीचा घांट सुमारें २५ हजार रुपये खर्चून बांधला." ( महेश्वर दरबार पत्र ) या मणिकर्णिका घांटावर तारकेश्वर मंदिर, काशी ते कलकत्ता मोठा रस्ता व लोलार्ककुंडही बांधलें.

आतां हल्लींच्या विश्वेश्वरमंदिरासंबंधी माझे मनांत कांहीं विचार येतात ते असे—

केव्हांही शिवमंदिरांत शंकराची पिंडी देवालयाचे गर्भागारांत असते. परंतु ही एका कोपऱ्यांत आहे, असें कां ?

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

देवी अहिल्याबाईने बांधलेल्या देवळाची सुवर्ण शिखरें





CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

गाभारा व सभामंडप काशी

फोटो, ब्लॉक व छपाई—कलागृह प्रेस पुणें

जुन्या विश्वनाथ मंदिराची पश्चिमेकडील भिंत

व तिजवर नवा उभारलेला मशिदीचा घुमट. काशी.

जुन्या विश्वनाथ मंदिराच्या [illegible]

लेला दरवाजा काशी. (हा मशिदीच्या मागल्या भिंतींत आहे.)

पुणें सह्याद्रि मासिकाच्या कृपेनें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

" कापूर ठेवून ज्या ठिकाणीं ज्वाला होईल त्याच ठिकाणीं शिवलिंग स्थापन करावें असें दिव्य करून पाहिलें. तेव्हां हल्लीच्या ठिकाणीं ज्वाला निघाली म्हणून त्याच ठिकाणीं स्थापना झाली. किंवा, देवालयांत स्थापनेकरितां आणिलेलें शिवलिंग जेथें ठेवलें तेथेंच चिकटून राहिलें. अशी भाविकांची उपपत्ति आहे; ती भाविकांना मान्य असली तरी विसाव्या शतकांतील तर्ककर्कश व भावनाशून्य ऐतिहासिकांना पटणें शक्यच नाहीं.

याविषयीं मला असें वाटतें कीं,—अहिल्याबाईच्या शिलालेखांत ' विश्वेश्वरमंदिर बांधले ' असा उल्लेख आहे. विश्वेश्वराच्या लिंगस्थापनेचा उल्लेख नाहीं. यावरून अहिल्याबाईच्या पूर्वी विश्वेश्वरलिंगाची जुनी स्थापना होतीच. स्थापनेसंबंधीं असें ऐकण्यांत येतें कीं, ही स्थापना वे. शा. सं. नारायण दीक्षित पाटणकर ( कायगांवकर ) यांनीं केली. यापूर्वी लिंग नसण्याचें कारण असें सांगतात कीं, औरंगजेबानें मंदिर उध्वस्त करून मशीद बांधण्याचे वेळीं विश्वेश्वरांनीं ज्ञानवापींत उडी घेतली. या लोकप्रवादाचा व्यवस्थितरूपानें अर्थ सांगावयाचा झाल्यास असा सांगतां येईल कीं, मुसलमान मंदिर उध्वस्त करतात असें पाहून आपली मूर्ति भ्रष्ट होऊं नये म्हणून तेथील ब्राह्मणांनीं तें लिंग उचलून ज्ञानवापींत टाकलें असावें. अथवा मुसलमानांनींहि तें तेथें टाकून देण्याचा संभव आहे. त्यामुळेंच लिंगाच्या मध्यभागीं कपरा उडाल्याप्रमाणें किंचित् खोलगट भाग अजूनही दिसतो. पुढें ज्ञानवापींतून तें लिंग पाटणकरांनीं काढून हल्लीं ज्या जागीं आहे त्या जागीं स्थापिलें असावें व त्याची स्थापना करतांना ती व्यवस्थित केली असावी. परंतु अहिल्याबाईनीं ज्या वेळीं मंदिर बांधलें त्या वेळीं पिंडीला मध्यभागीं घेऊन मंदिर बांधणें त्यांच्या कार्यकर्त्यांना गैरसोयीचें वाटल्यामुळें ती स्थापनेची जागा तशीच ठेवून मंदिर बांधलें व प्रदक्षिणेकरितां बाहेरून व्यवस्थित जागा ठेविली.

हा सर्व माझा तर्क आहे. यापेक्षां ज्यास्त पुराव्यानिशीं माहिती कोणाला मिळाल्यास त्यांनीं ती प्रसिद्ध करावी.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

काशींत फाल्गुन शुद्ध एकादशीच्या दिवशीं विश्वेश्वराच्या मंदिरांत व इतर सर्व शिवमंदिरांत शृंगारोत्सव होतो. त्या एकादशीला शृंगारी एकादशी असें म्हणतात. परंतु हा उत्सव किंनिमित्त आहे हें कळत नाहीं.

याबद्दल असें वाटतें कीं. महाशिवरात्रीला यात्रेच्या गडबडीमुळें देवाचा शृंगार होऊं शकत नाहीं म्हणून पुढें येणाऱ्या एकादशीच्या शुभदिवशीं प्रक्षालपूजेप्रमाणें देवाचा शृंगारोत्सव होत असावा. अथवा दिवोदासाच्या उच्चाटनानंतर मंदराचलाहून शंकर आनंदवनांत चैत्र शुद्ध त्रयोदशीचे दिवशीं आले. तेथून कार्तिक शुद्ध प्रतिपदेला अंतर्गृहींतील मुक्तिमंडपांत आले. तेथून शृंगारमंडपांत गेले. तेथेंच सर्व देवांनीं त्यांची पूजा केली. नंतर शंकरांनीं तेथें प्रकट झालेल्या लिंगाची स्वतःच पूजा करून त्या लिंगाचें नांव विश्वेश्वर असें ठेविलें. 'सर्व काशीयात्रेचें फळ या एका विश्वेश्वरलिंगाच्या पूजनानें प्राप्त होईल' असें त्याचें माहात्म्य सांगून त्याच लिंगांत पार्वतीसहित शंकर अंतर्हित झाले. ( का. खं. ) अंतर्धान पावण्याचा दिवस फाल्गुन शुद्ध एकादशी हा असावा म्हणून लोक याच दिवशीं शृंगारोत्सव करूं लागलें असावेत.

## अन्नपूर्णामंदिर.

अन्नपूर्णेची मूर्ति सुमारें सातशें वर्षांपूर्वीची तर आहेच. एका लहानशा ओट्यावर ही मूर्ति होती. पुढें विष्णुपंत गद्रे या नांवाच्या दक्षिणेंतील गृहस्थांनी लहानसें मंदिर बांधलें. अशा शिलालेखाचा लहानसा तुकडा सांपडला आहे. त्यांतील नांव पुसट दिसतें पण शक वाचतां येत नाहीं. हल्लींचें भव्य मंदिर अलीकडचेच आहे.

१७९१ मध्ये परशुराम त्र्यंबक यांचे वडील चिरंजीव, विशाळगड प्रतिनिधि घराण्याचे मूळ पुरुष कृष्णाजी परशुराम, यांचे चिरंजीव शिवरामराव यांची पत्नी पार्वतीबाई यांनीं पंचक्रोशीच्या वाटेवरील रामेश्वराजवळ देहली विनायकाचें मंदिर का. शु. १२ या दिवशीं बांधलें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

१७९५ मध्ये नागपूरकर भोसल्यांनीं लक्ष्मीनारायणाचें देऊळ व घांट बांधला.

मुनशीघांट नागपुरचे श्रीधर नारायण मुनशी यांनीं बांधला.

पुण्याच्या **नथू बाळाजीने** त्रिलोचनघांट व मंदिर बांधलें.

**नाना फडणीसांनीं** दुर्गाघांटावर एक मोठा दक्षिणी तऱ्हेचा वाडा व गयेच्या रस्त्यावर असलेल्या **कर्मनाशा** नदीचा स्पर्श होऊं नये म्हणून तिच्यावर पूल बांधला.

१८०७ सालीं श्रीं. चिंतामणराव ऊर्फ थोरले आपासाहेब पटवर्धन (सांगली) यांनी ब्रह्माघांटावर रु. ७००० स एक वाडा विकत घेतला, त्याला सांगलीकरांचा वाडा असें म्हणतात. त्या वाड्यांत श्रीब्रह्मेश्वर व श्रीगणपति यांच्या मूर्ति आहेत. त्यांत एक लहानसें अन्नछत्रही आहे.

१८०७ मध्ये राघोबादादा यांचे दत्तक पुत्र **अमृतरावसाहेब** यांनीं काशींत अग्नेश्वरघांटीं मंदिर बांधून त्यांत **अमृतविनायक** नांवानें श्रीगणपतीची स्थापना केली व नारदघांटीं अन्नपूर्णेची स्थापना करून तेथें अन्नछत्र ठेविलें व जवळच घांट बांधला, त्याला 'राजाघांट' म्हणतात.

१८१७ मध्ये ' दक्षिण देशाधिपति शाहूराजांचे मुख्य प्रधान बाजीरावसाहेब, त्यांचे सेनापति नरसिंहराव विंचुरकर, त्यांचे पोतनीस (कोषाध्यक्ष) यमाजीपंत यांनी काशींत नूतन मंदिर तयार करवून **भैरवनाथाचे** चरणीं अर्पण केलें ' (शिलालेख) आणि वक्रतुंडाचें (बडा गणेश) मंदिरही बांधिलें, दुर्गाघांटावरील विठ्ठलमंदिरही त्यांनीच बांधलें.

१८१८ मध्ये इंग्रजांनी पेशवाई बुडविल्यामुळें दुसरे बाजीरावसाहेब ब्रह्मावर्तास जाऊन राहिले. त्यांचे एक बंधु अमृतरावसाहेब (दत्तक) हे चित्रकूटास राहिले व त्यांचे बंधु **चिमाजी आप्पा** काशीस जाऊन असी घांटावर राहिले. चिमाजी आप्पा यांचा कारभारी मोरोपंत तांबे हाही त्यांचेबरोबर होता. त्याला काशींतच स. १८३६ च्या सुमारास एक मनु (मणिकर्णिका) नांवाची मुलगी झाली. त्याच **झांशीची राणी** लक्ष्मी-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

बाईसाहेब होत. चिमाजी आप्पांना द्वारकाबाई नांवाची मुलगी होती ती गणेश रघुनाथ थत्ते यांस दिली. चिमाजी आप्पा काशींत १८३०त वारले.

दुसरे बाजीराव पेशवे यांनीं भैरवनाथाजवळ एक लांकडी वाडा बांधला. व गंगेवर एक मोठा वाडा व घांट बांधला. त्याचप्रमाणें असीजवळही एक घांट बांधला व ब्रह्मघांटाचा जीर्णोद्धार केला. १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धांत गंगेवरील वाड्याचें बालाजीमंदिरांत रूपांतर झालें. हें मंदिर शिंद्यांनीं इंग्रजांकडून मागून घेतलें. तेथें अन्नछत्र ठेवलें. त्याला अन्नपूर्णाछत्र किंवा बालाजी छत्र असें म्हणतात. हें अन्नछत्र प्रथम दुर्गाघांटीं श्रीविठ्ठलमंदिरांत १८६५ पासून सुरू झालें व पुढें तेंच बालाजीमंदिरांत आणण्यांत आलें.

स. १८२८ मध्ये दौलतराव शिंदे यांची बायको बायजाबाई यांनीं ज्ञानवापी मंडप व मणिकर्णिका घांट बांधला. पण हा घांट त्यावेळीं अपुराच राहिल्यामुळें पुढें तो खचला. परंतु तो माधवराव शिंदे यांच्या अमदानींत नवीन तऱ्हेनें बांधण्यास सुरुवात झाली. तो आतां पूर्ण होत आला. आहे.

१८४७ मध्ये सातारचे छत्रपति राजे प्रतापसिंह महाराज यांस सरकारनें पदच्युत करून काशींत नेऊन ठेवलें होतें. ते सारनाथाजवळ रहात असत. तेथेंच ते वारले.

१८५०मध्ये पेशवाई व सातारची गादी बुडविण्यास कारणीभूत झालेले बाळाजीपंत नातु हे वैतागून काशींत जाऊन वारले.

गायघांट ग्वाल्हेरच्या बाळाबाई शितोळे यांनीं बांधला. रेल्वेपुलाचे काम १८८० मध्ये सुरू झालें तें १८८७ मध्ये पूर्ण झालें. या पुलाला डफरिन ब्रिज म्हणतात. या पुलाची लांबी ३५१८ फूट असून त्याला खर्च सुमारें रु. ७५२७५२६ झाला. साक्षीविनायक व असीच्या पलीकडे असलेलें खंडोबाचें मंदिर पुण्यांतील चंद्रचूडांनीं बांधिलें आहे. शीतलाघांट नारायण दीक्षित जडे यांनीं बांधिला. आदिकेशवाचें हल्लीचें मंदिर चिटणीस घराण्याचें आहे. शेणवाई मठ, शेणवाई वाडा, वृद्धकाळेश्वराचें मंदिर, विहीर व तेथील इमारत हे सर्व शेणवाई घराण्याचें आहे. हे शिवाजी महाराजांच्या अष्ट प्रधानांपैकीं होते. ( मंत्री ! )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

देवी अहिल्याबाईंचा दशाश्वमेध घांट काशी



रामनगर-किला व्यासकाशी

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

फोटो, ब्लॉक व छपाई—कलागृह प्रेस पुणें

बालाजीमंदिराच्या पायऱ्या उतरून खालीं गेल्यावर उजव्या हाताला असलेलें पाताळेश्वराचें मंदिर व तेथील श्रीयंत्र यांची स्थापना प्रसिद्ध शाक्त-पंथी 'भास्करराय' यांनीं केली. तेथें त्यांची गुहाही आहे.

अशा प्रकारें जमखिंडीकर, होळकर, बडोदेकर वगैरे महाराष्ट्रीय संस्थानिकांनीं व विंचुरकर, खाजगीवाले, आपटे, जठार वगैरे सरदारांनीं व अनेक श्रीमंतांनीं काशींतील बहुतेक सर्व घांट, देवळें व अन्नछत्रें केलीं. त्या सर्वांचा इतिहास लिहूं म्हटलें तर तो एक प्रचंड ग्रंथच होईल.

१८६० मध्ये मशिदीकडे तोंड करून असलेला प्रचंड नंदी नेपाळच्या राजानें बसविला आहे असें म्हणतात. त्याचें तोंड मशिदीकडे कां केलें हें समजत नाहीं. कदाचित् विश्वेश्वराचें मूळचें स्थान लोकांच्या लक्षांत यावें किंवा आपल्या मालकाच्या मंदिरावर मुसलमानांनीं बांधलेली मशीद पाहून नंदिकेश्वराला चीड यावी अशी राजाची भावना तर नसेल ना ! विश्वेश्वराच्या देवळांतील मोठी घंटाहि नेपाळच्या राजानें दिली आहे असें म्हणतात.

## इंग्रजकालीन काशी स. १७९४

स. १७९४ पासून काशी कंपनी सरकारच्या ताब्यांत पूर्णपणें गेलेली असली, तरी पण पुढें बऱ्याच काळपर्यंत काशीवर सर्व बाबींत मुसलमानी छटा होतीच. अधिकार कंपनी सरकारचा व अंतर्व्यवस्था पूर्वीचीच. अशा संधिकालांत लोकांचीं मनें वळवून अंतर्व्यवस्थाही आपल्या ताब्यांत पूर्णपणें घेण्याकरितां इंग्रजांनीं मिशनरींना पाठवून मांजरपावलानें हिंदुस्थानांत भ्रमण सुरू केलें. ज्याप्रमाणें मांजर आपलें पाऊल वाजूं न देतां घरभर हिंडून वासानेंच दूध, लोणी वगैरे जिनसांची बिनचूक माहिती काढतें व संधि साधून त्यावर झडप घालतें, त्याप्रमाणें इंग्रजांनीं वर्तन करून अंतर्बाह्य सर्व हिंदुस्थान आपल्या ताब्यांत घेतलें. व त्याप्रमाणें १–११–१८५८ रोजीं व्हिक्टोरियानें जाहीरनामाही प्रसिद्ध केला.

वर वर्णन केल्याप्रमाणें स. १८२४ व १८२५ मध्यें रेजिनॉल्ड हेबर डी. डी. (कलकत्त्याचे लॉर्ड बिशप) ह्यानें कलकत्ता ते मुंबईपर्यंत प्रवास

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

करून स्वतःचे अनुभव पत्रद्वारें विलायतेंतील आपल्या मित्रांना कळविले व कांहीं आपल्या रोजनिशींत नमूद करून ठेविलें. तें सर्व त्याच्या पश्चात् त्याच्या बायकोनें पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलें आहे. या पाद्रीभटाचा प्रवासाचा हेतु खिस्तिधर्म कसा वाढवावा असा होता. त्याबरोबरच राजकारणी दृष्टीही त्यानें ठेविली होती. हें त्याच्या बायकोनेंच पुस्तकाच्या प्रस्तावनेंत लिहिलें आहे. त्या कामीं त्याला सर्व सरकारी अधिकारी वेळोवेळीं मदत करीत असत. इतकेंच नव्हे, तर त्यास अनुकूल ठरावही कलकत्त्याचें मंत्रिमंडळ करून घेई. याचा मुक्काम स. १८२५ च्या सप्टेंबरांत काशींत दोनचार दिवस होता. ह्या एवढ्या अवधींत काशींतील मि. ब्रुक्स या गृहस्थाच्या साहाय्यानें त्यानें सर्व काशीचें निरीक्षण करून वर्णन लिहून ठेविलें आहे. त्यापैकीं कांहीं वर्णनें अज्ञानमूलक, पूर्वग्रहदूषित व स्वतःच्या संस्कृतीचें श्रेष्ठत्व दाखविण्याकरितां निंदारूपानें लिहिलीं आहेत. असें जरी असलें तरी त्याच्या लेखांवरून त्या वेळच्या काशीच्या परिस्थितीवर बराच प्रकाश पडतो. म्हणून त्या लेखाचा सारांश भाषांतर करून येथें देतों.

## त्यानें केलेलें काशीचें वर्णन स. १८२५

"काशी हें शहर विशेष लक्षांत भरण्यासारखें असून तें मी आजपर्यंत पाहिलेल्या कोणत्याही इकडील शहरांपेक्षां सर्वतोपरी पौर्वात्य पद्धतीचें आहे. तथापि तें बंगालमधील शहरांपेक्षां मात्र अगदींच निराळ्या पद्धतीचें दिसतें. रस्ते अरुंद व वळणावळणाचे असून त्यांतून बेसुमार रहदारी चालू असते. त्यामुळें त्यांतून तामजानमधून ( उघडा मेणा ) बसून जाणें सुद्धां कित्येक वेळां अवघड होऊन बसतें.

येथील उंच उंच घरें तीन, चार, पांच किंबहुना सहा मजली सुद्धां आहेत. त्यांत एक किंवा दुमजली नाहींतच. एवढालीं उंच उंच घरें हिंदुस्थानांत मला येथेंच प्रथम दिसलीं. चेस्टर शहराप्रमाणें येथील घरांच्या आंगणापेक्षां रस्ते पुष्कळच खोल आहेत. यांत देवळांची संख्याही

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मोठी आहे. हीं देवळें बहुतेक लहानच असून तीं रस्त्यांच्या वळणावळणावर आणि उंच उंच हवेल्यांच्या कानाकोपऱ्यांतून बांधलेलीं आहेत. हीं देवळें चांगलीं घाटदार आहेत. आणि त्यांतील कित्येक आपादतः मोठ्या कलाकौशल्यानें केलेल्या सुंदर नक्षीकामानें भरून गेलेलीं आहेत. हें नक्षीकाम म्हणजे फुलें, पशुपक्षी, ताडमाडांच्या डहाळ्या इत्यादिकांचे तंतोतंत नमुने आहेत. आणि ते मी आजवर पाहिलेल्या कोणत्याही गोथिक अथवा ग्रीशिअन खोदकामाची सहज बरोबरी करतील. येथें शिवाच्या नांवानें लहानमोठे सोडलेले सांड माणसाळून सरावलेले आहेत. ह्या सांडांस पाय लावून उठविलें तर त्या इसमाचें दुर्दैवच ओढवलें म्हणून समजावें. त्याचप्रमाणें येथें वानरही पुष्कळ आहेत. शहराच्या अंतर्भागांत प्रवेश केला असतां येथील प्रशस्त भव्य आणि सुंदर घरें, बाजारांत विक्रीकरितां मांडून ठेविलेल्या वस्तूंचें सौंदर्य आणि विपुलतेचा भपका आणि येथील घाणेरड्या आणि घर्मवेड्या लोकांच्या गर्दीतच व्यापाराची उडालेली गजबज पाहून मला जास्तच आश्चर्य वाटलें.

वास्तविक बनारस हें एक संपन्न, व्यापाराचें माहेरघर आणि पवित्र शहर आहे. उत्तर प्रांतांतून येणाऱ्या शाली, दक्षिण प्रांतांतून येणारीं रत्नें व डाक्याची मलमल ह्याच्या व्यापाराची बनारस ही उतारपेठ असून पूर्व प्रांताचें तें केंद्रच आहे. शिवाय रेशीम, कापूस आणि लोकर ह्यांचा माल तयार करण्याचे मोठमोठे कारखाने येथें आहेत. त्याचप्रमाणें बुंदेलखंड, गोरखपूर, नेपाळ वगैरे प्रांत आणि गंगा, हाच मुख्य जलमार्ग समजून त्यापासून दूर दूर असलेल्या इतर प्रांतांत, लखनौ आणि मोंगीर येथें तयार होणारीं शस्त्रें, तरवारी, ढाली, भाले आणि विलायती बरण्या व चिनी मातीचीं भांडीं आणि दिवसेंदिवस अधिकाधिक लोकप्रिय होत चाललेल्या युरोपीय चैनीच्या आणि मोहक इतर वस्तु येथूनच प्रसार पावतात. येथीलच तलम कापड इंग्लंडच्या राजवाड्यांत जात असे, असें मेकॉले म्हणतो. १८०३ मध्यें झालेल्या खानेसुमारीवरून येथील लोकसंख्या त्या वेळीं

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

५८२००० चे वर होती. ही अतिशयोक्ति आहे असें कोणास वाटण्याचा संभव आहे. परंतु ह्याचा खरेखोटेपणा ठरविण्यास तेंच एक तत्कालीन साधन उपलब्ध आहे. शिवाय दाटीदाटीनें एकमेकांस अगदीं खेटून बांधाव्या लागलेल्या घरांची तऱ्हा आणि असल्या घरांनीं वसलेल्या शहराचा हा खरोखरीचा अफाट विस्तार पाहिला म्हणजे वर केलेल्या लोकसंख्येचा अंदाज बरोबर ठरतो.

विश्वेश्वराचें देऊळ लहानसेंच आहे. त्या देवळाची क्षेत्रभूमि आखिल हिंदुस्थानांतील अत्यंत पवित्र अशा क्षेत्रांपैकीं एक आहे. तरीसुद्धां त्या देवळाच्या शेजारचीच जागा याहीपेक्षां पवित्रतम आहे. ती जागा भ्रष्ट करून अलमगिरानें तेथें ब्रह्मोपासकांना शिरकाव मिळूं नये म्हणून त्या जागेवर एक मशीद बांधून ठेविली आहे.

विश्वेश्वराचे देवळाजवळ एक वापी आहे. कांहीं वर्षांपूर्वीं याच शहरांत एकदां हिंदुमुसलमान लोकांत त्यांच्या धार्मिक मिरवणुकीवरून कटकट उत्पन्न होऊन मारामारी झाली. तेव्हां मुसलमानांनीं या जागेवर ( ज्ञान-वापीवर ) एक गाय मारून तिचें रक्त या पवित्र पाण्यांत ओंतलें, म्हणून तेव्हां हिंदूंनींहि सांपडल्या तितक्या मशीदीच्या खिडक्यांतून डुकराचें मांस आंत टाकून या मुसलमानांच्या कृत्याचा वचपा काढला. एवढ्यावरून हें प्रकरण मिटलें नाहीं. दोघांनीहि शस्त्रें हातीं घेतलीं. त्यामुळें पुष्कळ लोकांचा संहार झाला. बनारसमध्यें कित्येक घंटे बोंबाबोंब माजून राहिली होती. पुढें ब्रिटिश सरकार मध्यें पडलें. त्यानें आपला अधिकार चालवून हा तंटा थांबविला.

विश्वेश्वराच्या देवळाजवळच अन्नपूर्णेचें देऊळ आहे. रोमन लोकांची ( Anna Perenna ) ‘ अन्न परेन्ना ’ हीच आहे अशी समजूत आहे.

येथील लोकांत शास्त्रानुसार वागण्याची किती कळकळ होती याचें ढळढळीत प्रत्यंतर म्हणजे येथील वेधशाळा होय. ही मुसलमानांच्या स्वाऱ्या होण्यापूर्वींच येथें बांधलेली आहे.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

आपल्या हाताच्या मुठी वळवून बोटाचीं नखें मनगटास लागेतोंपर्यंत मुठी तशाच वळवून धरणें, आपले हातपाय स्वखुषीनें एकाच अवस्थेत ठेवून ते विद्रूप करणें, असल्या तपाचरणाच्या गोष्टी युरोपांत मी पुष्कळ ऐकल्या होत्या परंतु तसले प्रकार येथें माझे नजरेस वारंवार पडत.

काशी ही साध्यासुध्या पृथ्वींत वसली नसून ती शंकराच्या त्रिशूलाच्या टोंकावर वसलेली आहे. ही ब्रह्मांडकमल आहे. ही फारच पवित्र आहे. कोणत्याही पंथाचा कोणीही माणूस येथें मेला तर त्यास निःसंशय मुक्ति मिळतेच मिळते. मग तो जरी गोमांसभक्षक असला तरी हरकत नाहीं. पण त्यानें गरीब ब्राह्मणास दानधर्म मात्र केला पाहिजे. येथें भिकारी फारच आहेत. त्याचें खरें कारण हें कीं, या क्षेत्राचें पावित्र्य आणि येथें होणारा मुक्तहस्त दानधर्म. अखिल हिंदुस्थान, तसेंच तिबेट आणि ब्रह्मदेश येथून पुष्कळसे लोक येथें यात्रेकरितां नेहमीं येत असतात. त्यांत वयाच्या उतरणीस लागलेले किती तरी धनाढ्य लोक असतात. त्याचप्रमाणें हिंदु संस्थानांतील वरचेवर उद्भवलेल्या बंडांमुळें अपकीर्ति झालेले लोक किंवा ज्यांस त्यामुळें गृहत्याग करावा लागला किंवा हद्दपारी भोगण्याची पाळी आली अशा तऱ्हेचे सर्वच मोठमोठे लोक आपलीं पातकें धुवून टाकण्यासाठीं किंवा आपला रिकामटेकडा फुरसतीचा काळ घालविण्यासाठीं येथें येतात; आणि डामडौली धर्माचार करून पात्रापात्रतेचा विचार न करतां खरो-खरच मोठमोठ्या रकमा दानधर्मांत खर्च करून टाकतात. अशांपैकींच मराठेशाहीचा पेशवा अमृतराव हा आपल्या हयातीच्या अखेर येथें येऊन राहून त्यानें सर्वांपेक्षांही अधिक दानधर्म केला. त्याला इंग्रज सरकारकडून भलें मोठें पेन्शन मिळत होतें, शिवाय त्याची खाजगी संपत्तीहि बरीच मोठी होती.

हिंदु लोकांत आपआपल्या वाढदिवशीं आपल्या कुलस्वामीची पूजा करण्याची चाल आहे. त्यास अनुसरून अमृतराव प्रतिवर्षी आपल्या वाढदिवशीं सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत जे जे कोणी ब्राह्मण आणि आंधळे

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अथवा पंगू मागावयास येतील त्या प्रत्येकास एक शेर तांदूळ आणि एक रुपया देत असे. अशा समयीं पन्नास हजार रुपयांवरही कित्येक वेळां खर्च होत असे, अशी बोलवा ऐकण्यांत येते. वर्षाकांठीं त्यांचा दानधर्म जवळ जवळ ह्या रकमेच्या तिप्पट होई, अशी मला माहिती मिळते. शिक्रोर (बनारस कँट) येथें मी असतांना दुसऱ्याच दिवशीं (६-९-१८२५) रात्रीं ह्यांचें प्राणोत्क्रमण झालें. **अमृतराव** हे खरोखरीचे परोपकारी आणि धार्मिक प्रवृत्तीचे सद्गृहस्थ होते. त्यांचा उदारपणा दांभिक नसून तत्त्वनिष्ठ होता. ह्याविषयीं मि. ब्रुक्स ह्यांनीं त्यांना कळलेल्या खऱ्याखुऱ्या माहितीवरून मला तसें सांगितलें होतें. बनारसच्या हिंदु लोकांत अजूनही असल्या कांहीं प्रसिद्ध थोर अंतःकरणाची उदाहरणें वावरत आहेत, अशी माहिती मलाही लागते. कलकत्ता येथील आमच्या कित्येक जातभाई गृहस्थांचा असल्या लोकांविषयीं जितका विपरीत ग्रह होता तितका पूर्वी माझा कधींहि नसला तरी ह्या एकंदर माहितीवरून आतां ह्या लोकांविषयींचा माझा ग्रह अनुकूल होऊं लागला आहे. माझ्या भोंवतीं भयंकर मोहांधता पसरली आहे, त्याची आणि त्याच्यापासून होणाऱ्यां दुर्दशेची मला एरव्हीं वाटत नव्हती इतकी काळजी वाटूं लागली आहे. ‘ परमेश्वरा, ह्या शहरांत असलीं किती तरी तुझीं लेकरें असतील, अशा समयीं तुजवर विश्वसून आशा धरून आहें.’

**अमृतराव** पेशव्यास खिस्तीधर्माविषयीं माहिती मिळविण्याचें फार औत्सुक्य वाटत होतें. परंतु दुर्दैवानें तो मरून गेला असला तरी त्याला अंतकाळीं खिस्ती धर्मांतर्गत सत्य जाणण्याची तळमळ लागली होती. त्यामुळें ज्या आकाशांतील बापानें त्याला तशी प्रेरणा केली तो त्यास विसरणार नाहीं खास.

आमच्या पाद्री शाळेच्या विद्यार्थ्यांपैकीं एक जण अतिशय चलाख असल्याचें माझे लक्ष्यांत आलें होतें. तो चटकन् मजजवळ आला आणि त्यानें मला आपलें जानवें दाखविलें. तो आपल्या देवदेवतांचा इतिहास सुबोध इंग्रजींत मला सांगूं लागला. ह्यामुळें माझे डोळे चांगले उघडले

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

आणि जो पूर्वीं वाटत होता तो धोका दिसूं लागला. आपल्या शाळांतून शिकून निघालेल्या मुलांत कांहीं पक्के ढोंगी बनून आपणाशीं वागतांना किरस्तावाचें सोंग करणार आणि स्वकीयांबरोबर वागतांना कट्टे ब्राह्मणानुयायी राहणार; अथवा ह्या दोन पंथांत एक प्रकारचा समन्वय करून रहाणार. तो असा कीं, आमच्याकरितां खिस्तीधर्म सर्वोत्कृष्ट, परंतु स्वराष्ट्रीयांकरितां मूर्तिपूजा ही अवश्यमेव आणि विश्वसनीय होय, असें म्हणणार. ह्याकरितां पाद्री शाळेच्या शिक्षकांनीं मुलांस येशूच्या दहा आज्ञा आणि त्याचें तत्त्वज्ञान शिकविण्याचें बंद करून ते त्यांस आस्ते आस्ते आणि पाहून पाहून त्यांच्या वडिलांस व शेजाऱ्यापाजाऱ्यांस झेपेल अशा बेताबेतानें शिकवावें, असें ठरलें. ह्या शाळापंतोजींनीं त्यांची खात्री पटल्यावरून मला सांगितलें कीं, आपल्या शाळांतून शिकून निघालेले सर्व प्रौढ विद्यार्थी आणि कांहीं बाल विद्यार्थी ह्यांना हिंदु धर्माचा आणि मुर्तिपूजेचा जितका तिरस्कार वाटावयास पाहिजे होता तितका वाटण्याचें शिक्षण, नुसत्या बायबलच्या वाचनानें किंवा शिक्षकाच्या धार्मिक आज्ञेनें मिळूं शकत नाहीं. कित्येक मुलांनीं येशूची प्रार्थना स्वखुशीनें दररोज करण्यास सुरुवात केली आहे. आणि मुर्तीपुढें हात जोडून तीस नमस्कार करणें बंद केलें आहे. ह्या वर्तनाबद्दल त्या मुलांचे पालक उदासीन आहेत. येशूची प्रार्थना किंवा बाह्य पोषाख हा जातीयत्वाचा मुख्य गुण नाहीं. जें आवडेल त्यावर विश्वास ठेवावा इतकेंच नव्हे, तर जवळ जवळ त्यानें तसें बोललें तरी चालतें असें मला समजलें आहे. अशा कृत्यानें जातिभ्रष्ट होण्याची त्यांस भीति नाहीं. त्याचप्रमाणें बाप्तिस्मा घेतला नाहीं व किरस्तावाबरोबर पंक्तीस बसून खाणें-पिणें केलें नाहीं तोंपर्यंत सर्व कांहीं चालतें, असें काशींतीलही बहुजन समाजाचें मत आहे. मुसलमान लोक जास्त मत्सरग्रस्त आहेत. पण त्यांचीं फारच थोडीं मुलें शाळेंत येतात. शाळेंतून जें कांहीं शिक्षण दिलें जातें तें इतकें समधर्मी आहे कीं, त्यामुळें त्यांस आपलें कांहीं बिघडत आहे असें वाटण्यास जागाच रहात नाहीं.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

चव्हाठ्यावर उभें राहून ख्रिस्ती धर्माचीं व्याख्यानें देऊन लोकांस धर्मांतर करावयास शिकविणें हें काम त्या भेकड बंगाली लोकांमध्यें सोपें असलें तरी ह्या प्रांतीं मात्र त्यामुळें दगाफटका झाल्याशिवाय रहाणार नाहीं. सत्ता किंवा अधिकार असल्याशिवाय हे मार्ग पत्करणें सोयीचें नाहीं."

हा उतारा फारच थोडक्यांत मी दिला आहे. यावरूनही इंग्रज लोकांची–मग तो पाद्री असो किंवा राजकारणी असो, निरीक्षणशक्ति किती दांडगी असते हें सहज लक्षांत येण्याजोगें आहे. पाद्री भट ख्रिस्ती-धर्मप्रसाराकरितां लोक व देश यांचें निरीक्षण करीत असतांना देखील राजकीय दृष्टीकडे डोळेझांक करीत नाहीं. राजकीय सत्तेशिवाय धर्मस्थापना होऊं शकत नाहीं; व धार्मिक पाया बळकट असल्याशिवाय राजकीय सत्ता फार दिवस टिकूं शकत नाहीं. हें चळवळीचें मूळ तत्त्व श्री. शिवाजी महाराजांनीं ओळखिलें होतें. म्हणून थोडेंबहुत कार्य त्यांचे हातून घडलें. इंग्रजांनीं हें तत्त्व पूर्णपणें लक्षांत ठेवूनच हिंदुस्थानाला इंग्रजी शिक्षण देऊन प्रत्यक्ष बाप्तिस्मा दिला नाहीं तरी नांवानें हिंदु ठेवून मनानें पूर्ण ख्रिस्ती बनवून सोडलें व राजकीय सत्तेमुळें शरीरानें गुलाम केलें. आज सर्व हिंदुस्थान आचार, विचार व उच्चार यानें इंग्रजी संस्कृतिमय झाला आहे. तीच दशा काशीची. या मगरमिठींतून हिंदुस्थानाला गजेंद्राप्रमाणें एका परमेश्वराशिवाय दुसरा कोण सोडवूं शकणार !

सूर्यास्तानें बहुत मजला दुःख तें होत नाहीं ।
गेले, जाती, कितिक विलया कोण जाणार नाहीं ।
देतें दुःखा बहुत मज हें, सूर्यतेजें पळावें ।
त्या अंधारें द्युमणि नसतां त्याच जागीं वसावें ॥

यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।
तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥

---

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## महाराष्ट्रीय साधुसंतांचा काशीशीं आलेला संबंध

स. ११९३ पासून मुसलमानांची टोळधाड हिंदुस्थानावर पडून हिंदुराज्यें, हिंदुशास्त्रग्रंथ व हिंदुधर्म यांचा फडशा उडाला व त्यांचें रक्षण दुर्दैवामुळें राजकीय हिंदु पुरुष करूं शकले नाहींत. तरी पण त्या भयंकर काळांतही अनेक विद्वान् व साधुसंत यांचे अवतार होऊन त्यांनीं अनेक नवीन नवीन ग्रंथ निर्माण केले व त्यांचा कथा, कीर्तन, भजन अशा अनेक मार्गांनीं प्रचार करून हिंदुसंस्कृति टिकवून ठेवली. स. १५ शें पासून १८ शें पर्यंत हिंदुस्थानांत चहूंकडे सर्व जातींच्या व सर्व विद्यांच्या विद्वानांनीं आणि साधुसंतांनीं अनेक भाषांत अनेक ग्रंथ निर्माण केले. त्याचप्रमाणें काशींत मुसलमानांच्या जाचांत राहूनही यथाशक्ति धर्माचरण करून अनेक ग्रंथ लिहिले व त्यांचा पठण व पाठण या रूपानें प्रचार केला. त्या काळांत काशींत अनेक देशांतून अनेक जातींचे शास्त्री, पंडित व साधुसंत येत असत. १७ व्या शतकांत राजा जयसिंहानें काशींत महाविद्यालय स्थापिलें. तें हल्लीं मिशनरींच्या ताब्यांत आहे. १७९८ त इंग्लिश सरकारनें क्वीन्स कॉलेज नांवानें संस्कृत व इंग्रजी विद्यालय स्थापन केलें. १८१० मध्यें विद्यालंकार नांवाची एक वंगपंडिता काशींत होती. १८१७ मध्यें काशींत वेदाध्ययन करणारे विद्यार्थी ८९३ होते व वेदशास्त्रसंपन्न आचार्य ४८ होते. काशींत न्याय व मीमांसा या शास्त्रांचें अध्ययन व्याकरणापेक्षां फारच कमी असे.

तुलसीदास राजापूर (यू. पी.) गांवीं जन्मास आले. स. १५८२मध्यें त्यांनीं हिंदींत रामायण लिहिलें. स. १६२३ त श्रा. शु. ७ रोजीं काशींत असी घांटावर आपल्या मठांत त्यांनीं देह ठेविला. रामानंदांनीं पंचगंगा घांटीं मठ बांधून तेथें वास केला. कबीरही काशींतच रहात असत. याप्रमाणें सर्व जातींच्या शास्त्री, पंडित व साधुसंतांचा वृत्तांत लिहिण्याचें मजसारख्याला अशक्य आहे. म्हणून महाराष्ट्रीय साधुसंतांबद्दलची माहिती शक्य तितकी मिळवून मी लिहीत आहें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

...SIMHASAN JNANAMANDIR... LIBRARY
Jangamawadi Math, Varanasi

स. १२९२ मध्यें **श्रीज्ञानेश्वरमहाराज** नामदेवांना बरोबर घेऊन काशीस गेले. रामनगर वेशीजवळ त्यांना श्रीविश्वनाथाचें दर्शन झालें असें नामदेवांनीं आपल्या अभंगांत प्रेमळपणें म्हटलें आहे. ज्ञानदेवांचे वडील बंधु निवृत्तिनाथ यांचा जन्म स. १२७३ मध्यें झाला असें उपलब्ध आहे अर्थात् तत्पूर्वी त्यांचे वडील **विठ्ठलपंत** हे १२७० च्या सुमारास संन्यासग्रहणासाठीं काशीला गेले व तेथें **रामानंदस्वामींकडून** दीक्षा घेतली. स. १४२० च्या सुमारास **श्रीनृसिंहसरस्वतींनीं** (गुरुचरित्र) काशी येथें **कृष्णसरस्वतींकडून** संन्यासाश्रम घेतला.

स. १५७१ त पैठणचे श्री **एकनाथ महाराज** यांनीं काशींत जाऊन रुक्मिणीस्वयंवर व १५७३ मध्यें भागवत एकादशस्कंध लिहून पुरा केला. काशींत त्यांचा मुक्काम साडेतीन वर्षें होता. ते मणिकर्णिकेच्या घांटावरील पंचमुद्रापीठांत दत्तपादुकांच्या समोर स्वतःच्या भागवतावर पुराण सांगत असत. बिंदुमाधवाच्या जवळ त्यांनीं मुरलीधराची स्थापना केली. तें मुरलीधराचें मंदिर तैलंगस्वामींच्या मठांत आहे. नाथांचे चिरंजीव हरिपंडित हे वडिलांवर रागावून काशीला गेले होते. तेथें अग्नेश्वर घांटीं रहात असत. त्यांनीं तेथेंच स्वतः हातांनीं लिहिलेली ‘संक्षेप शारीरका’ ची पोथी मी पाहिली आहे. त्यावर ‘एकात्मजेन हरिपंडितेन लिखितम्’ असा उल्लेख आहे. त्यांना परत घरीं नेण्याकरितां स. १५८८त नाथ पुनः काशीस गेले होते.

स. १६३४त **श्रीसमर्थ रामदास** काशीस गेले. त्यांनीं तेथें चातुर्मास्य वास करून सर्व तीर्थविधि केला व हनुमान घांटावर एका भव्य मारुतीच्या मूर्तीची स्थापना केली. त्यांनीं विश्वेश्वराचें दर्शन घेतलें असें वर्णन आहे. त्या वेळेस नारायणभट्टांनीं बांधलेलें विश्वेश्वराचें मंदिर होतें. तें १६६९ सालीं अवरंगजेबानें पाडलें.

स. १६१० मध्यें **नारायण ऊर्फ पूर्णानंद** स्वामींनीं अवधूतगीतेवर टीका लिहिली आहे. यांचे वडील तिमण्णा हे काशींत रहात असत. त्यांना

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

भेटण्यासाठीं म्हणून ते काशीला गेले. त्यांची व ब्रह्मानंद स्वामींची गांठ पडली. पुढें या नारायणानें ब्रह्मानंदांची उपदेशदीक्षा घेतली व ब्रह्मानंदांनीं त्यांचें नांव पूर्णानंद ठेवलें. त्यांचे शिष्य निजानंद व त्यांचे शिष्य प्रसिद्ध रंगनाथस्वामी निगडीकर हे होत. **रंगनाथस्वामींच्या** गुरुपरंपरेंतील आठवे **रामानंदस्वामी**. हेच विठ्ठलपंतांचे गुरु असावेत. त्यांची समाधि काशींत आहे.

इ. स. १६४० च्या सुमारास **रंगनाथस्वामी** निगडीकर हे काशीयात्रेस गेले होते.

सन १६५० चे आंतबाहेर **वामनपंडित** शेष हे काशींत असावेत असें वाटतें. त्याचा खुलासा खालील प्रकरणावरून होईल. हे मूळचे विजापुरचे रहिवाशी. बादशाहा आपणांस बाटवील या भीतीनें ते काशींत येऊन राहिले. तेथें त्यांनीं एका मध्वमतानुयायी पंडिताकडे शास्त्राध्ययन केलें. पण द्वैतमतानें त्यांचें समाधान झालें नाहीं. म्हणून त्यांनीं तत्त्वज्ञानाकरितां अनेक गुरु केले पण समाधान होईना. एकदां मलयपर्वतावर चिंतेंत असतां भगवंतांनीं सच्चिदानंद नांवाचा संन्याशी वेष घेऊन त्यांना 'भार्गवी वारुणी विद्ये'चा उपदेश केला. तेव्हां त्यांचें पूर्ण समाधान झालें. त्यांच्या निगमसार ग्रंथांत हा आपला अनुभव त्यांनीं लिहिला आहे. त्या ग्रंथाचा रचनाकाल त्यांनींच श. १५९५ (स. १६७३) असा दिला आहे.

स. १७४० च्या सुमारास **निरंजन माधव** हे काशीयात्रेला गेले होते. हे सातारा येथील शाहुमहाराजांचे आश्रित बापुभट बर्वे ऊर्फ लक्ष्मीधर या विद्वान् व सच्छील ब्राह्मणाचे शिष्य होत. हे राजकारणी मंडळींत कवि म्हणून प्रसिद्ध होते. हे थोरले बाजीरावसाहेब पेशवे यांच्या आश्रयानें रहात असत. त्यांनीं बराच प्रवास केला होता. त्यांचा प्रवासवर्णनपर एक ग्रंथ आहे. त्यांत त्यांनीं काशीचें कविताबद्ध प्रत्यक्ष पाहिलेलें वर्णन केलें आहे; त्यावरून त्या वेळची काशीची स्थिति लक्षांत येईल. विशेषतः त्यावेळीं जिझिया कर व गंगापुत्र यांचा लोकांना किती त्रास होता त्याचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे. त्यापैकीं कांहीं श्लोक जसेच्या तसेच देतों.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

आधी नरांची गणती करावी । वेळीं अवेळीं रुजु ती पहावी ।
न्यूनाधिकें कैद दुती धरावी । तैं जेजयाची भरती भरावी ॥
निकाशबे मोइन दुःखकारी । घ्यावा दुजा हासिल फौजदारी ॥
हासील देता चुरडा उडावा । कोठूनिया धर्म पुढें करावा ॥
गंगावळाचा बहु धाक मोठा । कंगाल बोले बहु मी करंटा ॥

गंगापुत्र गुमान फार धरिती घांटीं सदा हिंडती ।
कंगालासि पिडा धरूनि धरिती दे दक्षणा बोलती ।
थोडी घेति न, बोलती खलमती नानापरी पीडिती ।
आंगासी झटती किचाट करिती हाणोनि घेती किती ॥

या श्लोकांत महाराष्ट्रीय उपाध्यायांनीं छळ केला असें कवि म्हणत नाहीं हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. आतां कवि काशींतील समाजाचें वर्णन करतो.

भागीरथींचीं तिरें रम्य खाशीं । हिंडोनि म्या पाहिलीं सावकाशी ॥
किती घांट वानूं किती थाट वानूं । समस्तासि काशी असे कामधेनू ॥
महाल नानापरिचे बसाया । केले झरोके नयनीं दिसाया ॥
त्यांतूनिया पाहत भोवतालें । हौशी नरांचे बहुसाल ताले ॥
अलंकार त्यांचे विजांच्या झळाळी । तया पाहतां भूक तीही पळाली ॥
जुना जाहला कोट गंगातटीचा । सराई पुढें रम्य बाजार साचा ॥
तमाशा सदा होय नानापरीचा । पहातां भुले लोक या दक्षिणेचा ॥

सन १७८८ मध्यें कार्तिकांत मोरोपंत हे अमरसिंह जाधवाबरोबर काशीयात्रेस गेले होते.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# विद्येचें आगर काशी.

**विद्यानां सदनं काशी काशी लक्ष्म्याः परालयः ।**
**मुक्तिक्षेत्रमिदं काशी काशी सर्वा त्रयीमयी ॥** (काशी खंड)

भारतवर्षांतील जुन्यांत जुन्या विद्यापीठांचा ऐतिहासिकदृष्ट्या विचार केल्यास (पंजाबांत) 'तक्षशिला,' (बंगाल्यांत) 'नवद्वीप' (बिहारांत) 'विक्रमशिला' 'उदंडपूर' 'नलंद' व 'मिथिला' हीं विद्यापीठें होतीं.

'तक्षशिला' हें विद्यापीठ इ. स. पू. ३४२ त फारच भरभराटींत होतें. चंद्रगुप्ताचा गुरु आर्य चाणक्य व संस्कृत व्याकरणकार पाणिनि हे येथीलच विद्यार्थी होत. येथेंच आत्रेय हे आयुर्वेदाचे अध्यापक होते. या विद्यालयांत सर्व शास्त्रांचें अध्यापन होत असे. हें विद्यालय ब्राह्मणधर्मी होतें.

दुसरें विद्यापीठ मगधांत इ. स. ५३९ त नलंद येथें होतें. याचा मुख्याध्यापक शिवकांचीचा धर्मपाल हा होता. येथेंच प्रसिद्ध चिनी प्रवासी ह्युएनत्संग रहात असे. हें विद्यालय बुद्धधर्मी होतें.

बिहार प्रांतांत इ. स. ८०० मध्यें 'उदंडपुरी' व 'विक्रमशिला' या नांवांचे दोन विद्यामठ स्थापन झाले. येथें व्याकरण, वैद्यक व दर्शनें यांचेंच अध्ययन विशेषेंकरून होत असे. हेही मठ बौद्धधर्मी असत. येथूनच विद्यार्थ्यांना पाल राजाकडून 'द्वारपंडित' ही पदवी मिळत असे. त्यांत काशीच्या पंडितांचींही नांवें आढळतात.

मिथिला (उत्तर बिहार) प्रांतांत सन १३०० ते १४०० च्या दरम्यान एक मोठें ब्राह्मणी विद्यापीठ होतें. त्याचे प्रमुख अध्यापक पक्षधर मिश्र या नांवाचे प्रसिद्ध पंडित होते. प्रसिद्ध नैयायिक पंडित वासुदेव हे यांचेच शिष्य असून त्यांना 'सार्वभौम' ही पदवी या विद्यालयांतूनच मिळाली होती. वासुदेव सार्वभौम यांनीं काशींत जाऊन वेदान्ताचें अध्ययन केलें. व नंतर इ. स. १५००च्या सुमारास नवद्वीप येथें एक स्वतंत्र विद्यालय स्थापन केलें. यांचेच शिष्य रघुनाथ शिरोमणि, (दीधितिकार)

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

रघुनंदन, ( धर्मशास्त्री ) कृष्णानंद ( तंत्रशास्त्री ) व चैतन्य ( वैष्णवमत-प्रचारक गौरांग ) हे होत.

या विद्यापीठांच्या इतिहासांत त्या वेळीं काशींत 'विद्यापीठ' म्हणून स्वतंत्र नांव आढळत नाहीं. तरी पण सर्व इतिहासकार इतर विद्यापीठांचीं वर्णनें करतांना तीं विद्यापीठें ' काशीच्या बरोबरीचीं होतीं ' असें वर्णन करतात यावरून काशींत एक स्वतंत्र विद्यापीठ नसून सबंध काशी हीच विद्यापीठ होती. काशींतील सर्व पंडित आपापल्या घरींच सर्व शास्त्रें शिकवीत असत. ती परंपरा अजूनही काशींत चालू आहे. यावरूनच या वरील सर्व विद्यापीठांच्या पेक्षां काशी ही प्राचीन विद्यापीठ होती हें सिद्ध होतें. म्हणूनच काशींत कोणत्याही धर्मपीठाचें आज्ञापत्र चालत नाहीं. तेथील पंडितांचा निर्णयच मानला जातो.

या वरील विद्यापीठांतील गौड पंडितांप्रमाणें महाराष्ट्रीय पंडितांचा सांगोपांग इतिहास दुर्दैवामुळें प्रसिद्ध नाहीं, तरी पण सबंध हिंदुस्थानांत महाराष्ट्रीय पंडितांचें वर्चस्व होतें यांत संशयच नाहीं.

ज्याप्रमाणें महाराष्ट्रीय वीरांनीं आपल्या शस्त्राच्या बळावर सबंध हिंदुस्थान-भर आपल्या नांवाचा ध्वज फडकविला, त्याचप्रमाणें महाराष्ट्रीय पंडितांनींही शास्त्राच्या बळावर आपल्या कीर्तीचा ध्वज हिंदुस्थानभर फडकविला. महाराष्ट्रीय वीरांनीं आपल्या पराक्रमाचें उगमस्थान महाराष्ट्र देश केला तर पंडितांच्या पांडित्याचें उगमस्थान काशी हें होय. शिवाजीमहाराजांनीं यवनांच्या उच्छेदाकरितां महाराष्ट्रांत तरवार उपसली तर त्यांना काशींतील गागा-भट्टांनीं राज्याभिषेक करून साहाय्य केलें. काशी ही उत्तर हिंदुस्थानांत असली तरी तिच्यांत रहाणाऱ्या गौडपंडितांवरही महाराष्ट्रीय पंडितांचेंच वर्चस्व होतें व अजूनहि थोडेंबहुत आहेच. काशींत महाराष्ट्रीय पंडितांनीं जेवढी कामगिरी केली तेवढी गौड पंडितांनीं केली नाहीं असें इतिहास सांगतो व हे सर्व ह्या काशीच्या इतिहासावरून कळेलच.

ज्या त्या प्रांताला आपापल्या पंडितपरंपरेचा अभिमान विशेष असणें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

स्वाभाविकच आहे. असें असतांही कलकत्ता संस्कृत कॉलेजांतील पंडित म. म. हरप्रसाद शास्त्री C. I. E. यांनीं ' इंडियन अँटिकेरी ' या मासिक पुस्तकांत मोकळ्या मनानें अशी कबुली दिली आहे कीं, " विद्यापीठांचें आगर व पवित्रक्षेत्रांतील अत्यंत श्रेष्ठ अशी जी काशी ती उत्तर हिंदुस्थानांतील असतां तेथें दक्षिणी पंडितांचें जें वजन व जी मान्यता आहे ती खुद्द त्या प्रांतांतील पंडितांना मुळींच नाहीं. हें महत्त्व आजकालचेंच आहे असें नाहीं तर कित्येक शतकांपासून चालत आलेलें आहे. आचारधर्म व विद्या यांच्या बाबतींत तद्देशीय कनोजी व शार्वरीय ब्राह्मण हे केव्हांही पहावें तों महाराष्ट्रीय पंडितांपुढें अगदीं दिपून गेलेले दिसतात. काशी येथें हुडकणारास हजारों हस्तलिखित पोथ्या सांपडतात. यांतील बरेच ग्रंथ खुद्द काशी येथें वास्तव्य करून राहिलेल्या कित्येक महाराष्ट्रीय पंडितांच्या घराण्यांतील विद्वान व बुद्धिमान लोकांनीं लिहून ठेवलेले आहेत. काशी येथील महाराष्ट्रीय पंडितकुळांचा इतिहास हाच चार शतकांतील हिंदुस्थानांतील बहुतेक प्रांतांच्या संस्कृत विद्येचा इतिहास होय. "

काशींतील महाराष्ट्रीय पंडित घराणीं व त्यांतील विद्वान् पंडितांनीं लिहिलेले ग्रंथ हा महाराष्ट्रीयांस चिरकाल अभिमानास्पद विषय होऊन राहीलच. पण पं. हरप्रसादशास्त्री हे स्वतः बंगाली असून त्यांनीं महाराष्ट्रीय पंडितांच्या कीर्तीची थोरवी अशा प्रांजलपणानें गाइली ही गोष्ट त्यांच्या विद्वत्तेस अत्यंत भूषणास्पद आहे.

## काशींतील महाराष्ट्रीय पंडित

महाराष्ट्रीय पंडितांचा काशीशीं संबंध केव्हांपासून आला व सर्वांत अगोदर काशींत कोण गेला हें नक्की सांगतां येत नाहीं. परंतु सन १९०४ सालीं काशींत गंगापुत्र व महाराष्ट्रीय यांच्यांत उपाध्यायपणाबद्दल तंटा उद्भवला. तें प्रकरण कोर्टांत गेलें. सदर प्रसंगीं कोर्टानें महाराष्ट्रीयांच्या सनदा पाहून त्यांचा उपाध्यायपणाचा हक्क मान्य केला. न्यायाधीशानें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

आपल्या निकालांत "इंद्रप्रस्थाच्या अनंगशालानें महाराष्ट्रीयांना उपाध्यायपणाचा ताम्रपट दिला आहे. तो पुढें अकबर, शहा अलम वगैरे मुसलमान राजांनीं मान्य केला आहे" असा उल्लेख केला आहे. यावरून १०५४ च्या पूर्वींपासूनच महाराष्ट्रीयांचा काशीशीं संबंध आला असें अनुमान करावयास हरकत नाहीं. नंतर स. ११०० च्या सुमारास बेदर (मोगलाई) या गांवाहून धर्माधिकारी या नांवाचे विद्वान् गृहस्थ काशींत गेले. त्याच सुमारास पुराणिक या नांवाचे कोंकणस्थ गृहस्थही गेले असावेत असा अंदाज आहे. कारण धर्माधिकारी व पुराणिक हीं दोन घराणीं परस्परांचे उपाध्याय आहेत. या दोन्हीं घराण्यांचे वंशज अद्यापि काशींत आहेत. यानंतर स. १३९६ त गोदावरीच्या तीरीं भयंकर दुष्काळ पडला. त्याला "दुर्गादेवी दुष्काळ" असें म्हणतात. त्यावेळीं तिकडील बरींच विद्वान् महाराष्ट्रीय घराणीं काशींत गेलीं. मध्यंतरींच्या काळांत कोणी विद्वान घराणें काशींत गेल्याचा उल्लेख फारसा सांपडत नाहीं.

हल्लीं काशींत महाराष्ट्रीयांत पहिल्या गंधाचा मान ज्यांना मिळतो त्या भट्ट घराण्याच्या मूळ पुरुषांपैकीं सर्वांत प्राचीन पुरुष नागपाश हा होय. त्यांचा पुत्र अंगदेव, त्यांचा मुलगा भट्ट गोविंद व त्यांचा मुलगा रामेश्वर भट्ट.

रामेश्वर भट्ट हे सर्वशास्त्रपारंगत असून ते पैठणांत रहात. त्या वेळेस पैठण हें काशीप्रमाणेंच धर्मक्षेत्र असून विद्यापीठ होतें. रामेश्वर भट्ट हे पैठणाहून संगमनेरास गेले. अहमदनगरच्या जाफर अली नांवाच्या उमरावाच्या मुलाला त्यांनीं महारोगापासून मुक्त केलें. ते संगमनेराहून कोल्हापुरीं महालक्ष्मीचें दर्शन घेऊन विजयनगरच्या कृष्णदेवरायाकडे जाऊन द्वारकेच्या यात्रेकरितां जात असतां वाटेंतच त्यांना सन १५१३ मध्यें पुत्र झाला. त्याचें नांव नारायण भट्ट. त्याचेसहित रामेश्वर भट्ट काशींत गेले व तेथेंच मग कायम राहिले. नंतर त्यांना श्रीधर व माधव असे दोन पुत्र झाले. रामेश्वर भट्टांच्या शिष्यांत कोंकणचे अनंत भट्ट चितळे, दामोदरसरस्वती, मधुसूदन सरस्वतीचे गुरु माधव सरस्वती, महेश ठक्कर, शंकर

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मिश्र हे प्रमुख होते. रामेश्वर भट्ट हे कैलासवासी झाले तेव्हां त्यांची स्त्री सती गेली. नारायण भट्टांनीं आपल्या वडिलांजवळच सर्व अध्ययन केलें. या वेळेस विश्वेश्वराचें देऊळ नव्हतें. तें शल्य नारायण भट्टांचे हृदयास लागून राहिलें होतें. त्यांनीं राजा तोडरमल्लाकडून विश्वेश्वराचें देऊळ बांधवून घेतलें, हा इतिहास मागें आलाच आहे. भट्टांच्या विद्वत्तेमुळें व विश्वेश्वराच्या स्थापनेमुळें भट्ट घराण्याला काशींत अग्रपूजेचा मान मिळूं लागला, तो अजून चालू आहे. श्रीनारायण भट्टांनीं सर्व हिंदुस्थानभर प्रवास केला होता. त्यांच्या घराण्यांत लोकोत्तर पंडित निर्माण झाले. काशींत महाराष्ट्रीयांची जी कायमची वस्ती झाली व त्यांना सर्व बाबींत जो मान मिळूं लागला त्याचें सर्व श्रेय श्रीनारायण भट्टांनाच आहे. एके वेळीं त्यांचा मित्र राजा तोडरमल्ल यानें आपल्या वडिलांच्या श्राद्धप्रसंगीं त्या वेळचे बंगाल्यांतील नवद्वीप येथील प्रख्यात पंडित श्रीविद्यानिवास बॅनर्जी यांना व नारायण भट्टांनाही बोलाविलें होतें. वरील वंगपंडितांचें म्हणणें असें होतें कीं, कलियुगांत हस्तश्राद्ध न करतां घटश्राद्धच करावें. कारण कलियुगांत सत्पात्र ब्राह्मण मिळणें अशक्य आहे. भट्टांनीं हें त्यांचें मत खोडून काढून तोडरमल्लाकडून हस्तश्राद्ध करवून बंगाली पंडितांकडून आपलें मत कबूल करविलें. तेव्हांपासून तोडरमल्लांची भक्ति भट्टांवर जडली. आणि तेव्हांपासूनच महाराष्ट्र पंडितांचेंही वर्चस्व काशींत झालें. नारायण भट्टांच्या स्त्रीचें नांव पार्वती होतें; त्यांच्या शिष्यांत ब्रह्मेन्द्र सरस्वती व नारायण सरस्वती हे प्रसिद्ध होते.

नारायण भट्टांना तीन पुत्र. रामकृष्ण भट्ट, शंकर भट्ट, व गोविंद भट्ट; हे सर्वच विद्वान व ग्रंथकार झाले. रामकृष्ण भट्टांना दिवाकर भट्ट, कमलाकर भट्ट व लक्ष्मण भट्ट असे तीन पुत्र होते. नारायण भट्टांचे वंशांत कमलाकर भट्टांची योग्यता फारच मोठी होती. त्यांनीं ' निर्णयसिंधु 'सारखे अनेक लोकोपयोगी ग्रंथ निर्माण केले. रामकृष्ण भट्टांचे ज्येष्ठ पुत्र दिवाकर भट्ट. यांना विश्वेश्वर भट्ट नांवाचा मुलगा झाला. त्याच्या वडिलांनींच लाडानें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्याचें नांव गागाभट्ट असें ठेविलें. गागाभट्टही फारच मोठे विद्वान झाले. यांनीं अनेक ग्रंथांची रचना केली. यांचा शिवाजीमहाराजांशीं बराच परिचय होता. कारण परमानंदकृत शिवभारताच्या उपोद्घातांत श्री. दिवेकर यांनीं खालीलप्रमाणें उल्लेख केला आहे. स. १६६४ मध्यें वैशाखमासीं महाराष्ट्रांतील राजापूर गांवीं एक मोठी " धर्मनिर्णय सभा" भरली होती. तींत पुढीलप्रमाणें काशींतील विद्वान मंडळी आली होती.

शितिकंठ दीक्षित, रघुनाथशास्त्री, परमानंद कवि, महादेव पंडित, (भारद्वाज) प्रभाकर उपाध्याय, श्रीरंगशास्त्री, नृसिंह दीक्षित, (यांनी १६०० च्या सुमारास 'अद्वैतचंद्रिका' लिहिली) विश्वंभर भट्ट, महादेव-शास्त्री अयाचित, विनायक पंडित, सोमनाथ भट्ट, जगन्नाथ भट्ट, विष्णुभट्ट, विठ्ठलेशोपाध्याय, अनन्तोपाध्याय ( धर्मसिंधुकार काशीनाथोपाध्यायांचे वडील ) महादेवपंत शेष (दाराशिकोहचे गुरु) हे सर्व काशीकर पंडित त्या सभेंत निमंत्रित होते. या धर्मसभेंत गागाभट्ट हे अध्यक्षस्थानीं होते.

गागाभट्टस्त्वनूचानो निगमागमवित्तमः ।
सभायां शुशुभे राज्ञः सुधर्मायां यथा गुरुः ॥

त्याच वेळेपासून शिवाजीमहाराजांचा व त्यांचा परिचय झाला असावा. काशींतून रायगडावर जाण्यास महाराजांना गागाभट्टांची फार मदत झाली असें म्हणतात. 'शिवभारता'चा कर्ता परमानंद कवि यानें काशींत राहूनच सर्व अध्ययन केलें. नंतर सर्व महाराष्ट्रभर प्रवास करून परत काशींत आला व तेथेंच त्यांनीं 'शिवभारत' हा ग्रंथ लिहिला. परमानंदानें 'शिवभारता' चें वाचन प्रथम काशीकर पंडितांसमोरच गंगातीरावर बसून केलें.

सन १६७४ मध्यें शिवाजीमहाराजांच्या निमंत्रणावरून रायगडावर जाऊन गागाभट्टांनीं महाराजांस यथाविधि राज्याभिषेक केला. गागाभट्टांनीं 'श्लोकवार्तिका'चा अवशिष्ट भाग पूर्ण केला. त्याचें नांव महाराजांचें स्मारक म्हणून " शिवार्कोदय " असें ठेविलें. येथपर्यंतच भट्ट घराणें विशेष विद्वान म्हणून गाजलें. त्यांचा वंश अजून काशींत चालू आहे.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

या भट्ट घराण्याप्रमाणेंच आंध्र देशांतून एक शेष घराणें काशींत गेलें. हें मूळचें तैलंग. पण पुढें महाराष्ट्रच बनलें. हें भट्टांच्या पूर्वी किंवा नंतर गेलें याबद्दल निश्चयात्मक माहिती सांगतां येत नाहीं. तरी पण हें भट्टांच्या पूर्वी गेलें असावें असा तर्क आहे. या घराण्यांतील मूळ पुरुष शेष नृसिंह. हे कनौजच्या राजाचे दिवाण होते. त्यांना शेष कृष्ण नांवाचा मुलगा झाला. हे अप्रतिम वैयाकरण असून तपस्वी होते. यांनींच स. १५४० च्या सुमारास 'सूत्रप्रक्रिया कौमुदी'वर व्याख्या लिहिली. काशीजवळ असलेल्या "मिरजापुर" गांवाजवळ हल्लीं "तांडाझील" म्हणून एक स्थान आहे. त्या जागीं पूर्वी "तांडवपुर" नांवाचें राज्य होतें. त्या राजाचे शेषकृष्ण हे दिवाण होते. अजून शेषांचे वंशांत तेथील जहागीर चालू आहे.

नारायण भट्ट हे फारच विद्वान् व तपस्वी असल्यामुळें त्यांचे वेळीं शेषांचें तेज पडलें नसावें. परंतु त्यांचेनंतर शेषांनाच मोठा मान मिळत असे असें दिसतें. कारण पुढील धार्मिक व्यवस्थापत्रांतून अगोदर शेषांचें नांव व नंतर भट्टांचें नांव अशा सह्या आढळतात. पण अग्रपूजेचा मानमात्र भट्ट घराण्यांतच राहिला, तो अजून चालू आहे.

शेष कृष्णांचे पुत्र शेष वीरेश्वर व त्यांचे पुत्र शेष चक्रपाणी. यांनीं 'मनोरमा खंडन' स. १६४०त लिहिलें. यांचेच शिष्य जगन्नाथ पंडित.

जगन्नाथ पंडित काशींतून जयपुरास गेले. तेथें त्यांना मनाजोगा आश्रय न मिळाल्यामुळें ते दिल्लींत जाऊन शहाजहानचे पदरीं राहिले. दिल्लींत त्यांना आश्रय मिळण्याचें कारण असें कीं, शहाजहानचा मुलगा दाराशिकोह हा त्या वेळीं काशीचा सुभेदार होता व त्यानें काशींत स्वतःस राहण्याकरितां 'दारानगर' नांवाचा एक स्वतंत्र मह्ल्लाच केला होता. शिवाय तो फार विद्याप्रेमी व विशेषतः हिंदूंच्या ग्रंथांबद्दल अत्यंत आदर बाळगणारा असल्यानें त्या वेळचे काशींतील विद्वान् शेष घराण्यापैकीं महादेव पंत शेष यांचें त्यानें शिष्यत्वही पत्करलें होतें व पुढें तर त्यानें सुमारें १५० पंडित जवळ बाळगून त्यांचेकडून उपनिषदांचें व इतरांहि अनेक

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ग्रंथांचें उर्दू भाषेंत भाषांतर करविलें होतें. याच शेष घराण्यांतील शेष चक्रपाणी हे जगन्नाथ पंडितांचे गुरु असल्यानें दाराशिकोह व पंडित यांचा एकप्रकारें गुरुबंधु या नात्यानें स्नेह जडला होता. म्हणून त्यांना लवकरच दरबारांत प्रवेश मिळाला. दिल्लींतही पंडितजी त्याचेकडेच रहात असत. बादशहाकडून त्यांना ' कविराज ' ही पदवी व १ हजार रुपये मिळाले. पुढें अवरंगजेबानें सन १६५७ त शहाजहानास कैद केल्यावर पंडितराज जगन्नाथ मथुरेंत जाऊन राहिले व तेथेंच सन १६७४ त त्यांनीं देह ठेवला. जगन्नाथ पंडितांबद्दल असलेली " त्यांनीं यवनीशीं लग्न केलें. नंतर त्यांना पश्चात्ताप होऊन ते काशींत जाऊन बावन पायऱ्या असलेल्या गंगेच्या घांटावर बसले. बावन श्लोकांच्या 'गंगालहरी' स्तोत्रानें गंगेचें स्तवन केलें. त्यामुळें गंगा प्रसन्न होऊन तिनें यवनीसहित जगन्नाथ पंडितांचा उद्धार केला. " ही आख्यायिका लोककल्पित आहे. तिला इतिहासांत कोठेंच पुरावा सांपडत नाहीं व ती तर्कांतही बसत नाहीं. त्यांच्या समकालीन पंडितांनीं मत्सरानें यवनीसंबंधाचा त्यांचेवर आरोप केला असावा व त्यांच्या चहात्यांनीं गंगेनें उद्धार केल्याची त्याला पुरवणी जोडली असावी.

मिस मिलरची शुद्धि करणाऱ्या कुर्तकोटी स्वामींनी या अनैतिहासिक आख्यायिकेच्या आधारावर ' गंगासंमति ' नांवाचें एक नाटकहि रचिलें. तें नाशकांत गोदावरीच्या तीरावर बसून लिहिलें असल्यामुळें तें लौकरच जगन्नाथ पंडितांप्रमाणें गोदावरीनें आपल्या पोटांत घेतलें.

याच काळांत काशींत 'विद्यानिधिकवींद्र' या नांवाचे एक विरक्त संन्यासी रहात असत. त्याच समयीं काशी व प्रयाग येथें जाणाऱ्या यात्रेकरूंकडून यात्रेचा कर मोंगल बादशहा वसूल करीत असल्यानें लोकांना फार त्रास होई. तो त्रास चुकविण्यासाठीं काशींतील सर्व पंडितांना बरोबर घेऊन आग्रा येथें शहाजहान बादशहाकडे स्वामी गेले. व आपल्या वक्तृत्वाच्या प्रभावानें सर्व विद्वान सभासद, खुद्द बादशहा व त्याचा मुलगा दाराशिकोह यांस चकित केलें. त्यामुळें बादशहानें कर माफ करून स्वामीजींना ' सर्व-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

विद्यानिधि ' ही बहुमानाची पदवी दिली. त्यामुळें सर्व हिंदुस्थानांतून त्यांना मानपत्रें मिळालीं. तीं हल्लीं कलकत्त्याच्या एशियाटिक सोसायटीच्या ग्रंथ-संग्रहालयांत आहेत.

शेष चक्रपाणीनंतर त्यांच्या पुत्रवंशांत त्यांच्यासारखा विद्वान कोणीच झाला नाहीं. पण शिष्यवंश मात्र विद्वान झाला. शेष कृष्णांचे शिष्य भट्टोजी दीक्षित. यांनीं १५७८ च्या सुमारास सिद्धांतकौमुदी व प्रौढ मनोरमा हे ग्रंथ लिहिले. त्यांचे पुत्र भानूजी दीक्षित. त्यांचे पुत्र हरि दीक्षित. यांनीं १६५० त शब्दरत्न लिहिलें. त्यांचे शिष्य नागोजी भट्ट काळे. हे फारच मोठे विद्वान झाले. त्यांनीं अनेक शास्त्रांवर ग्रंथ केले. यांचा आश्रयदाता " शृंगवेरपुराधीश " म्हणजे प्रयागाजवळील अवध–प्रतापगडचा राजा रामवर्मा हा होता. याच्या नांवानें नागोजीभट्टांनीं अध्यात्मरामायणावर टीका लिहिली आहे. या राजानें नागोजी भट्टांचा योगक्षेम शेवटपर्यंत चालविला होता. स. १७७५ च्या सुमारास नागोजी भट्ट वारले. त्यांच्यापासून पुढें सर्व शिष्यवंशच उदयास आला तो आज-तागायत सर्वत्र अव्याहत चालू आहे. त्यांचे शिष्य वैद्यनाथ पायगुंडे. (बाळंभट) यांनींही व्याकरण व स्मृति या विषयांवर अनेक ग्रंथ लिहिले. मिताक्षरे-वरील त्यांची टीका बाळंभट्टी म्हणून प्रसिद्ध आहे. ही त्यांनी आपला मुलगा बालकृष्ण हा अल्पवयांत वारल्यामुळें आपल्या लक्ष्मी नांवाच्या बायकोच्या सांत्वनाकरितां तिच्या नांवानें लिहिली. मिताक्षरेच्या व्यवहार-खंडावरील त्यांची टीका ब्रिटिश न्यायकोर्टांत प्रमाणभूत मानली जाते. पायगुंडे यांचे शिष्य भैरव मिश्र व मन्नूजी देव हे होत. देव हे पायगुंडे यांचे जांवईही होते. याच पायगुंड्यांच्या पाठशाळेंत पेशवाईंतलि प्रख्यात न्यायाधीश रामशास्त्री प्रभुणे हे धर्मशास्त्रांत विद्वान होऊन पुण्यास गेले. यांच्याच प्रेरणेनें नीलकंठशास्त्री थत्ते हे काशींत जाऊन पायगुंडे यांच्याच शाळेंत त्यांनीं मन्नूजी देव यांचे शिष्य अहोबलशास्त्री यांचेकडे शेखरादि व्याकरण ग्रंथांचें अध्ययन केलें. याच परंपरेचा महाराष्ट्रांत त्यांनीं प्रसार केला. ती परंपरा आज तागायत चालू आहे.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मन्नूजी देवांचे शिष्य जनार्दन शास्त्री गाडगीळ हे होत. त्यांचे काशीनाथशास्त्री अष्टपुत्रे. यांच्यापासूनच काशींत नैयायिकी थाटाच्या व्याकरणाची सुरुवात झाली. यांचे वडील गोविंदाचार्य हे वीरवैष्णव (माध्व) होते. काशींत माध्व गुरु आले त्यावेळेस गोविंदाचार्यांनीं तप्तमुद्रा घेतल्या; पण त्यांचे चिरंजीव काशीनाथशास्त्री यांनीं तप्तमुद्रा घेण्याचें नाकारलें. काशीनाथशास्त्रींचे शिष्य राजारामशास्त्री कार्लेकर. त्यांचे शिष्य बाळशास्त्री रानडे. हे फारच मोठे विद्वान झाले. वेद व सर्व शास्त्रें यांत पारंगत होते. वयाच्या पंधराव्या वर्षींच यांनी चित्रकूटास जाऊन पेशव्यांच्या दरबारांत वेदशास्त्रसंपन्न पंडितांच्या सभेंत "वालखिल्य शस्त्रें" विनचुक म्हणून दाखविलीं म्हणून त्यांचा दरबारकडून सत्कारसमारंभ होऊन त्यांना "बालसरस्वती" ही बहुमानाची पदवी मिळाली.

त्यांचे अनेक शिष्य झाले पण म. म. गंगाधरशास्त्री तेलंग C. I. E., म. म. दामोदरशास्त्री भारदे व गोविंदशास्त्री भारदे, म. म. तात्याशास्त्री पटवर्धन, म. म. शिवकुमार मिश्र हे विशेष प्रसिद्धीस आले. गंगाधरशास्त्री तैलंगांचे विशेष प्रसिद्धीस आलेले शिष्य कै. गु. नित्यानंद पंडितजी हे होत. दामोदरशास्त्र्यांचे शिष्य गणपतिशास्त्री मोकाटे, हे हल्लीं आहेत. शिवकुमार मिश्रांचे शिष्य जयदेव मिश्र व हाराणचंद्र भट्टाचार्य. याव्यतिरिक्त वरील पंडितांचे अनेक शिष्य विद्वान झाले. त्यांपैकीं कांहीं आहेत व कांहीं कैलासवासी झाले. अशी ही एकंदर शेष कृष्णांची व्याकरणशास्त्रांतलि शिष्यपरंपरा आजपर्यंत चालू आहे. हल्लींचे सर्व वैयाकरणी विद्वान जवळजवळ याच परंतरेंतलि आहेत.

न्यायशास्त्रांत सीतारामशास्त्री तैलंग हे अद्वितीय विद्वान होऊन गेले. मीमांसा व वेदांतशास्त्र यांत म. म. सुब्रह्मण्यशास्त्री द्रविड फारच मोठे विद्वान झाले. त्यांनीं आपल्या विद्वत्तेनें सबंध बंगाल प्रांत आपल्या वश केला. न्याय, मीमांसा व वेदांत या शास्त्रांची परंपरा व्याकरणाइतकी महाराष्ट्रीय पंडितांत नाहीं. काशींत न्यायशास्त्राची परंपरा बंगाली पंडित

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

गोलोकनाथ यांचेकडून आली. वेदांतशास्त्राची आवड शास्त्री मंडळीपेक्षां विरक्त संन्यासी मंडळींतच जास्त होती. काशींतील नैयायिक पंडित कैलासचंद्र भट्टाचार्य हे फारच विद्वान् व साधु पुरुष होते. त्यांचे शिष्य वामाचरण भट्टाचार्य व (माझे गुरुजी) श्रीलक्ष्मणशास्त्री द्रविड हे होत. वामाचरण भट्टाचार्यांचे शिष्य श्री.राजेश्वरशास्त्री द्रविड व आणीकही शिष्य विद्वान् आहेत. राजेश्वर शास्त्र्यांचे शिष्य हरिरामशास्त्री शुक्ल व रामचंद्रशास्त्री खणंग हेही विद्वान् आहेत. काशींत नृसिंहशास्त्री तैलंग हे उत्तम अलंकारशास्त्रज्ञ होते. त्यांचेच पुत्र म. म. गंगाधरशास्त्री तैलंग C. I. E. यांनीं आपल्या वडिलांजवळच साहित्यशास्त्राचें अध्ययन केलें. शास्त्रीबोवांची कविता कालिदासादि प्राचीन महाकवींची आठवण करून देणारी आहे. आणखीही मोठमोठीं पंडित घराणीं काशींत होऊन गेलीं.

मौनी हे उत्तम वैयाकरणी होते. मौनी घराण्यांतील एक विनायकभट्ट मौनी हे सवाई माधवरावांचे वेळीं पुण्यास गेले होते. त्यांना श्रीमंतांनीं १ लाख रुपये दक्षिणा दिली असें सांगतात. पुणतांबेकर व भारद्वाज हे उत्तम नैयायिक होते. रामचंद्रभट्ट तारे हेहि मोठे वैयाकरणी १७५० च्या सुमारास होते. कोंकणस्थांत भावे घराणें विद्वान् म्हणून चमकलें. पैकीं गणेशदीक्षित भावे यांनीं १५७५ च्या सुमारास सांख्यशास्त्रावर अनेक ग्रंथ लिहिले. हे भावागणेश या नांवानें प्रसिद्ध होते. कऱ्हाड्यांत कृष्णंभट्ट आरडे हे प्रसिद्ध विद्वान् झाले. यांचा ग्रंथ कृष्णंभट्टी म्हणून प्रसिद्ध आहे. यांनीं गादाधरीवरही टीका लिहिली आहे. यांचे शिष्य विठ्ठलेशोपाध्याय. ( धर्मसिंधुकारांचे वडील बंधु ). यांचे शिष्य वै. केसरी कृष्णाचार्य पंढरपूरकर, काशीचे चौधरी ( चतुर्धर ) यांच्याच घराण्यांतील नीलकंठ यांनीं भारतावर टीका लिहिली.

काशीचे सदाशिवशास्त्री घुले हे नागपुरांत गेले. त्यांचे शिष्य भटजीशास्त्री घाटे. त्यांचे शिष्य म. म. केशवरावजी ताह्मन M. A. D. Lit. हे होत. राजारामशास्त्री बोडस हे काशीहून मुंबईस गेले. गंगाराम शा. टोपले हे काशीहून बडोद्यास गेले.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

भट्ट व शेष घराण्यांशिवाय इतर सर्व घराणीं सुमारें अडीचतीनशें वर्षांचें आंत बाहेरच प्रसिद्धीस आलेली आहेत.

देवांचे शिष्य अहोबळशास्त्री हे मूळचे " अहोबळ " गांवचें राहणारे असून ते म्हैसूरमध्ये रहात असत. ते विरक्त व ब्रह्मचारी होते. टिपु-सुलतान हा मुसलमान असूनदेखील त्यांचा भक्त होता. तो शास्त्रीबुवांच्या दर्शनास नेहमीं जात असे. तेही त्याच्याशीं मोठ्या प्रेमानें बोलत असत. एक दिवस शास्त्रीबोवा प्रसन्न आहेत असें पाहून टिपूनें मोठ्या लाडानें विचारलें कीं, " आपण मुसलमानी धर्म कां स्वीकारीत नाहीं " इतकें ऐक-तांच शास्त्रीबोवा रागावून म्हणाले कीं " आतां तुझ्या राज्यांत आम्ही रहाणार नाहीं. हा मी काशीस जातों, तुझा सर्वनाश होईल " असें म्हणून तो पायांवर पडून विनवीत असतांनाही त्याला झिडकारून सरळ काशींत गेले व तेथें जाऊन हनुमानघांटीं राहिलें. ते सर्व शास्त्रात पारंगत होते. ते मधुकरी मागून गंगेवर बसून भोजन करीत व तेथेंच विद्यार्थी शिकवीत. त्यांचीच शिष्यपरंपरा महाराष्ट्रांत पसरली. त्यांनीं आरंभिलेला गणेशोत्सव मात्र काशींत अजून चालू आहे. शास्त्रीबुवा काशींत गेल्यावर लौकरच स. १७९९ त टिपु सुलतान मारला गेला.

## काशींतील महाराष्ट्रीय ज्योतिषी व वैद्य.

गणित ज्योतिषांत म. म. बापूदेवशास्त्री C. I. E. हे अप्रतिम विद्वान झाले. त्यांचे शिष्य विनायकशास्त्री वेताळ, चंद्रदेवजी व महादेवशास्त्री घाटे हे होते.

वैद्यशास्त्रांत अमृतशास्त्री हे फारच मोठे विद्वान झाले. त्यांचे पुत्र व शिष्य त्र्यंबकशास्त्री हे वडिलाप्रमाणेच विद्वान् आहेत. यांच्या अनेक शिष्यांत मुंबईचे आप्पाशास्त्री साठे व काशीचे श्रीनिवासशास्त्री चुनेकर हे फार प्रसिद्ध आहेत.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# काशींतील महाराष्ट्रीय पुराणिक व हरदास.

पुराणिकांत श्री. भाऊशास्त्री डोकमारे व विनायकशास्त्री रटाटे हे फार प्रसिद्ध झाले. भाऊशास्त्री डोकमारे यांचे शिष्य बाळशास्त्री दातार. हे वेदांती पुराणिक म्हणून फार प्रसिद्धीस आले. त्यांचे चिरंजीव माधवशास्त्री दातार हे उत्तम पुराणिक आहेत. बाळशास्त्री दातारांचे शिष्य बाबूशास्त्री केळकर हेही उत्तम पुराणिक होते.

सन १८४९त (माझे आजोबा) महादेवशास्त्री वझे हे प्रतिनिधीणबाई व मिरजकरीणबाई यांचे बरोबर काशींत गेले ते उत्तम पुराणिक होते. बिंदुमाधव मंदिरांत हे रात्रीं पुराण सांगत. त्यांचे चिरंजीव (माझे वडील) वासुदेवशास्त्री वझे यांनीं बिंदुमाधवाच्या मंदिराखालीं मारुतीसमोर आजन्म पुराण सांगितलें. त्यांना दोन मुलगे. पैकीं वडील चिरंजीव रामकृष्णशास्त्री वझे व दुसरे भाऊशास्त्री वझे. वडिलांच्या गादीवर रामकृष्णशास्त्री वझे यांनींही भरजन्म पुराण सांगितलें. हे उत्तम सरस पुराणिक होते. त्याच गादीवर हल्लीं भाऊशास्त्री वझे यांचे चिरंजीव रामचंद्रशास्त्री वझे हे पुराण सांगत आहेत.

काशींत हरदासांत बाळकृष्णबोवा नांवाचे हरदास होते. ते रामदासी असून प्राचीन पद्धतीचें उत्तम कीर्तन करीत असत. त्यांचे शिष्य गोपाळबोवा भावे हेही कीर्तनकार असून उत्तम गाणारे होते.

नाशिकचे गोविंदबुवा होशिंग हे फारच अप्रतिम कीर्तनकार झाले. त्यांच्या कीर्तनावर लुब्ध होऊन ग्वाल्हेरचे राजे श्री. जयाजीराव शिंदे यांनीं त्यांना गुरु केलें. पुढें कांहीं कारणामुळें संन्यास घेऊन ते काशींत येऊन राहिले. त्यांचें संन्यासाश्रमांतील नांव तारकाश्रम. त्यांनीं दुर्गाघांटावर तारकमठ, मणिकार्णिकाघांटीं गंगामहाल नांवाचें कृष्णमंदिर व असी घांटाजवळ चैतन्यमठ अशा संस्था स्थापन केल्या. त्यांत ते आळीपाळीनें रहात असत. यांचेच शिष्य प्रसिद्ध कीर्तनकार रामचद्रबोवा चांदवडकर व त्यांचे बंधु गोविंदबोवा व गोपाळबोवा चांदवडचे बाळकृष्णबोवा हे काशींत आले.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्यांचेच हे त्रिवर्ग पुत्र होत. या तिघांनींही तारकाश्रमांजवळ कीर्तनाचा अभ्यास केला. त्यांपैकीं गोपाळबोवा हे मुंबईस रहावयास गेले. त्यांना तेथें काशीकरबोवा म्हणत. त्यांचेच शिष्य विनायकबोवा काळे उज्जैनकर हे होत. गोविंदबोवा हे कीर्तनापेक्षां पखवाजच उत्तम वाजवीत. रामचंद्रबोवा हें उत्तम कीर्तनकार म्हणून नांवालौकिकास आले. त्यांना 'कीर्तनाचार्य' ही पदवी मिळाली ती योग्यच होती. रामचंद्रबोवांनीच हिंदुस्थानी लोकांत महाराष्ट्रीय कीर्तनपद्धतीची आवड उत्पन्न केली. रामचंद्रबोवांचे शिष्य अनेक झाले. पण त्यांत विनायकबोवा भागवत हे 'दीप इव प्रदीपात्' या न्यायानें आपल्या गुरूप्रमाणेंच सर्वांगसुंदर कीर्तन करतात. महाराष्ट्रांत प्रसिद्ध असलेले कीर्तनकार बहुतकरून तारकाश्रम सांप्रदायांतीलच आहेत.

## काशींतील महाराष्ट्रीय मल्ल.

काशींतील महाराष्ट्रीयांत मल्लविद्येचे पुरस्कर्ते बाळंभटदादा देवधर हे होत. श्री. बाळंभटदादा हे आपल्या उत्तरवयांत श्रीमंत दुसरे बाजीरावसाहेब यांजबरोबर ब्रह्मावर्तास गेले होते. नंतर काशी मुक्कामीं दक्षिणी लोकांस होणारा पंडे लोकांचा छळ कमी करण्याकरितां त्यांनीं तेथें एक आखाडा स्थापिला. प्रथम आखाडा एका तद्देशीय शिष्य बनलेल्या पंड्याच्या स्वाधीन केला. परंतु तो आपल्या जातीस मिळाल्यामुळें उद्दिष्ट हेतु सिद्धीस जाईना त्याकरितां श्री. कोंडभट नाना गोडबोले ( त्यांचे ब्रह्मावर्तांतील शिष्य ) यांना त्या आखाड्यावर स्वतः काशींत जाऊन नेमून गेले. बाळंभट दादांस तीन मुलगे. त्यांचीं नांवें रामजीगुरु, लक्ष्मणगुरु, व नारायणगुरु हीं होत. शिवाय बाळंभटदादा यांचे भाऊशास्त्री अष्टपुत्रे हे शिष्य होते. त्यांनीं 'मल्लविद्याप्रकाश' या नांवाचा मराठींत आर्याबद्ध एक ग्रंथ लिहिला आहे. या चौघांपेक्षां त्यांचे शिष्य कोंडभट नाना गोडबोले यांचीच या व्यायामशास्त्रांत जास्त प्रसिद्धी झाली. या कोंडभट नानांना बरींच अपत्यें झालीं; त्यांपैकीं कांहीं मुलगे बरेच मोठे होऊन

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वारले. त्यांना त्यांचे उतारवयांत अनंतरामगुरु व नारायणगुरु असे दोन मुलगे झाले. हे दोघेहि नानांच्या हयातींत त्यांच्या परंपरेंतील शिक्षण घेण्याच्या वयाचे नव्हते. याच सुमारास दामोदरभट मोघे हे ग्वाल्हेरहून काशींत येऊन नानांचे जवळ राहिले. हे ब्रह्मचारी असून संन्यासवृत्तीने रहात असत. नानांचे अंतकालीं त्यांनीं आपल्या दोन्ही मुलांना दामोदर-भटजींच्या स्वाधीन करून त्यांचे पालनपोषण व विद्याभ्यास करण्यास सांगितलें. अशा रीतीनें गुरुपुत्राकरितां दामोदरगुरु आखाड्याचे नियंते व गुरु होऊन संसारी बनले असें म्हणण्यास हरकत नाहीं. दामोदर-गुरु हे नानांचे आवडते शिष्य होते. यांनीं व्यायामशास्त्रांत अतिशय मोठा लौकिक मिळविला. वेताच्या मलखांबाचा शोध याच परंपरेंतील होय.

श्री दामोदरगुरु म्हणजेच अच्युतानंद स्वामी काशींत बाबाजी नांवानें ओळखले जात. त्यांनीं मल्लविद्या व मल्लखांब (विशेषेंकरून वेताचा) याचा प्रसार फार केला. त्यांस मंत्रविद्याहि चांगलीच अवगत होती. ते आयुष्याच्या शेवटीं हरिद्वारास रहात असत. तेथेंच ते आपल्या मठींत एकाएकीं नाहींसे झाले. कदाचित् त्यांनीं गंगाप्रवाहही करून घेतला असेल. कोंडभटनाना यांच्या चिरंजीवांपैकीं नारायणगुरु हे वारले. हल्लीं काशींत अनंतरामगुरु यांनीं आपल्या वडिलांच्या आखाड्याला भव्य रूप देऊन वडिलांची परंपरा कायम ठेविली आहे. त्यांच्या परंपरेंतील आखाडे काशी-बाहेर पुणें, वांई, सातारा, मिरज, सांगली, कुरुंदवाड, धुळें, इंदूर, ग्वाल्हेर, बडोदें, झांशी, अलाहाबाद, भेलसा वगैरे ठिकाणीं अजूनही चालू आहेत. दक्षिणेकडील आखाड्यांत पुणें येथील कै. गणपतराव वझे मास्तर यांची भटांची तालीम म्हणजेच अच्युतानंद व्यायामशाळा ही आपल्या कर्तृत्वानें प्रमुख गणली जाते. कै. वझे मास्तर यांनीं सततोद्योग व परिशीलन करून मल्लखांब व कुस्तीचे डावपेंच या विद्यांस शास्त्रीय रूपांत बसविलें. ह्या कामीं त्यांस त्यांचे शिष्य 'कलागृह' छापखान्याचे मालक श्री. शंकर सखाराम दाते यांचें प्रोत्साहन व साहाय्य फार झालें. ही व्यायामशाळा दामोदरगुरु यांचे

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

हस्तें स. १८८९ मध्यें स्थापन झाली. आतां वझे मास्तरांचे चिरंजीव श्री. कुशाभाऊ हे तिला उत्तम रीतीनें चालवीत आहेत.

बाळंभटदादांच्या परंपरेची एक गोष्ट विशेषरूपानें लिहिल्यावांचून राहवत नाहीं. ती ही कीं, काशींत दामोदरगुरु किंवा पुण्यांत वझे मास्तर यांनीं तालमीच्या व्यायामास त्या काळांत आलेलें अशिष्ट रूप काढून टाकून त्यास भारदस्त रूप दिलें. त्यामुळें सुशिक्षित व वजनदार लोकांचें तिकडे लक्ष वेधलें. वास्तव सुशिक्षित जनता सदैव त्यांची ऋणी आहे. मुष्टियुद्धांत गंगाधरभट निरचुरे व बाळंभट गोडबोले हे फार प्रसिद्ध झाले.

## काशींतील महाराष्ट्रीय संस्था

(माझे गुरुजी) कै. लक्ष्मणशास्त्री द्रविड यांनीं रामघांटावर "सांगवेद विद्यालय" या नांवाचें एक मोठें विद्यालय स. १९२० सालीं स्थापन केलें. त्यांत सर्व शास्त्रांच्या अध्ययनाची सोय केली आहे. त्याचे संचालक श्री. राजेश्वरशास्त्री हे आहेत. त्याच जागेंत "गीर्वाणवाक्वर्धिनी" नांवाची सभा स. १९२५ सालीं स्थापन झाली. तिचे संचालक राजेश्वरशास्त्रीच आहेत. सभेकडून शास्त्रीय निर्णय दिले जातात.

सन १८९५ च्या सुमारास काशींतील कांहीं सुशिक्षित महाराष्ट्र मंडळींनीं, दक्षिण महाराष्ट्रांतून काशीयात्रेस येणाऱ्या सुविद्य मंडळींचा परिचय होऊन त्यांच्या ज्ञानाचा लाभ व्हावा या हेतूनें "महाराष्ट्र सभा" या नांवाची संस्था ब्रह्मघांटावरील श्रीमंत बापूसाहेब काळे यांच्या शिवमंदिरांत स्थापन केली. तींत महाराष्ट्रीय मंडळींचीं व्याख्यानें वगैरे होऊन त्यांचा यथोचित सन्मानहि केला जात असे. ही संस्था माधवराव करमरकर, वासुदेवराव चांदवडकर, बळवंतराव कानिटकर, काशिनाथपंत नातु, का. रा. भागवत, तात्यासाहेब थत्ते, ग. रा. मेहेंदळे, गंगाजळी वगैरे मंडळींनीं काढली. याच मंडळींनी काशींतील महाराष्ट्रीय मुलांना महाराष्ट्रीय भाषेचें शिक्षण देण्याकरितां सन १८९७ सालीं एक "महाराष्ट्र स्कूलबोर्ड"

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

स्थापून त्यांच्या मार्फत एक इंग्रजी शाळा व एक मराठी शाळा काढण्याचा बेत ठरविला. त्याप्रमाणें इंग्रजी शाळा निघाली पण मराठी शाळा कांहीं कारणामुळें निघूं शकली नाहीं. पण ती सन १९०२ मध्यें निघाली. १९०५ सालीं लोकमान्य काशींत आले त्या वेळीं त्यांनीं इंग्रजी शाळा पाहून समाधान व्यक्त केलें व त्यांच्या प्रेरणेनें मॅट्रिकचा वर्ग सुरू झाला. पुढें आर्थिक साहाय्याच्या अभावीं १९१६ मध्यें इंग्रजी शाळा बंद पडली. पुण्यांत लोकमान्य टिळकांनीं १८९३ मध्यें काढलेल्या गणेशोत्सवाच्या राष्ट्रीय स्वरूपाच्या धर्तीवर काशींतही सन १८९८ त वरील संस्थेने सार्वजनिक गणेशोत्सव सुरू केला, तो अद्यापि चालू आहे. उत्सवांत लहान मुलांना वाव मिळेना म्हणून १९०९ मध्यें बाळासाहेब वडोदकर, विनायक बुवा भागवत, विष्णुबुवा काळविट वगैरे मंडळींनीं 'नूतन बालक गणेशोत्सव' सुरू केला तोही अद्यापि व्यवस्थितपणें चालू आहे. या दोन्ही उत्सवांत पुण्याप्रमाणेंच नाटक, नकला वगैरे कार्यक्रमांचें विष शिरलेलें आहे.

## काशींतील महाराष्ट्रीय वर्तमानपत्रें

काशींत पहिलें महाराष्ट्रीय वर्तमानपत्र स. १८९६ सालीं 'काशीवैभव' नांवाचें अण्णासाहेब नेने वगैरे मंडळींनीं काढलें. दुसरें स. १९०० सालीं कृष्णाजी आबाजी गुरुजी यांनीं 'कालिदास' या नांवाचें पत्र सुरू केलें. यानंतर गणेश बाबाजी फडके यांनीं 'काळभैरव' नांवाचें पत्र चालविलें. तिसरें स. १९३८ मध्यें रामचंद्रशास्त्री वझे यांचे संपादकत्वाखालीं "उत्कर्ष" या नांवाचें पत्र निघालें. हीं सर्व महाराष्ट्रीय पत्रें आर्थिक आश्रयाच्या अभावीं फार दिवस चालूं शकलीं नाहींत.

याप्रमाणें काशींतील वेदांच्या सर्व शाखेंतील अप्रतिम महाराष्ट्रीय वैदिक, तैलंग स्वामींसारखे योगी सत्पुरुष, हरिपंत जुन्नरकर, बापूसाहेब काळे, दाजीसाहेब काळे ( नगरनाईक ) वगैरे सावकार व महाराष्ट्रीयांनीं बांधलेले घाट, मंदिरें व अन्नछत्रें या सर्वांचा इतिहास लिहिण्याजोगा आहे;

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पण त्याची नीटशी माहिती मिळत नाहीं व तितके श्रमही मी केले नाहींत, म्हणून त्याबद्दल तूर्त तरी मला कांहीं लिहितां येणें शक्य नाहीं. खरें म्हटलें तर इतिहास हा विषय इतका जिकीरीचा आहे कीं, तो केव्हांही परिपूर्ण होणें शक्यच नाहीं. याचें कारण आमच्या पूर्वजांचें इतिहास लिहिण्याबद्दलचें औदासीन्य हें होय.

हा सर्व काशीचा इतिहास पाहतां एके काळीं काशींत सर्व बाबींत महाराष्ट्रीयांचेंच वर्चस्व होतें. काशींतच काय पण सर्व हिंदुस्थानांत महाराष्ट्रीय सूर्य तळपत होता. वेंकटाध्वरींनीं आपल्या 'विश्वगुणादर्शचम्पू'त महाराष्ट्रीय वीरांचे असें वर्णन केलें आहे कीं,

मायाचुञ्चुतया भयावहगतिः प्रत्यर्थिपृथ्वीभुजां
माहाराष्ट्रभटच्छटा रणपटुर्नो पर्यटाव्येत चेत् ॥
देवब्राह्मणवर्गनिग्रहकृतो देशांस्तुरुष्का इमे
निष्प्रत्यूहमनोरथा वितनुयुर्निर्देवभूमीसुरान् ॥

शत्रूंना भय उत्पन्न करणारे महाराष्ट्र वीर जर या पृथ्वीवर हिंडले नसते तर मुसलमानांनीं हें सर्व भारतवर्ष देवब्राह्मणरहित केलें असतें. असा या वरील श्लोकाचा भावार्थ आहे. परंतु आज तो महाराष्ट्रीय सूर्य 'चक्रनेमिक्रमेण' अस्ताचलास जात आहे.

## कालाय तस्मै नमः

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# धार्मिक काशी.

कुत्र विधेयो वासः ? सज्जननिकटेऽथवा काश्याम् (शंकराचार्य)
मोक्ष देऊनि उदार। काशी होय कीर। परी वेचे शरीर। तिये गांवीं
(ज्ञाने. अ. १२ ओ. १७३)

आतांपर्यंतचा काशीचा इतिहास केवळ ऐतिहासिक दृष्टीनेंच लिहिला आहे; परंतु काशीचें धार्मिक स्वरूप व तेथें असलेल्या स्थानांचें महत्त्व भाविकांच्या लक्षांत यावें म्हणून काशीखंडांत दिलेला तिचा धार्मिक इतिहास देत आहें. त्याबरोबरच काशीखंडोक्त यात्रा व त्यांचीं हल्लीं प्रसिद्ध असलेलीं ठिकाणेंही देण्याचा विचार केला आहे.

काशीखंडांत काशीक्षेत्राच्या उत्पत्तीविषयीं खालीलप्रमाणें वर्णन आहे.

न यदा भूमिवलयं न यदाऽपां समुद्भवः।
तदा विहर्तुमीशेन क्षेत्रमेतद्विनिर्मितम् ॥

ज्या वेळीं पृथ्वी व जल यांची उत्पत्ति झालेली नव्हती त्या वेळीं आपल्या आदिमायेसह विहार करूं इच्छिणाऱ्या परमेश्वरानें विहार करण्याकरितां हें क्षेत्र निर्माण केलें व तें आपल्या (त्रिगुणात्मक) त्रिशूलावर धारण केलें. नवखंड पृथ्वी उत्पन्न होण्यापूर्वींच हें क्षेत्र उत्पन्न केल्यामुळें ह्याला 'दहावें खंड' असें म्हणतात. म्हणूनच या क्षेत्रावर धर्मगुरूंची सत्ता आणि धर्मशास्त्राचीं बंधनें नाहींत. काशीयात्रेकरितां मुहूर्त पाहण्याची आवश्यकता नाहीं. मनांत येईल तोच शुभ मुहूर्त. काशींत केव्हांही मेलें तरी दक्षिणायनादि कालदोष, स्थलदोष व दुर्मरणाचे दोष लागत नाहींत. हें क्षेत्र स्वतः ईश्वररूप तर आहेच, पण त्यापेक्षांही उत्तरेकडूनच निघालेली--म्हणजे शिवस्वरूप असलेल्या हिमालयाच्या (कैलासाच्या) मस्तकावरून निघालेली--गंगा, पुनः उत्तराभिमुख होऊन शिवरूप असलेल्या काशीक्षेत्रांत म्हणजे आपल्या पूर्वस्थानीं (शिवमस्तकीं)

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

परत आली. त्यामुळें शंकरांचें ' गंगाधर ' हें स्वरूप काशीक्षेत्रांतच प्रत्यक्ष दिसतें. म्हणून या क्षेत्राच्या महत्त्वाला पारावारच नाहीं.

या क्षेत्राचें काशी हें नांव पडण्याचें कारण असें दिलें आहे कीं,

काशतेऽत्र यतो ज्योतिस्तदनाख्येयमीश्वरः ।
अतो नामाऽपरं चाऽस्तु काशीति प्रथितं विभो ॥

परमेश्वराचें मुख्य स्वरूप वाणीला अगोचर आहे. परंतु या क्षेत्रांत सर्व प्रथम ईश्वर ज्योतिरूपानें प्रगट झाल्यामुळें या क्षेत्राला ' काशी ' हें नांव पडलें.

## काशीक्षेत्राच्या सीमा.

काशींत मध्यमेश्वर नांवाचें एक महादेवाचें स्थान आहे. हें ज्या मोहल्ल्यांत आहे त्याला हल्ली ' मध्यमेश्वर मोहल्ला ' च म्हणतात. हाच काशीचा मध्यबिंदु असून याच्या आसपास पांच कोस त्रिज्येनें होणारा परिघ ही काशीक्षेत्राची सीमा आहे. गंगेच्या पूर्वतीरावरील काशीचा भाग या वर्तुलाकार काशीच्या सीमेंत येतो. पण ती वाराणसी नाहीं. म्हणूनच विश्वेश्वरांनीं वाराणसींतून काढून लावलेले व्यास त्या भागांत जाऊन राहिले. याच भागाला ' व्यास काशी ' असें म्हणतात. काशीच्या या वर्तुलाकार सीमेच्या आंत गंगेच्या पश्चिम तीरावर ' वाराणसी ' आहे.

## वाराणसीची सीमा

वाराणसीच्या उत्तर सीमेवर वरुणा, दक्षिण सीमेवर असी, पूर्व सीमेवर गंगा आणि पश्चिम सीमेवर पाशपाणि विनायक. हीच विश्वेश्वराची राजधानी होय.

वरुणा आणि असी यांच्या मध्यभागीं हें क्षेत्र असल्यानें यास वाराणसी असें म्हणतात.

दक्षयज्ञांत प्राणत्याग केलेल्या सतीचा ( गौरीचा ) देह घेऊन शंकर हिंडत असतांना या वाराणसींत तिचें मुख गळून पडलें म्हणून याला गौरीमुख असें नांव पडलें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

हें स्थान शंकरांना आनंददायक वाटल्यामुळें **'आनंदवन,'** प्रलय-शक्तीची देवता रुद्र (शंकर) या क्षेत्रांत वास करीत असल्यामुळें **रुद्रावास** आणि या ठिकाणीं मरणारा जंतु कायमचाच निजतो (मुक्त होतो) म्हणून **महाश्मशान** ('महाश्मशानदग्धानां पुनर्जन्म न विद्यते') अशीं याचीं नांवें आहेत.

या वाराणसींत **विश्वेश्वर, केदारेश्वर** व **ओंकारेश्वर** अशीं तीन **खंडें** आहेत. विश्वेश्वर खंडालाच **'अंतर्गृही'** असें म्हणतात. तिच्या पूर्वेस मणिकर्णिकेश्वर, पश्चिमेस गोकर्णेश्वर, उत्तरेस भारतभूतेश्वर व दक्षिणेस ब्रह्मेश्वर अशी तिची सीमा आहे. या अंतर्गृहीच्या मध्यभागाला **अविमुक्तक्षेत्र** असें म्हणतात. याचें कारण असें आहे कीं,--

स्वायंभुव मन्वंतरांत सर्व वाराणसीच शिवरूप मानण्यांत येत असे. त्यावेळीं तेथें स्वतंत्र लिंगस्थापनेचा प्रघात नव्हता. पुढें शंकरांनीं ब्रह्मदेवाच्या याचनेवरून दिवोदासाकरितां वाराणसी सोडली. परंतु त्यांना तिचा वियोग सहन होईना. म्हणून ब्रह्मदेवालाही न कळत गुप्तपणें कुक्कुटांडाकृति पिंडीच्या रूपानें प्रगट होऊन शंकरांनीं वाराणसी सोडली नाहीं. म्हणून या अंतर्गृहीला **'अ-विमुक्तक्षेत्र'** हें नांव पडलें. व त्या पिंडीचें **अ-विमुक्तेश्वर** असें नांव झालें. या अविमुक्तेश्वराचा प्रादुर्भाव **माघ वद्य चतुर्दशीचे** दिवशीं रात्रीं झाला.

माघकृष्णचतुर्दश्यामादिदेवो महानिशि ।
शिवलिंगतयोद्भूतः कोटिसूर्यसमप्रभः ॥ (ईशानसंहिता)

तेव्हांपासूनच **महाशिवरात्रि** व्रताचा प्रारंभ झाला. या अविमुक्तेश्वराला पाहूनच देवादिकांनींहि काशींत आपापल्या नांवानें लिंगस्थापनेला आरंभ केला. त्या सर्व देवतांनीं स्थापिलेलीं लिंगें काशींत आहेत. याशिवाय चार धाम, सप्तपुरी, बारा ज्योतिर्लिंगें, छप्पन विनायक, अष्ट भैरव, द्वादशादित्य, नवदुर्गा व अनेक योगिनीपीठें काशींतच आहेत. म्हणून काशीच्या या सर्व

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

यात्रा केल्यानें भारतवर्षांतील सर्व तीर्थयात्रा करण्याचें फळ मिळतें. सर्व वाराणसीच शिवरूप असल्यामुळें ( पंचक्रोशात्मकं लिंगं ज्योतिरूपं सनातनम् ) तिला प्रदाक्षिणा केल्यानें क्षेत्रांत असलेल्या सर्व स्थानांनाही प्रदाक्षिणा आपोआपच घडते. या प्रदक्षिणेलाच 'पंचक्रोशी यात्रा' असें म्हणतात.

वरील सर्व यात्रा ( माझ्या वडिलांनीं ) वासुदेवशास्त्री वझे यांनीं स्वतः अनेक वेळां केल्या व लोकांकडून करविल्या. त्यांनीच मोठ्या श्रमानें सर्व स्थानांचा शोध लावून व त्यांचीं प्रचलित नांवें व ठिकाणें लिहून ठेविलीं आहेत. तींच मी येथें क्रमानें देतों.

## काशींतील चार धाम व सप्तपुरी

१ जगन्नाथ--असीघांटावरील जगन्नाथमंदिर.
२ रामेश्वर—पंचक्रोशींतील रामेश्वरमंदिर.
३ द्वारका--शंखोद्धारतीर्थावर.
४ केदार—केदारघांटीं गौरीकुंड.
१ मथुरा—वसंत ऋतूंत शैलेश्वराजवळ आदिकेशवमंदिर.
२ अयोध्या--ग्रीष्म ऋतूंत पंचक्रोशींतील रामेश्वर.
३ द्वारका—वर्षाऋतूंत शंखोद्धारातीर्थ.
४ अवंतिका ( उज्जयिनी )--शरद्ऋतूंत वृद्धकाळेश्वर.
५ कांची--हेमंतऋतूंत व्यंकटेश ( बालाजीमंदिर. )
६ माया ( हरिद्वार )--शिशिरऋतूंत असीघांटावर संगमेश्वर.
७ काशी—वसंतऋतूंत ललितादेवी.

## ( १ ) प्रथम नित्ययात्रा ( का. खं. अ. १०० )

१ आदित्याय नमः—विश्वेश्वराजवळ, मारुतीचे मंदिरांत.
२ द्रौपद्यै नमः—त्याच ठिकाणीं अक्षयवटाजवळ.
३ विष्णवे नमः—विश्वेश्वराचे मंदिरांत दक्षिण बाजूस.
४ दंडपाणये नमः—ज्ञानवापीच्या पश्चिम बाजारांत.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

५ महेश्वराय नमः—ज्ञानवापीजवळ पिंपळाखालीं.
६ ढुंढिराजाय नमः—प्रसिद्ध आहे.
७ ज्ञानवाप्यै नमः—प्रसिद्ध आहे.
८ नंदिकेश्वराय नमः—ज्ञानवापीचे पूर्वेकडे आहे.
९ तारकेश्वराय नमः —त्याच ठिकाणीं कोनाड्यांत.
१० महाकालेश्वराय नमः—ज्ञानवापीच्या आग्नेय कोनांत.
११ ( पुनः ) दंडपाणये नमः—ज्ञानवापीच्या पश्चिमेकडे बाजारांत.

ही नित्ययात्रा रोज करावी. धर्म, अर्थ, काम, मोक्ष, यांची प्राप्ति होते.

## ( २ ) दुसरी अनुक्रम—यात्रा.

१ विश्वेश्वराय नमः—प्रसिद्ध.
२ बिंदुमाधवाय नमः—प्रसिद्ध.
३ ढुंढिराजाय नमः—प्रसिद्ध.
४ दंडपाणये नमः—विश्वेश्वराजवळ.
५ कालभैरवाय नमः—प्रसिद्ध.
६ काशीदेव्यै नमः—काशीपुऱ्यांत.
७ गुह्यै नमः—जागेश्वराजवळ.
८ गंगायै नमः—इसर गंगीचे तलावास म्हणतात.
९ भवान्यै नमः—अन्नपूर्णा प्रसिद्ध.
१० मणिकर्णिकायै नमः—प्रसिद्ध आहे.

## ( ३ ) तिसरी षडंग यात्रा ( का. खं. अ. ४१ )

१ विश्वेश्वराय नमः—प्रसिद्ध आहे.
२ विशालाक्ष्यै नमः—मीरघांटावर.
३ मंदाकिन्यै नमः—कंपनीबागेजवळ.
४ कालभैरवाय नमः—प्रसिद्ध.
५ ढुंढिराजाय नमः—प्रसिद्ध.
CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri
६ दंडपाणये नमः—ज्ञानवापीचे पश्चिमेकडे बाजारांत.

## ( ४ ) चवथी त्रिकंटक यात्रा ( लिंगपुराणानुसार. )

१ अविमुक्तेश्वराय नमः—ज्ञानवापीजवळ मशीदीचे कोपऱ्यावर.
२ स्वर्लीनेश्वराय नमः—राजघांटावर.
३ मध्यमेश्वराय नमः—मंदाकिनीजवळ.

## ( ५ ) पांचवी यात्रा अष्टौवसू, ( काशीखंडोक्त. )

१ दक्षेश्वराय नमः—वृद्धकाळांत.
२ पार्वतीश्वराय नमः—त्रिलोचनेश्वराचे मंदिरांत.
३ पशुपतीश्वराय नमः—प्रसिद्ध.
४ गंगेश्वराय नमः—ज्ञानवापीजवळील मशीदीजवळ पिंपळाखालीं.
५ नर्मदेश्वराय नमः—त्रिलोचनाजवळ.
६ गभस्तीश्वराय नमः—मंगळागौरीजवळ प्रसिद्ध.
७ सतीश्वराय नमः—वृद्धकाळाचे रस्त्यांत रत्नेश्वराजवळ.
८ तारकेश्वराय नमः—ज्ञानवापीजवळ.

## ( ६ ) सहावी नवगौरी यात्रा ( का. खं. अ. १०० )

१ मुखनिर्मालिका गौरी—गायघांटावर मारुतीचे मंदिरांत.
२ ज्येष्ठागौरी—भूतभैरवाचे जवळ.
३ सौभाग्यगौरी—विश्वनाथाचे मंदिरांत.
४ शृंगारगौरी—विश्वनाथाचे मंदिरांत.
५ विशालाक्षी गौरी—मीरघाटावर.
६ ललिता-गौरी—ललिता घांटावर.
७ अन्नपूर्णा गौरी—प्रसिद्ध.
८ मंगलागौरी—प्रसिद्ध.
९ महालक्ष्मी गौरी—लक्ष्मीकुंडावर.

ही यात्रा प्रत्येक महिन्याच्या शुक्लपक्षाचे तृतीयेस करावी.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## ( ७ ) सातवी नवग्रहयात्रा.

१ गभस्तीश्वराय नमः—मंगलागौरीचे मंदिरांत.
२ चंद्रेश्वराय नमः—सिद्धेश्वरीचें मंदिरांत.
३ मंगलेश्वराय नमः—आत्मावीरेश्वराचे मंदिरांत.
४ बुधेश्वराय नमः—आत्माविरेश्वराचें मंदिरांत.
५ बृहस्पतीश्वराय नमः—आत्मावीरेश्वराचे मंदिराबाहेर.
६ शुक्रेश्वराय नमः—कालिकागलींत.
७ शनैश्वराय नमः—विश्वनाथाचे मंदिरांत.
८ राहवे नमः— }
९ केतवे नमः— } मणिकर्णिकेश्वराबाहेर.

## ( ८ ) आठवी एकादश महारुद्र यात्रा. (का. खं अ. १००)

१ आग्नीध्रेश्वराय नमः—जागेश्वर या नांवानीं प्रसिद्ध आहे.
२ उर्वशीश्वराय नमः—श्राबूच्या बाजारांत—औसानगंज.
३ नकुलेश्वराय नमः—विश्वनाथाजवळ मारुतीचे मंदिरांत.
४ आषाढीश्वराय नमः—काशीपुऱ्यांत बितियावाले याचे मंदिरांत.
५ भारभूतेश्वराय नमः—मच्छरहट्टा राजादरवाजा.
६ लांगूलेश्वराय नमः—लोवाबाजार कचौडीगली.
७ त्रिपुरांतकेश्वराय नमः— सिगऱ्याचे टील्यावर.
८ मनःप्रकाशेश्वराय नमः—साक्षीविनायकाचे पुढे.
९ प्रीतिकेश्वराय नमः—साक्षीविनायकाचे वायव्यकोणांत.
१० मदालसेश्वराय नमः—कालिकागलीचे पूर्व सडकेवर.
११ तिलपर्णेश्वराय नमः —मोठ्या दुर्गेवर आहे.

ही एकादशलिंग यात्रा केल्यानें रुद्रत्वाची प्राप्ति होते.

## (९) नववी द्वादशादित्याची यात्रा ( का. अ. ४६ )

१ लोलार्क—भदैनींत तुलसीदासाचे घांटावर.
२ उत्तरार्क—अलईपुरामध्ये ज्यास सर्व लोक बकरीया कुंड म्हणतात.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

३ सांबादित्य--सूर्यकुंडावर.

४ द्रुपदादित्य—विश्वेश्वराजवळ मारुतीचे मंदिरांत.

५ मयूखादित्य--मंगलागौरीचे मंदिरांत.

६ खखोल्कादित्य--कामेश्वरांत त्रिलोचनाजवळ.

७ अरुणादित्य—त्रिलोचनाचे मंदिरांत.

८ वृद्धादित्य--मीरघाटावर.

९ केशवादित्य--वरणासंगमावर आदिकेशवाचे मंदिरांत.

१० विमलादित्य—जंगमवाडी खारी कुंआ याचेजवळ.

११ गंगादित्य—ललिताघांट वसिष्ठेश्वराजवळ.

१२ यमादित्य—संकटाघांटावर.

ही यात्रा रविवार षष्ठी सप्तमी या दिवशीं केली असतां संपूर्ण रोग व सर्व विघ्नें दूर होतात.

## ( १० ) दहावी भैरव यात्रा. ( का. अ. ७२ )

१ रुरुभैरव—हनुमान घांटावर.

२ चंडभैरव—मोठ्या दुर्गेवर नैऋत्यकोणांत.

३ असितांगभैरव—वृद्धकाळांत.

४ कपालीभैरव—लाटभैरव प्रसिद्ध.

५ क्रोधनभैरव--कामाक्षी देवीचे मंदिरांत.

६ उन्मत्तभैरव--भीमचंडीचे वाटेवर.

७ संहारभैरव—त्रिलोचनावर पाटण दरवाजा.

८ भीषणभैरव—भूतभैरव या नांवानें प्रसिद्ध.

ही यात्रा चतुर्दशी, अष्टमी, रविवार, मंगळवार, या दिवशीं केल्यानें सर्व भीति व क्षेत्रांत केलेलें पाप यांची शांति होते.

## (११) अकरावी ज्योतिर्लिंग यात्रा शिवरहस्यांत.

१ केदारेश्वर—केदारघांटावर.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

२ ओंकारेश्वर—मच्छोदरीजवळ छित्तनपुऱ्यांत.

३ वैद्यनाथेश्वर—शंखोद्धारा. कमच्छाजवळ.
४ घृष्णेश्वर——रेवडी तलावावर.
५ नागेश्वर——भोसल्यांचे घांटाजवळ.
६ महाकालेश्वर——वृद्धकाळांत.
७ भीमेश्वर——काशी करवटांत.
८ त्र्यंबकेश्वर——हौद कटोऱ्यावर. यास तिलोकनाथ म्हणतात.
९ विश्वेश्वर——प्रसिद्ध.
१० शैलेश्वर——मढिया घांटावर.
११ गोकर्णेश्वर——कुदई चौकीजवळ. गोविंदपुऱ्यांत दैलूचे गल्लींत.
१२ रामेश्वर—मानमंदिराजवळ.

आतां यापुढें काशीखंडांत सांगितल्याप्रमाणें अंगयात्रा दिली आहे. ज्या प्रमाणें सर्व ब्रह्मांड हें ईश्वराचें विराट्रूप समजून त्यांतील एकेका लोकांच्या ठिकाणीं एकेका अवयवांची कल्पना करतात. त्याप्रमाणें काशीखंडाची राजधानी जी वाराणसी तिला शिवरूप कल्पून तिच्यांतील निरानिराळ्या स्थानांना शंकराचे निरानिराळे अवयव समजून त्या सर्वांची दर्शने घेणें यालाच 'विश्वेश्वर स्वरूपात्मक अंगयात्रा' असें म्हणतात. या यात्रेंत विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी कीं, अंगयात्रेंत जी जी अवयवांची नांवे ज्या ज्या स्थानीं घातली आहेत ती उगीच कांहीं तरीच घातलेली नसून खरोखरीच त्या त्या अवयवस्थानांची निदर्शक आहेत. ही गोष्ट स्पष्टपणें लक्षांत यावी म्हणून अंगयात्रेचें विश्वेश्वर स्वरूपात्मक चित्र सोबत दिलें आहे. विमानांत बसून काशीचें निरीक्षण करण्याचा योग जर कोणास आला तर त्याला सदरहू चित्राप्रमाणेंच वाराणसींतील स्थानें आहेत ही गोष्ट बरोबर पटेल. मागें पृ. ७५ त वाराणसींत ओंकार, विश्वेश्वर व केदार अशी तीन खंडें सांगितलेली आहेत. ती ध्यानीं आणून हें चित्र पाहिले असतां मस्तकाचे भागालाच ओंकारखंड, कंबरेपर्यंत विश्वेश्वरखंड व त्या खालीं केदारखंड असल्याचे दिसून येईल.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# अंगयात्रात्मक वाराणसीस्वरूप शिवमूर्ति




चित्र आणि ब्लॉक करणार कलागृह छापखाना, पुणे.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## (१२) बारावी विश्वेश्वरस्वरूपात्मक अंगयात्रा.

१ कृत्तिवासेश्वर—( मस्तक ) हरतीर्थावर.

२ ओंकारेश्वर—( जटा ) छित्तनपुऱ्यांत.

३ त्रिलोचनेश्वर--( डोळे ) त्रिलोचनघांटावर.

४ गोकर्णेश्वर--( दक्षिणकर्ण ) कुदई चौकीजवळ.

५ भारभूतेश्वर--( वामकर्ण ) गोविंदपुऱ्यांत.

६ विश्वेश्वर<br>७ अविमुक्तेश्वर } (उजवे हात) { प्रसिद्ध.

८ धर्मेश्वर<br>९ मणिकर्णिकेश्वर } (डावे हात) { मीरघांटावर.<br>गोमठाजवळ.

१० कलशेश्वर—( उजवा पाय ) सिद्धेश्वरी मोहल्ल्यांत.

११ कपर्दीश्वर—( डावा पाय ) पिशाचमोचनावर.

१२ ज्येष्ठेश्वर—( नितंब ) कर्णघंटादेवीजवळ.

१३ मध्यमेश्वर—( नाभि ) मंदाकिनीजवळ.

१४ आदिमहादेव—( जटाजूट ) त्रिलोचनाचे गल्लींत.

१५ श्रुतीश्वर—( शिरोभूषण ) रत्नेश्वराजवळ.

१६ चंद्रेश्वर—( हृदय ) सिद्धेश्वरीचे मंदिरांत.

१७ आत्मावीरेश्वर—( मन ) संकटादेवीचे मंदिराजवळ.

१८ केदारेश्वर—( लिंग ) केदारघांटावर प्रसिद्ध.

१९ शुक्रेश्वर—( वीर्य ) कालिकागल्लींत.

आणखी जितकी कोट्यवधि लिंगें आहेत, तितके केंस, नखें, वस्त्रें आणि भूषणें वगैरे समजावी.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## ( १३ ) तेरावी बेचाळीसलिंग यात्रा.

१ ओंकारेश्वर—मच्छोदरीचे जवळ पटणी टोल्यांत.
२ त्रिलोचनेश्वर—प्रसिद्ध.
३ आदिमहादेव—त्रिलोचनाचे गल्लींत.
४ कृत्तिवासेश्वर—हरतीर्थावर.
५ रत्नेश्वर—वृद्धकाळास जाण्याचे रस्त्यावर.
६ चंद्रेश्वर—सिद्धेश्वरींचें मंदिरांत.
७ केदारेश्वर—केदारघांटावर.
८ धर्मेश्वर—मीरघांटावर धर्मकूपाचे गल्लींत.
९ आत्मावीरेश्वर—प्रसिद्ध.
१० कामेश्वर—त्रिलोचनाचे बाजाराजवळ.
११ विश्वकर्मेश्वर—हनुमानफाटकाचे पश्चिमेस.
१२ मणिकर्णिकेश्वर—गौमठाजवळ काकारामाचे गल्लींत.
१३ अविमुक्तेश्वर—ज्ञानवापीचे उत्तर कोपऱ्यांत.
१४ विश्वेश्वर—प्रसिद्ध.
१५ अमृतेश्वर—नीलकंठाजवळ कुंजबिहारी गंगापुत्राचे घरांत.
१६ तारकेश्वर—ज्ञानवापीचे पूर्वेकडे.
१७ ज्ञानेश्वर—लाहोरी टोल्यांत, दारूमल खत्रीचे घरांत.
१८ करुणेश्वर—लाहोरी टोल्यांत.
१९ मोक्षद्वारेश्वर—फुटके गणेशाचे जवळ.
२० स्वर्गद्वारेश्वर—ब्रह्मनालांत बच्चासिंहाचें घराजवळ.
२१ ब्रह्मेश्वर—बंगाली टोल्यांत.
२२ लांगलीश्वर—कचौडी गल्लीजवळ खोवा बाजारांत.
२३ वृद्धकालेश्वर—प्रसिद्ध.
२४ वृषेश्वर—गोरखनाथाच्या टिल्यावर.
२५ चंडीश्वर—सिक्रोल सदर बाजारांत.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

२६ नंदिकेश्वर—ज्ञानवापीचे पूर्वेकडे.

२७ महेश्वर—मणिकर्णिका घांटावर.

२८ ज्योतिरूपेश्वर—गोमठाजवळ काकारामाचे गल्लींत.

२९ शैलेश्वर—मढीया घांटावर वरणेचे कांठीं.

३० संगमेश्वर—आदिकेशवाजवळ.

३१ स्वर्लीनेश्वर—राजघांटावर नवा महादेव या नांवानें प्रसिद्ध.

३२ मध्यमेश्वर—मंदाकिनीचे जवळ.

३३ हिरण्यगर्भेश्वर—त्रिलोचनघांटावर.

३४ ईशानेश्वर—कोतवालपुऱ्यांत नव्या सडकेवर.

३५ गोप्रेक्षेश्वर—लालघांटावर.

३६ वृषभध्वजेश्वर—कपिलधारेंत.

३७ उपशांतेश्वर—अग्नेश्वर घांटावर.

३८ ज्येष्ठेश्वर—काशीपुऱ्यांत सप्तसागराजवळ.

३९ निवासेश्वर—भूतभैरवाचे जवळ.

४० शुक्रेश्वर—कालिकागल्लींत.

४१ व्याघ्रेश्वर—भूतभैरवाचे जवळ.

४२ जम्बुकेश्वर—बडे गणेशाचे दाराजवळ.

## ( १४ ) चवदावी छपन्न विनायकयात्रा, (का. अ. ५७)

### ( १ ) पहिलें आवरण.

१ अर्कविनायक—भदैनींत लोलार्काचे जवळ.

२ दुर्गविनायक—मोठ्या दुर्गेचे मंदिरांत.

३ भीमचंडविनायक—भीमचंडीमध्यें.

४ देहलीविनायक—पंचक्रोशींत रामेश्वराजवळ रस्त्यांत.

५ उद्दंडविनायक—पंचक्रोशींत वाटेवर पडतो.

६ पाशपाणिविनायक—सदरबाजार, सिक्रोल.

७ खर्वविनायक—वरणासंगम आदिकेशव.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

८ सिद्धिविनायक—मणिकर्णिकेवर चक्रपुष्करिणीजवळ.

## ( २ ) दुसरें आवरण.

९ लंबोदरविनायक—केदारेश्वराच्या सडकेवर.
१० कूटदंतविनायक--किनारामाचे स्थानांत.
११ शालकटंकटविनायक--ममनवाडी गांवांत तळ्याचे जवळ.
१२ कूष्मांडविनायक—फुलवरिया गावांत.
१३ मुंडविनायक—सदर बाजार चंडीदेवीचे मंदिरांत. सिक्रोल.
१४ विकटविनायक—नाटीइमलीवर धूपचंडीचे मंदिरांत.
१५ राजपुत्रविनायक—राजघांटावर किल्ल्यामध्यें.
१६ प्रणवविनायक—त्रिलोचनावर हिरण्यगर्भेश्वरांत.

## ( ३ ) तृतीय आवरण.

१७ वक्रतुंडविनायक—राणामहालाजवळ.
१८ एकदंतविनायक--बंगालीटोल्यांत पुष्पदंतेश्वरांत.
१९ त्रिमुखविनायक—सिगऱ्यावर त्रिपुरांतकेश्वरांत.
२० पंचास्यविनायक—पिशाचमोचनावर.
२१ हेरंबविनायक—पिशाचमोचनावर. वाल्मीकाचा टीला.
२२ विघ्नराजविनायक—चित्रकोटाचे तळ्यावर.
२३ वरदविनायक--राजघांटी सडकेवर.
२४ मोदकविनायक--त्रिलोचनावर आदिमहादेवाचे मंदिरांत.

## ( ४ ) चतुर्थावरण.

२५ अभयविनायक--दशाश्वमेधावर शूलटंकेश्वरांत.
२६ सिंहतुंडविनायक--बालमुकुंदजीचे चौहट्ट्यांत-ब्रह्मेश्वरांत.
२७ कूणिताक्षविनायक--लक्ष्मीकुंडावर.
२८ क्षिप्रप्रसादनविनायक—पितृकुंडावर-पित्रेश्वरांत.
२९ चिंतामणिविनायक--इसरगंगीवर-जागेश्वरांत.
३० दंतहस्तविनायक—मोक्षगणपतीचे मंदिराजवळ.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

३१ पिचिंडिलविनायक—प्रल्हादघांटावर.

३२ उद्दंडविनायक—त्रिलोचनाचे मंदिरांत.

## ( ५ ) पांचवें आवरण.

३३ स्थूलदंतविनायक—मानमंदिराजवळ–सोमेश्वराचे दारावर.

३४ कलिप्रियविनायक—साक्षिविनायकाजवळ प्रकामेश्वराचे मंदिरांत.

३५ चतुर्दंतविनायक—कोदईचौकीजवळ ध्रुवेश्वराचे मंदिरांत.

३६ द्वितुंडविनायक—ध्रुवेश्वराजवळ पिंपळा जवळील मंदिरांत.

३७ ज्येष्ठविनायक—काशीपुऱ्यांत ज्येष्ठेश्वराचे मंदिरांत.

३८ गणविनायक—मछरहट्ट्यांत गोविंदपुरागल्लींत भारभूतेश्वराचे मंदिरांत

३९ कालविनायक—रामघांटावर–वडाचे खालीं आहे.

४० नागेशविनायक—भोसल्याचे घांटाजवळ नागेश्वराचे मंदिरांत आहे.

## ( ६ ) साहावें आवरण.

४१ मणिकर्णिकाविनायक—सतुआ बाबाचे मठाजवळ स्मशानांत.

४२ आशाविनायक—मीरघांटावर-मारुतीचे मंदिरांत.

४३ सृष्टिविनायक—कालिकागल्लींत भवानी शंकरासमोर.

४४ यक्षविनायक—कोतवालपुऱ्यांत मुनशीरुद्रप्रसादाचे मंदिरांत.

४५ गजकर्णविनायक—कोतवालपुऱ्यांत ईशान्येश्वराचे मंदिरांत.

४६ चित्रघंटाविनायक—चित्रघंटा देवीचे जवळ.

४७ स्थूलजंघविनायक—आत्मावीरेश्वर मंदिरांत बुधमंगलेश्वराच्या मध्यें.

४८ मित्रविनायक—आत्मावीरेश्वराजवळ वसिष्ठवामदेवांचे जवळ.

## ( ७ ) सातवें आवरण.

४९ मोदाविनायक—ज्ञानवापीचे उतारावरचे घरांत.

५० प्रमोदविनायक—ज्ञानवापीचे थोडे दूरावर.

५१ सुमुखविनायक—विश्वेश्वरमंदिरांत विष्णूचे जवळ.

५२ दुर्मुखविनायक—ढुंढिराजाचे पाठीमागचे मंदिरांत.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

५३ गणनाथविनायक---ढुंढिराजाचे बाजारांत.

५४ ज्ञानविनायक---लांगूलेश्वराचे मंदिरांत.

५५ द्वारविनायक---काशी करवटामध्यें.

५६ अविमुक्तविनायक---काशी करवटांत आहे.

## ( १५ ) पंधरावी अंतर्गृहयात्रा. ( का. अ. १०० )

प्रातःस्नान करून, मोदविनायकादि पंचविनायकांना नमस्कार करून, विश्वेश्वराचें दर्शन घेऊन मुक्तिमंडपांत बसून संकल्प करावा व मणिकर्णिकेचें स्नान करून मौन धारण करावें. मग यात्रेस प्रारंभ करावा.

### ( १ ) प्रथम आवरण.

१ मणिकर्णिकेश्वर—गौमठाजवळ काकारामाचे गल्लींत आहे.

२ कंबल-अश्वतर—गौमठाजवळ काकारामाचे गल्लींत.

३ वासुकीश्वर---शिंद्याचे घांटावर. ४ पर्वतेश्वर—शिंद्याचे घांटावर.

५ गंगाकेशव—ललिता घांटावर. ६ ललितादेवी—प्रसिद्ध आहे.

७ जरासंधेश्वर---मीरघांटावर. ८ सोमेश्वर–मानमंदिराचे घांटावर.

९ वाराहेश्वर—दशाश्वमेधाचे घांटावर.

१० ब्रह्मेश्वर—बालमुकुन्दजीचे चौहट्टयावर.

११ अगस्तीश्वर—अगस्तिकुंडावर.

१२ कश्यपेश्वर---जंगमवाडीजवळ नवे सडकेवर.

१३ हरिकेशेश्वर—रामापुऱ्यांत खारिकुंव्याजवळ.

१४ वैद्यनाथेश्वर—कोदईचे चौकीजवळ.

१५ ध्रुवेश्वर—कोदईचे चौकीजवळ–गोसावीचे मंदिरांत.

१६ गोकर्णेश्वर---कोदईचे चौकीजवळ दयलूचे गल्लींत.

१७ हाटकेश्वर—हडहा महल्यांत.

१८ अस्थिक्षेपतटाक---हडहा महल्यांत.

१९ कीकसेश्वर---राजादरवाज्याचे पश्चिमेस–हडहावर.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

२० भारभूतेश्वर—मछरहट्टयाचे जवळ गोविंदपुऱ्याचे गल्लींत.

२१ चित्रगुप्तेश्वर—मच्छरहट्ट्यावर.

२२ चित्रघंटा—लक्खीचौतऱ्याचे पाठीमागें–चंदुनाऊचे गल्लींत.

२३ पशुपतीश्वर—पातपतेसराचे गल्लींत.

२४ पितामहेश्वर—सीतलागल्ली-काश्मीरीमल्लाचे घराजवळ.

२५ कलशेश्वर—ब्रह्मपुरींत–काश्मीरीमल्लाचे वाड्याजवळ.

२६ चंद्रेश्वर—सिद्धेश्वरीचे मंदिरांत. २७ वीरेश्वर–आत्मावीरेश्वर–प्रसिद्ध.

२८ विघ्नेश्वर—नीमवाले ब्रह्मपुरींत. २९ अग्नेश्वर—अग्नेश्वर घांटावर.

३० नागेश्वर—भोसल्याचे घांटावर. ३१ हरिश्चंद्रेश्वर—संकटाघांटावर.

३२ चिंतामणिविनायक—संकटाघांटावर.

३३ सेनाविनायक—संकटाघांटावर. ३४ वसिष्ठवामदेव—संकटाघांटावर.

## ( २ ) दुसरें आवरण.

३५ त्रिसंध्येश्वर—लाहोरीटोल्यांत फुटके गणपतीजवळ.

३६ विशालाक्षी—मीरघांटावर.

३७ धर्मेश्वर—धर्मकूपांत–मीरघांटावर.

३८ विश्वबाहुका—धर्मकूपाजवळ मीरघांट.

३९ आशाविनायक—मीरघांटाजवळ. मारुतीचे मंदिरांत.

४० वृद्धादित्य—मीरघांटावर. मारुतीचे मंदिरांत.

४१ चतुर्वक्त्रेश्वर—सकरकंदाचे गल्लींत.

४२ ब्राह्मीश्वर—सक्करकंदाचे गल्लींत.

४३ मनःप्रकामेश्वर—साक्षीविनायकाजवळ.

४४ ईशानेश्वर—कोतवालपुऱ्यांत नवे सडकेवर.

## ( ३ ) तिसरें आवरण.

४५ चंडी-चंडीश्वर—कालिकागल्लींत.

४६ भवानीशंकर—कालिकागल्लींत, शुक्रकूपाजवळ.

४७ ढुंढिराज—प्रसिद्ध आहे. ४८ राजराजेश्वर—ज्ञानवापीचे पश्चिमेस.

४९ लांगलीश्वर—खोवाबाजारामध्यें कचौडीगल्लीजवळ.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

५० नकुलीश्वर—विश्वनाथाजवळ मारुतीचे मंदिरांत.

## ( ४ ) चवथें आवरण.

५१ परान्नेश्वर—ज्ञानवापीचे बाजारांत–दंडपाणीचेजवळ.

५२ परद्रव्येश्वर. ,, ,, ,, ,,

५३ प्रतिग्रहेश्वर. ,, ,, ,, ,,

५४ निष्कलंकेश्वर. ,, ,, ,, ,,

५५ मार्कंडेयेश्वर. ,, ,, ,, ,,

५६ अप्सरसेश्वर—ज्ञानवापीचे उत्तरेचे फाटकाजवळ.

५७ गंगेश्वर—ज्ञानवापीचे ईशान्य कोपऱ्यांत.

## ( ५ ) पांचवें आवरण.

५८ ज्ञानवापी स्नान— ५९ नंदिकेश्वर–ज्ञानवापीचे पूर्वेकडे.

६० तारकेश्वर—ज्ञानवापीचे जवळ.

६१ महाकालेश्वर—ज्ञानवापीचे आग्नेय कोपऱ्यांत.

## ( ६ ) सहावें आवरण.

६२ दंडपाणि—ज्ञानवापीचे बाजारांत.

६३ महेश्वर—ज्ञानवापींत पिंपळाखालीं.

६४ मोक्षेश्वर—ज्ञानवापींत गुप्त आहे.

## ( ७ ) सातवें आवरण.

६५ वीरभद्रेश्वर—ज्ञानवापीचे नैर्ऋत्य कोपऱ्यांत गुप्त.

६६ अविमुक्तेश्वर—ज्ञानवापीचे उत्तरेचे फाटकाजवळ गुप्त.

ही अंतर्गृही यात्रा तुला अर्पण असो असें उदक सोडून, पंचविनायकांचें (५६ विनायकांतील ७ व्या आवरणाच्या आरंभीचे पांच) व श्रीविश्वेश्वराचें दर्शन करून क्षणभर मुक्तिमंडपांत बसून नंतर आपल्या घरीं जावें.

## ( १६ ) सोळावी पंचक्रोशी यात्रा

ही प्रदक्षिणा ४७ मैलांची आहे. मणिकर्णिकेपासून कर्दमेश्वर ७ मैल. भीमचंडी ९ मैल. रामेश्वर १४ मैल. शिवपूर ८ मैल. कपिलधारा ६ मैल. मणिकर्णिका ३ मैल. या स्थानांवर राहण्यास धर्मशाळा आहेत.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

प्रातःस्नानादि विधि आटोपून मुक्तिमंडपांत यात्रेचा संकल्प करावा. मग मणिकर्णिकेचें स्नान व विश्वेश्वराचें पूजन करून, मोदादि पंचविनायकाचें स्मरण करावे. निदान मणिकर्णिकेपासून ललितादेवीपर्यंत मौन धारण करून यात्रेस आरंभ करावा.

१ मणिकर्णिकेश्वराय नमः—माणिकार्णिकाघांटावर.

२ सिद्धिविनायकाय नमः ३ गंगाकेशवाय नमः

४ ललितादेव्यै नमः—ललिताघांटावर

५ जरासंधेश्वराय नमः—मीरघांटावर.

६ सोमेश्वराय नमः—मानमंदिराजवळ.

७ दालभ्येश्वराय नमः—मानमंदिराजवळ.

८ शूलटंकेश्वराय नमः—दशाश्वमेधाचे घांटावर.

९ आदिवाराहेश्वराय नमः—दशाश्वमेधावर.

१० दशाश्वमेधेश्वराय नमः—दशाश्वमेधघांटावर.

११ बंदिदेव्यै नमः—दशाश्वमेध घांटावर.

१२ सर्वेश्वराय नमः–पांडे घांटावर. १३ केदारेश्वराय नमः–केदारघांटावर.

१४ हनुमदीश्वराय नमः—हनुमानघांटावर.

१५ संगमेश्वराय नमः—असिसंगमघांटावर.

१६ लोलार्काय नमः—भदैनी–असीवर.

१७ अर्कविनायकाय नमः—लोलार्कावर–भदैनी.

१८ दुर्गाविनायकाय नमः—दुर्गादेवीचे मंदिरांत.

१९ दुर्गादेव्यै नमः—प्रसिद्ध आहे.

२० विष्वक्सेनेश्वराय नमः—चितईपुर गांवांत.

पुढें कर्दम तीर्थांचा पहिला मुक्काम करावा. तेथें श्राद्धादिकृत्य करून वास करावा. पहांटेस स्नान करून मार्ग चालण्यास आरंभ करावा. यात्रेंत व मुक्कामावर असतां उजवीकडे मलमूत्रादि करूं नये व थुंकूं नये. आणि उजव्या बाजूस मुक्कामही करूं नये.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

२१ कर्दमेश्वराय नमः
२२ कर्दमकूपाय नमः
२३ सोमनाथाय नमः
२४ विरूपाक्षाय नमः
२५ नीलकंठाय नमः

हे पांच देव मुक्कामावरचे आहेत यांचें दर्शन पूजन करावें.

मार्गांतील देवतांचीं दर्शनें घेत व भजन करीत चालावें.

२६ नागनाथाय नमः—अमरा गांवांत.

२७ चामुंडायै नमः—अवडा गांवांत.

२८ मोक्षेश्वराय नमः—मार्गांत. २९ करुणेश्वराय नमः

३० वीरभद्रेश्वराय नमः ,, ३१ विकटाक्षदुर्गायै नमः ,,

३२ उन्मत्तभैरवाय नमः—मार्गांत ३३ नीलगणाय नमः ,,

३४ कालकूटगणाय नमः ३५ विमलदुर्गायै नमः

३६ महादेवाय नमः ३७ नंदिकेशगणाय नमः

३८ भृंगीरिटीगणाय नमः ३९ गणप्रियाय नमः—गौरा गांवांत.

४० विरूपाक्षाय नमः ४१ यक्षेश्वराय नमः

४२ विमलेश्वराय नमः

४३ मोक्षदाय नमः—प्रयागपूर गांवांत.

४४ ज्ञानदेश्वराय नमः ४५ अमृतेश्वराय नमः

( २ ) दुसरा मुक्काम भीमचंडीचा. येथें गंधर्वसागर तीर्थ आहे. येथील सदरहूप्रमाणें सर्व कृत्यें आटोपून पहांटेस मार्ग धरावा. स्त्रियांनीं रक्ताक्ष-गंधर्वांचें दर्शन घेऊं नये.

गंधर्वसागर तीर्थानंतर—

४६ भीमचंडीदेव्यै नमः ४७ चंडविनायकाय नमः

४८ रविरक्ताक्षगंधर्वाय नमः ४९ नरकार्णवतारकशिवाय नमः

५० एकपादगणाय नमः—कवनार गांवांत.

५१ महाभीमाय नमः—राणीचे तलावावर.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

५२ भैरवाय नमः  ५३ भैरव्यै नमः

५४ भूतनाथाय नमः

५५ सोमेश्वराय नमः——सिंधुसागर गांवांत.

५६ कालनाथाय नमः  ५७ कपर्दीश्वराय नमः

५८ कामेश्वराय नमः—चौखंडी गांवांत

५९ गणेश्वराय नमः  ६० वीरभद्राय नमः

६१ चारुमुखाय नमः  ६२ गणनाथाय नमः

६३ देहलीविनायकाय नमः

याच्या मागें असलेल्या १६ विनायकांचें पूजन करावें.

६४ उद्दंडगणपतये नमः  ६५ उत्कलेश्वराय नमः

६६ रुद्राणीतपोभूम्यै नमः

( ३ ) पुढें तिसरा मुक्काम रामेश्वराचा करावा; तेथें वरणा नदीचें स्नान व श्राद्धादिक आटोपून रामेश्वरास रुद्राचा अभिषेक व पूजन करावें. रात्रीं वास करून भजनादिक करावें. पहांटेस स्नान करून देवदर्शन घेऊन मार्ग चालावा.

वरणातीर्थांचें स्नान—

६७ रामेश्वराय नमः  ६८ सोमेश्वराय नमः

६९ भरतेश्वराय नमः  ७० लक्ष्मणेश्वराय नमः

७१ शत्रुघ्नेश्वराय नमः  ७२ द्यावाभूमीश्वराय नमः

७३ नहुषेश्वराय नमः  ७४ असंख्यातेश्वराय नमः

७५ देवसंघेश्वराय नमः  ७६ पाशपाणिविनायकाय नमः

७७ पृथ्वीश्वराय नमः

७८ यूपसरोवरतीर्थाय नमः—येथें सुवर्णाचें दान करावें.

( ४ ) पुढें चवथा मुक्काम कपिलधारा तीर्थाचा करावा. मंदराचलाहून काशींत येतांना महादेवांनीं येथें मुक्काम केला तेंव्हां कपिलागाईनीं महादेवास आपल्या दुधानें अभिषेक केला. त्या दुधाचें तीर्थ झालें. म्हणून

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्याचें नांव कपिलधारा तीर्थ. येथें श्राद्धादि आटोपून वृषभध्वजाचें पूजन करून खिरीचा नैवेद्य दाखवून भोजन करावें. पहांटेस दर्शन घेऊन शेर किंवा अर्धाशेर जव बरोबर घेऊन यात्रेस आरंभ करावा.

कपिलधारातीर्थांत स्नान—

७९ वृषभध्वजेश्वराय नमः ८० ज्वालानृसिंहाय नमः

वरणासंगमांत स्नान—

८१ आदिकेशवाय नमः ८२ संगमेश्वराय नमः

८३ खर्व विनायकाय नमः—यास जवविनायक म्हणतात. येथून जव पेरण्यास सुरवात करावी. हा गणपति गंगेच्या कांठावर आहे. येथून गंगाकांठानें जव पेरीत जावें.

८४ प्रल्हादेश्वराय नमः—प्रल्हादघांटावर.

८५ त्रिलोचनेश्वराय नमः—त्रिलोचन घांटावर.

८६ बिंदुमाधवाय नमः—पंचगंगेच्या घांटावर स्नान करून दर्शन घेणें.

८७ गभस्तीश्वराय नमः—मंगलागौरीचे घांटावर मंदिरांत.

८८ मंगलागौर्यै नमः

८९ वासिष्ठवामदेवाभ्यां नमः—संकटाघांटावर.

९० पर्वतेश्वराय नमः—प्रसिद्ध. ९१ महेश्वराय नमः—प्रसिद्ध.

९२ सिद्धिविनायकाय नमः—येथें सर्व जव अर्पण करून मणिकर्णिका स्नान करावे. पुढें विश्वेश्वरादिकांचें दर्शन, तसेंच नित्ययात्रेंतील देव व मोदादिक पंचविनायकांचे स्मरण करून साक्षीविनायकाचें दर्शन घेऊन ज्ञानवापींत यावें. तेथें सर्व देवांस नमस्कार व प्रार्थना करून आपआपल्या घरीं जाऊन काशींचा पांचवा मुक्काम त्या दिवशीं करावा व श्राद्धादिक कृत्यें करून यात्रा संपूर्ण करावी. म्हणजे ही यात्रा पूर्ण होते.

सो०—मुक्ति–जन्ममहि जान, ज्ञान–खानि अघ–हानिकर।
जहँ बस संभु–भवान, सो कासी सेइय कस न॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

NANA SIMHASAN JNANAMANDIR
LIBRARY
Jangamawadi Math, Varanasi
Acc. No. ......3036..............

## ❀ मनोगत ❀

भूतं भव्यविशुद्धयर्थं स्वीयमालोच्यते कृतम् ॥
नहि लोकविनिंदार्थं स्वगुणख्यापनाय च ॥१॥
नामूलं लिख्यते किंचित् नानपेक्षितमूहितम् ॥
न न्यूनं नाधिकं किंतु यत् यथाऽऽसीत् तथैव तत् ॥२॥

सन १९३९च्या एप्रिल व मे महिन्यांत मी नागपुरांत असतांना बराच आजारी झालों. बिछान्यावर निजूनच होतों. प्रवचनें बंद ठेवावीं लागलीं होतीं. पडल्या पडल्या मनामध्यें अनेक विचार-तरंग उठले आणि असें वाटूं लागलें कीं, आज माझ्या वयाला पन्नास वर्षें पूर्ण होऊन एकावन्नावें वर्ष लागलें; आतां आपण दिवसेंदिवस थकत चाललों. आलेलें दुखणें उतरत्या वयामुळें लौकर सावरत नाहीं. आयुर्मर्यादेचें बिनचूक ज्ञान नसलें, तरी आपण त्या मर्यादेच्या जवळ जवळ जात आहों, यांत संशयच नाहीं; यांतून जरी बरा झालों, तरी यापुढें आपल्या हातून विशेष कांहीं कार्य होईल असें वाटत नाहीं; कारण बरा होऊन तरी मी करणार काय ! तर, सनातनी मताचा प्रचार. काळ तर इतक्या झपाट्यानें बदलत चालला आहे कीं, पूर्वी तो शतकानें बदलत असे, तर आतां दशकानें बदलूं लागला आहे; आणि अलीकडे तर तो वर्षावर्षानें बदलत जाणार आहे; या धकाधकीच्या मामल्यांत मी सनातनी मताचा प्रचार करणार तरी किती ! फार झालें तर माझ्या जीविकेपुरता त्याचा उपयोग करून घेतां येईल. तात्पर्य, यापुढें लोकोपयोगाच्या दृष्टीनें मी असलों काय आणि नसलों काय सारखाच. पण गेल्या पन्नास वर्षांत मी काय केलें, याचा विचार मनांत येतांच माझ्या गतआयुष्याचा चित्रपट सिनेमांतील चित्रपटाप्रमाणें माझ्या मनश्चक्षूंपुढून भराभर जाऊन पूर्वीच्या सर्व सुखदुःखात्मक गोष्टींची आठवण होऊन त्या पुढें उभ्या राहिल्या. नाटक किंवा सिनेमा पाहतांना दुसऱ्यावर आलेले बरेवाईट प्रसंग पाहून आपले मनांत

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

MUMUKSHU BHAWAN, VARANASI
LIBRARY



जर हर्षविषाद उत्पन्न होतात, तर मग आपल्यावरील ते ते प्रसंग आठवून हर्षविषाद झाल्याशिवाय कसे रहातील ? पण " गतास्ते दिवसाः" असें वाटून ती पूर्वस्मृतिही आपली करमणूक व समाधान करते.

माझा मानसिक चित्रपट प्रेक्षक होऊन जेव्हां मी पाहूं लागलें, तेव्हां त्यांत प्रतिबिंबित झालेलें माझें स्वरूप पाहून माझ्यांतील गुण व दोषही स्पष्ट रीतीनें मला दिसूं लागले. दोषांबद्दल वाईट वाटलें व गुणांबद्दल समाधान वाटलें. हें गुणदोषदर्शन नेहमीं आपल्या डोळ्यांसमोर राहिलें, तर तें आपल्या उर्वरित आयुष्याच्या शुद्धीकरितां खास उपयोगी पडेल, असें वाटूं लागलें. पण हें कसें घडणार ? सिनेमाला " चलाचित्रपट," म्हणतात. पण त्याची फिल्म तयार असल्यामुळें, इच्छा होईल, त्या वेळेस, तो जशाचा तसा पहावयास मिळतो. पण या मानसिक चित्रपटाचें चांचल्य तर इतकें अवर्णनीय आहे कीं, " असंशयं महाबाहो " म्हणून भगवंतांनाही तें कबूल करावें लागलें. आपलाच चित्रपट पुनः पहावासा वाटला, तर स्वतःला देखील तो जशाचा तसा केव्हांही दिसणार नाहीं. मग आपल्या पश्चात् इतर लोकांना तरी तो कसा दिसणार ? तेव्हां हा चित्रपट फिल्मप्रमाणें अक्षरसंनिविष्ट झाला, तर सर्वकाळ सर्व लोकांच्या उपयोगी पडेल, असा विचार सहज मनांत आला न आला, तोंच माझें चरित्र लिहिणार तरी कोण हा प्रश्नही पुढें दत्त म्हणून उभा राहिला. कारण माझ्या सबंध आयुष्यांत माझे हातून व्यावहारिक किंवा पारमार्थिक असें कोणतेंच लोकोपयोगी किंवा लोकोत्तर कृत्य घडलेलें नाहीं. मग ऐतिहासिक लेखक लिहिणार तरी काय ! मी संतमहंत नसल्यामुळें माझा शिष्यवर्गही नाहीं. मग "गुरुचरित्र," तरी लिहिणार कोण ! विरोधकांनी चरित्र लिहिलें, तर तें नखशिखांत दोषमयच असणार ! मुलगा किंवा कांहीं चाहते मित्र यांजकडून तें लिहिलें जाण्याचा संभव आहे. पण तेंही " आत्मीयं सर्वं कांतं पश्यति," या न्यायानें सर्व गुणमयच असें होणार ! म्हणून तें मी स्वतःच लिहिणें बरें असें ठरविलें.

माझें चरित्र मी स्वतःच लिहिण्याचें दुसरेंही कारण असें आहे कीं,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

आपल्या स्वतःच्या कार्यांच्या खऱ्याखुऱ्या मख्ख्या व त्याचे उद्देश दुसऱ्यास कळणेंच शक्य नसतें; मग तो लिहिणार तरी कसा? कारण त्याला आपल्या-इतकी आपली माहिती नसावयाची. पुष्कळ वेळां आपलें कार्य व त्याचा उद्देश ह्यावर त्याच्या मताची कळत वा न कळत छाप पडून त्या कार्याचा व उद्देशाचा विपर्यास होण्याचा संभव असतो व तसा तो होतोही. मग तो अनुकूल असो किंवा प्रतिकूल असो. तात्पर्य, आपला उद्देश आणि त्याला पोषक असणाऱ्या बारीकसारीकसुद्धां महत्त्वाच्या गोष्टी आपण जशा कळकळीनें व यथार्थ लिहूं शकतों तशा दुसरा कसा लिहूं शकेल? स्वतः चरित्र लिहिण्यांत एक दोष मात्र राहण्याचा संभव आहे व तो राहतोही. तो दोष म्हणजे 'स्वतःचे लहानसहान दोष झांकून ठेवणें, आणि न झांकण्याइतके ते मोठे असले तरी, त्यांवर गुणाचा रंग चढविणें,' हा होय. "आत्मनिरीक्षण," या प्रकरणांत हे दोष न राहूं देण्याची शक्य तितकी काळजी मी घेतली आहे; तरी पण कांहीं दोष न कळत राहून जाण्याचा संभव आहे. त्यांचा परिस्फोट समकालीन वाचक करतीलच. म्हणजे तोही दोष निघून जाईल. परंतु दुसऱ्याच्या लिहिण्यामुळें झालेला स्वरूपविपर्यास हा दोष दूर होणें फारच कठीण आहे.

आत्मचरित्र स्वतः लिहिण्याचें तिसरें कारण असें कीं, माझ्या समकालीन अशा राजकीय, सामाजिक व पारमार्थिक लोकांचीं चरित्रें मी जीं वाचलीं, त्यांपैकीं ज्यांचा माझ्याशीं परिचय, स्नेह, सहवास वगैरे कांहींच झालेला नाहीं अशा चरित्रांबद्दल मला कांहींच लिहावयाचें नाहीं; पण श्रीनारायणमहाराज, चौंडेमहाराज, पांगारकरमहाराज यांचा स्नेह होऊन चांगलाच सहवास घडला असून देखील, त्यांच्या चरित्रांत माझ्या परिचयाचें नुसतें दिग्दर्शनही केलेलें मला आढळलें नाहीं. दोघांच्या चरित्रलेखक भक्तांना, व स्वतः पांगारकरांना, माझी माहिती नाहीं म्हणावें, तर ह्या तिघां व्यक्तींशीं माझा चांगलाच परिचय आहे. तेव्हां माझ्या परिचयाचें महत्त्वच त्यांना वाटलें नसावें असें वाटतें. त्यांना कांहींही वाटो, मला मात्र त्यांच्या सहवा-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

सांत अनुभवलेला आनंद व्यक्त केल्याशिवाय चैन पडेना, आणि तो माझा आनंद दुसरा कोणीही लेखक व्यक्त करूं शकला नसता म्हणून मी स्वतःच आपलें चरित्र लिहिण्याचें मनांत आणिलें.

चौथें कारण असें कीं, "तुमच्या, तुमच्या वडिलांच्या व तुमच्या आजोबांच्या गोष्टी तुम्ही स्वत: लिहून ठेविल्या तर मला उपयोगी पडतील" असा चि. रामचंद्र याचा मला आग्रह पडला. या सर्व कारणांमुळें स्वतःच चरित्र लिहिण्यास बसलों. पण लिहिणार काय ? सबंध आयुष्यांत चटकन् डोळ्यांत भरण्यासारखा असा कोणताच पराक्रम मी केलेला नव्हता, कीं ज्याच्या अनुषंगानें चरित्र लिहिण्यास सुरुवात करावी. लिहावेसें तर वाटे, म्हणून स्वस्थ पडून लहानपणीं बाबांनीं आपल्या वडिलांच्या व आपल्या स्वतःच्या कांहीं गोष्टी मला सांगितल्या होत्या, त्या व माझ्या लहानपणापासून आजमितीपर्यंत, ज्या कांहीं व जसजशा मला आठवत गेल्या त्या तसतशा सर्व मी लिहून काढल्या. ज्यांचा परिणाम मला अजूनही जाणवतो, अशा कांहीं ठळक ठळक गोष्टी या वेळीं आठवल्या, बाकीच्या लहानसहान गोष्टी, महत्त्वाच्या असल्या तरी त्या या वेळीं आठवल्या नाहींत. टिपणें, रोजनिशी, वर्तमानपत्रांतील कात्रणें वगैरे जवळ ठेवण्याचें माहीतच नव्हतें. बड्या लोकांशीं झालेला थोडाफार मनोरंजक पत्र-व्यवहार जवळ होता. पण तोही अडगळ म्हणून कधींच फाडून टाकला होता. माझीं पुस्तकेंदेखील माझे जवळ नसतात. जें कांहीं जवळ राहिलें असेल, तें सर्व माझे डोक्यांतच! म्हणून जें जें, जसजसें घडलें, पाहिलें व अनुभविलें होतें तें तें तसतसेंच म्हणजे त्याला लोकांच्या भीतीनें अधिक, उणें अगर काल्पनिक रूप न देतां लिहून काढलें. ह्यामुळें अनेकांना वाईट वाटून माझेवर त्यांचा रोष होईल, हें मी जाणून आहें. पण आजपर्यंत मजवर झालेला अशांचा रोष इतका परमावधीचा होऊन गेला आहे कीं, आतां तो त्यापेक्षां जास्त करणें त्यांच्या स्वाधीनच नाहीं, असो.

मी स्वत: लिहिण्यास बसलों खरा, पण लिहिण्याची संवय नसल्यामुळें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मजकूर नीट जुळवून मला लिहितांच येईना. मुळांतच माझें चरित्र नीरस व अगदींच सामान्य. त्यांत आकर्षक असें कांहींच नाहीं. बरें, एखाद्या कुरूप माणसाला नीटनेटका पोषाख वगैरे घालून देखणा बनवावें, त्याप्रमाणें लेखन-कलेनेंच माझ्या चरित्राला नटवून आकर्षक करावें तर त्या कलेंतही मी अनभिज्ञच. मी मराठी भाषा शिकलेलों नसल्यामुळें उत्तम लिहिण्याजोगी शुद्ध मराठी भाषा मला चांगली येत नाहीं. व्याकरणाचें तर जन्मजात वांकडें आहे. नुसत्या भाषेचीच जेथें ही रडकथा, तेथें शब्दालंकार, अर्थालंकार, ध्वनि वगैरे, माझ्यासारख्या रखरखीत वेदांत्याला कोठून साधणार ? माझे कांहीं विद्वान् साहित्यिक मित्र आहेत, त्यांना म्हटलें असतें, तर त्यांनीं आपल्या घरच्या अलंकारांनी माझें चरित्र नटविलें असतें. पण ते "उंटाला चंद्रहार" घातल्याप्रमाणेंच झालें असतें. आणि जसें दुसऱ्याचे मागून आणलेले दागिने प्रसंगापुरते अंगावर घातले, तरी त्यापासून श्रीमंतीचें समाधान कोणासही लाभत नाहीं, तसेंच मलाही पण समाधान लाभलें नसतें. म्हणून मी स्वतः जसें येईल तसें वेड्यावांकड्या भाषेंतच, चरित्र खरडून काढलें आहे. झालें ! चरित्र वेडेंवांकडें व भाषाही त्याला साजेशीच. यामुळें, वाचकांची करमणूक होणार नाहीं, हें म्हणणें व्यर्थ आहे. कारण दुष्यंत व शकुंतला यांच्या भाषणांनी जितकी करमणूक होते, निदान तितकीच विदूषकाच्या भाषणानेंही होतेच कीं नाहीं ! उलट दुष्यंतशकुंतलेच्या भाषणांत रसिकांच्या डोक्याला थोडा तरी ताण पडतो, पण विदूषकाच्या भाषणांत, आनंदच आनंद !

खरें म्हटलें, तर माझें चरित्र वाचून त्यावर लोकांचा खंडनमंडनात्मक अभिप्राय घेण्याची माझी मुळीं इच्छाच नाहीं. माझ्या चरित्रापासून कोणाची करमणूक होवो, वा न होवो, माझी व माझ्या स्नेह्यांची करमणूक होईल खास. माझ्या चरित्रांत कोणास कांहीं घेण्यासारखें नाहीं असें मात्र मला मुळींच वाटत नाहीं. हें चरित्र वाचून, ह्या चरित्रनायकाप्रमाणें, आपण पृथ्वीला भारभूत होऊं नये, एवढी तरी मोठी घेण्यासारखी

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

नाहीं काय ! या पुस्तकांत मी आपलें खरोखरीचें नसतें चरित्रच रेखाटलें आहे. मी आपलीं राजकीय, सामाजिक व धार्मिक मतें त्यांत लिहिलीं नाहींत. त्याचें कारण असें कीं, तीं विस्तारानें लिहिलीं तर तो एक प्रचंड ग्रंथच होईल. तीं संक्षेपानें लिहिलीं तर संशयाला जागा राहणार. कदाचित् नागपूर, नाशिक व पुणें येथें झालेलीं माझीं अनेक प्रवचनें छापलीं गेलीं तर त्यांत माझ्या सर्व मतांचा व अध्यात्मज्ञानाचा भरपूर परिचय झाल्याशिवाय राहणार नाहीं. असो. सर्व चरित्र लिहून झाल्यावर मी स्वतःला विसरून, एक सामान्यवाचक या नात्यानें तें वाचलें, तेव्हां त्यांत विशेष असें कांहींच न वाटतां—

आला आला " भाउ " जन्मासि आला
गेला गेला बापुडा व्यर्थ गेला

असें वाटलें, व सामान्य वाचकालाही असेंच वाटेल. पण " हें चरित्र माझेंच आहे, व मीच लिहिलें आहे " असें लक्षांत आणिलें, तेव्हां मात्र सर्वच गोड दिसूं लागलें.

याला म्हणतात–"आत्मप्रीति."

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# आत्मनिरीक्षण

द्रष्टुं चित्रपटे स्वस्य चरित्रं चित्रितं मया।
किमत्र चित्रं स्वं वक्त्रं दर्पणे किं न दृश्यते ॥

येथें "आत्मनिरीक्षण" याचा अर्थ इतकाच आहे कीं, ज्याप्रमाणें आपण लोकांचे गुणदोष पाहून ते कोणत्या प्रकारचे आहेत हें ठरवितों, त्याचप्रमाणें आपले गुणदोष आपले आपण पाहून ते अमुक एक विशिष्ट प्रकारचे आहेत असें ठरविणें. पण लोकांचे काय, किंवा आपले काय, गुणदोष पाहून ते कोणत्या प्रकारचे आहेत हें नक्की ठरविणें फारच कठिण असतें. कारण ते तसेच आहेत, हें ठरविणारा कोण? तर आपणच. आपण म्हणजे जीवात्मा. त्याला तर शास्त्रानें मिथ्यात्माच म्हटलें आहे. तो स्वतःच आपले नेहमीं रंग पालटीत असतो. कारण तो अनादि कर्मजन्य व त्रिगुणात्मक, अशा वासनांच्या योगानें, पंचकोशांत विभागलेल्या देहत्रयाच्या पेटींत, पूर्ववासनारूपी रज्जूंनीं जखडून गेलेला आहे. मग तो स्वतंत्र रीतीनें निःपक्षपातपणें विचार कसा करूं शकेल? मुख्यात्मा किंवा शुद्धात्मा हा विचार करील म्हणावें तर तो स्वतःच ब्रह्म-रूप असल्यामुळें "जें झालेंचि नाहीं, त्याची वार्ता पुससी कायी," असेंच तो सांगेल. म्हणून निर्भेळ गुणदोषदर्शन होणें शक्यच नाहीं. तरी पण जसें कसोटीच्या साहाय्यानें सोन्याचे गुणदोष कळून येतात त्याचप्रमाणें शास्त्र व संतचरित्रें यांच्या साहाय्यानें व शुद्धबुद्धीनें विचार केला तर आपल्या गुणदोषांची परीक्षा आपणासही करतां येईल. स्वतंत्र बुद्धीनें तर ती केव्हांही करतां येणार नाहीं. बुद्धि ही जन्मांतरीय वासनांनीच घडविलेली असते. ती स्वतंत्र कशी असणार? म्हणून मी स्वतंत्र बुद्धीनें आपलें निरीक्षण न करतां शास्त्राधारें तें करणार आहें.

मी शास्त्रांतील प्राचीन संतांचीं लक्षणें वाचलीं, जुने व नवीन समकालीन संत यांचीं चरित्रें वाचलीं व स्वतःचेंहि चरित्र वाचलें. तेव्हां मला असें दिसून

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

आलें कीं, मी कोणत्याही संतमालिकेंत बसूंच शकत नाहीं. नंतर " मी कोण व कसा आहें " हें पाहण्याकरितां मी आपली वृत्ति अंतर्मुख करून पाहूं लागलों, तेव्हां निर्विषय व वृत्तिशून्य अशा ज्ञानसागरांत समुद्रांतील मिठाप्रमाणें " मी "च विरून गेलों. मग " मी कसा आहें " हें कसें कळणार ! आणि तें कळलें नाहीं, तर लिहिणार तरी काय ! म्हणून तो नाद सोडून मी योग-शास्त्राच्या साहाय्यानें माझ्या मनोवृत्तीवरून आपल्या चित्ताची परीक्षा केली. व आपलें लौकिक स्वरूप ठरविलें.

मनुष्याचे विकार, विचार व व्यवहार यांवरूनच चित्तांतील सत्व, रज व तम या त्रिगुणांचें कमीअधिक प्रमाण कळतें. एरव्ही त्रिगुण हे प्रत्यक्ष दिसणारे नाहींत. लोकोत्तर पुरुषांचे विकार व विचार प्रत्यक्ष कळत नसले, तरी त्यांच्या व्यवहारावरून सूक्ष्मबुद्धीच्या माणसाला ते कळूं शकतात; मग स्वतःचे स्वतःला ते कसे कळणार नाहींत ! असो.

माझ्या मनांतील विकार व विचार यांचा विचार करून माझ्या चित्तांत गुणत्रयापैकीं कोणत्या गुणांचें किती प्रमाण आहे हें पाहण्याकरितां प्रथम मी त्रिगुणांच्या धर्मांचा विचार योगशास्त्रावरून करतों. " चित्त व त्याच्या वृत्ति, " हाच त्या शास्त्राचा मुख्य विषय आहे; आणि तो सर्व शास्त्रकारांना मान्य आहे.

मानवी चित्त हें मुळांतच राजस आहे. तरी पण व्यक्तिशः रजोगुणाच्या कमीअधिक प्रमाणानें त्याचे तीन प्रकार अनुभवास येतात. त्यांनाच व्यव-हारांत सात्विक, राजस व तामस अशा संज्ञा आहेत. रजोगुणानुविद्ध सत्व गुणाचें प्राधान्य ज्यांत असेल तें सात्विक; ज्यांत रजोगुणाचेंच साम्राज्य असेल तें राजस; व ज्यांत रजोगुणानुविद्ध तमोगुणाचें प्राधान्य असेल तें तामस.

पातंजल योगशास्त्रांत सात्विकाला विक्षिप्त, राजसाला क्षिप्त, व ताम-साला मूढ अशीं नांवें आहेत.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## सात्विक किंवा वि-क्षिप्त चित्त

सात्विक चित्त, सत्वांशाच्या आधिक्यामुळें सदसद्विवेकयुक्त, प्रायः विषयसाधनविमुख व ईश्वराराधन, धर्माचरण वगैरे सत्कर्मांत अनुरक्त असतें. त्यांत सरलता, दया, क्षमा, सत्य, सहिष्णुता, शुचिर्भूतता, संतोष, निरलसता, विनय, औदार्य, वृद्धांविषयीं आदर हे धर्म वास्तव्य करतात. आणि प्रसंगीं शौर्य, धैर्य, समयसूचकतादि धर्मही प्रकट होतात. मानवी चित्त मूळचेंच राजस असल्यामुळें तें विक्षेपयुक्त असतेंच, पण तो विक्षेप सत्वगुणाचा समुळ नाश न करतां त्याच्याशीं मिळूनमिसळून असतो. म्हणून तें चित्त केव्हां चंचल तर केव्हां शांत असतें. हाच या चित्ताचा विशेष असल्यामुळें त्याला वि-क्षिप्त असें म्हणतात.

## राजस किंवा क्षिप्त चित्त

राजस चित्तांत, रजोगुणाचेंच प्राधान्य असतें. हें चित्त नेहमीं विषय-सुख-परायण, सदासर्वकाळ कामक्रोधादि विकारानी संतप्त असतें. व त्यांत कुटिलता, दंभ, अहंकार, वृथाभिमान, असहिष्णुता, असमाधान, व्यग्रता, येन केन प्रकारेण स्वार्थसाधन वगैरे धर्म असतात.

## तामस किंवा मूढ चित्त

तामस चित्त, तमोगुणाच्या आधिक्यामुळें अज्ञान, आळस, निद्रा, विवेक-शून्यता, नीचपणा, क्रौर्य वगैरे धर्मांनीं व्यापलेलें असतें.

एवंच मानवी चित्तच राजस असल्यानें तें चंचल तर खरेंच; पण सत्व-मूलक शांति व तमोमूलक अज्ञान, ह्यांच्या कमीअधिक मिश्रणानें त्याच्या चंचलतेंत कमीअधिकपणा येत असतो. प्रत्येक मनुष्याचें चित्त ह्या तीन प्रकारांपैकीं कोणत्या तरी एका प्रकारचें असतेंच. तरी पण त्यांतही गुणांच्या कमीअधिक मिश्रणामुळें तें अनेक प्रकारचें बनलेलें असतें.

या शास्त्राच्या कसोटीला आपले विकार व विचार लावून पाहावे व त्या-वरून आपण सात्विक, राजस किंवा तामस आहों हें ठरवावें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मीही आपलें स्वभाव-चित्र रेखाटलें आहे. तें वाचून मी कोणत्या गुणांत बसतों हें ठरविण्याचें काम आतां वाचकांवरच सोंपवितों.

## मी कसा आहें ?

मी लहानपणापासूनच प्रकृतीचा नाजुक किंवा अशक्त असा आहें. विशेष असा कोणताही रोग मला नसला तरी नेहमीं माझी कांहीं ना कांहीं पिरपिर चालू असतेच. माझा स्वभाव मात्र लहानपणापासूनच मानी, उतावळा व क्रोधी आहे. अगदीं लहानपणीं आमच्या शेजाऱ्यांनीं आपल्या घरांतून एकदां मला सहज घालवून दिलें. तेव्हांपासून त्यांनीं मला अनेक वेळां बोलाविलें, तरी त्यांच्या घरांत मी पुन्हां कधीं सुद्धां पाऊल टाकलें नाहीं; हें मला अजूनही चांगलें आठवतें. मी उतावळा इतका आहें कीं, त्यामुळें पुष्कळ वेळां माझा मलाच राग येऊन पश्चात्ताप होतो. पण "योगायोग असाच होता," असें वाटून समाधान होतें. उत्तम कपडे स्वतःला मिळाल्यावरच वापरूं लागलों. आरंभीं काशींत उघडा, म्हणजे धोतर व उपरणें एवढाच माझा पोषाख असे. पुढें नारायणमहाराजांचे सान्निध्यांत त्यांच्यासारखाच पोषाख करूं लागलों. नंतर पुनः पूर्वीप्रमाणेंच धोतर व उपरणें याच पोषाखावर आलों. तो पोषाख अद्यापही कायम आहे. याच पोषाखांत मंदिरप्रवेश बिलासंबंधानें व्हाइसरॉयसाहेबांची भेट घेतली होती.

माझ्या चित्तांत काम व लोभ यांच्यापेक्षां क्रोधाचेंच प्रमाण जास्त आहे. कारण, काम आणि लोभ यांनीं माझा क्रोध शांत होत नाहीं; उलट काम व लोभ यांचीच राखरांगोळी होते. पण क्रोधापासून दुसऱ्याचा घातपात करण्याचे तमोगुणी विकार उत्पन्न न होतां, त्याचा परिणाम विषय त्यागांत होतो, आणि विचारानें शांत झालेल्या वृत्तींत क्रोध विलीन होतो. त्यामुळें सुख-समाधान लाभतें. मी आपण होऊन कोणाशीं भांडणाचा प्रसंगच आणीत नाहीं. कोणी खाजवून खरूज काढलीच तर क्षमाही करीत नाहीं. भांडण झालेंच तर एक महिनाभर त्याचा विचार करतों. त्यांत माझीच चूक आढळली, तर मी त्यांचेकडे जाऊन क्षमेची याचना करतों. आणि विचारांतीं माझी

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

चूक नसून प्रतिपक्षाची चूक आढळली, तर त्यांचेपासून क्षमेच्या याचनेची अपेक्षा करतों. क्षमा न मागतां त्यानें वैरच सुरू ठेविलें तर त्या माणसाला मी कायमचाच विसरून जातों. तो इतका कीं, तो जगांतच नाहीं असें समजून त्याचेबद्दल बरें किंवा वाईट कांहींच मनांत आणीत नाहीं. सर्वच कार्य आपल्या मताप्रमाणें होत असल्यास त्यांत पडावें; नाहीं तर सर्वस्वीं दूर राहावें, असें वाटून त्याप्रमाणें वागतों. त्वयार्धं मयार्धं असें गुळमट वागण्याकडे माझ्या मनाची प्रवृत्तीच होत नाहीं. थोडेंही मनाविरुद्ध झालें तर मी चिडचिडून जातों आणि मजवर संन्यास घेण्यापर्यंत पाळी येते. शेवटीं विचारानें मनाला शांत करतों म्हणा! पण तो विचार त्यागाकडेच वळतो. माझी टापटीप व शिस्त लोकांना त्रासवून सोडते. माझ्या तापट व चिडचिडया स्वभावामुळें माझ्या संगतींत लोक फार दिवस टिकत नाहींत. जे टिकले आहेत, त्याचें कारण, त्यांचाच भोटेपणा. एखादे वेळीं माझी आई मला रागानें म्हणत असे कीं, तूं मागच्या जन्मीं वाघ होतास. ह्या एवढ्याच बाबतींत सासू आणि सून यांचें ऐकमत्य होतें. कदाचित् हें खरेंही असेल. आपल्या संगतींत असणारांना सुखशांति मिळावी असें मला वाटत असतें. पण तसें होत नाहीं, हा माझा स्वभावदोष आहे. तो सुधारण्याचा प्रयत्न मी करतों, पण तो मला साधत नाहीं; याचें फार वाईट वाटतें. विद्या-गुरु, विद्वान् व ज्या इतर महापुरुषांचा मला सहवास झाला, ते मोठ्याच योग्यतेचे असून देखील, त्यांच्याकडून जितका लाभ करून घ्यावयास पाहिजे होता, तितका मी करून घेतला नाहीं. पण त्यांनीं मात्र माझेवर फार प्रेम केलें.

माझ्या अध्ययनाची तऱ्हा कांहीं निराळीच असे. गुरुजी शिकवीत असतांना पोथीकडे माझें लक्षच नसे. ते काय सांगतात ह्याकडे मात्र पूर्ण लक्ष ठेवून त्यापैकीं अत्यंत महत्त्वाचा भाग व कांहीं वाक्यें त्याच वेळेस कायमचींच डोक्यांत बसवून ठेवीत असें. माझ्या अगोदर व नंतर ज्या ज्या विद्यार्थ्यांचे पाठ होत, ते सर्व मी एकीकडे बसून ऐकून त्यांतला सारांश लक्षांत ठेवीत असें. त्यामुळें एक दोष होई. तो हा कीं मला ग्रंथ येत नसे. म्हणूनच कोणतीही

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

परीक्षा मला देतां आली नाहीं. त्यामुळें माझे सहाध्यायी मला मूर्ख समजत. "हा बुद्धिमान् असून अभ्यास करीत नाहीं, याला गोष्टी ऐकाव्याशा वाटतात," असं गुरुजींचेंही मत झालें होतें. माझ्यामागें "हा अलंकार विद्यार्थी आहे," म्हणजे "शोभेचा विद्यार्थी आहे", असेंही ते म्हणत. मी इंग्रजी शिकलेल्या मंडळींत बराच वावरत असें. मुद्दामच नवीन मताची बाजू घेऊन लोकांशीं वादविवाद करीत असें. राहाणीही प्राचीन शास्त्र्यांप्रमाणें नसे. म्हणून गुरुजी व सहाध्यायी मला मनांतून नास्तिकच समजत असत. त्यामुळें पुढें ज्यांनीं माझ्या सहाध्यायांस स्वतः शिफारस करून मोठमोठ्या जागेवर नेऊन बसविलें आणि "महामहोपाध्याय," पदवीही त्यांना मिळवून दिली, त्या माझ्या गुरुजींनीं माझेकडे मात्र पूर्ण दुर्लक्ष केलें. हा त्यांचा दोष नसून तो माझ्या वागणुकीचाच दोष होता. पण "वाईटांतूनही चांगलें निघतें," या म्हणीप्रमाणें झालें. माझ्या अध्ययनाच्या तऱ्हेंत वरील दोष उत्पन्न झाले खरे. पण नकळत त्याबरोबरच अनेक गुणही उत्पन्न झाले. ते असेः—मला घोकंपट्टीचा अभ्यास कधींच करावा लागला नाहीं; महत्त्वाचा भाग लक्षांत असल्यानें शिकवितांना सर्व ग्रंथ आपोआपच लागत असत; सर्व विद्यार्थ्यांचे पाठ एकीकडे बसून ऐकत असल्यामुळें बुद्धीवर ताण न पडतांच सर्व ग्रंथांचीं प्रमेयें सहज माझ्या डोक्यांत बसलीं; यामुळें ते ग्रंथ शिकण्याची आवश्यकताच पडली नाहीं. शास्त्रीय तत्त्वें व्यावहारिक गोष्टींत बसविण्याची संवय किंवा हौस तेव्हांपासूनच आहे. शिकतांना ग्रंथाकडे लक्ष नसल्यानें परीक्षा देतां आली नाहीं हें खरें. पण यामुळें परीक्षेंत उत्तीर्ण झाल्यानंतर पदवीधर होऊन सर्कशींतल्या घोड्याप्रमाणें संकुचित क्षेत्रांत राहून नोकरी करण्याचा व नोकर होऊन आपला देह व मन मालकाला विकण्याचा प्रसंगही मजवर आला नाहीं. गुरुजींचा व सहाध्यायांचा मला पाठिंबा नसल्यामुळें आपल्याच पायावर उभें राहण्याची मला संवय लागली. माझे हातून जें कांहीं अल्पस्वल्पही घडलें त्यांत माझ्या प्रारब्धाशिवाय दुसरा कोणीही भागीदार नाहीं. पुढें माझे गुरुजी धार्मिक प्रचाराकरितां जेव्हां नागपुरास आले त्या वेळीं नागपुरांतील माझी कीर्ति, माझ्या

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

प्रवचनास जमणारा अफाट श्रोतृसमुदाय, प्रवचनामुळें लोकांच्या नास्तिक मतांचें झालेलें परिवर्तन व सनातन्यांच्या मताबद्दल होऊं लागलेला आदर, " ज्या देवळांत अस्पृश्य जातील त्या देवळांत मी केव्हांही प्रवचन सांगणार नाहीं," या भीतीनें गांधीजी नागपुरास येऊनसुद्धां एकही मोठें देऊळ अस्पृश्यांना खुलें झालें नाहीं, वगैरे वगैरे गोष्टी ऐकून माझेबद्दलचें त्यांचें पूर्वींचें मत बदललें व त्यांचें माझेवर अतिशयच प्रेम जडलें. त्यांत सर्वांचे अगोदर मीच 'महामहोपाध्याय', या पदवीचा त्याग केल्याचें त्यांस कळल्यामुळें अधिकच भर पडली. काशींत गेल्यावर पंडितांची सभा भरवून त्यांनीं स्वतः मला शाल देऊन व सभेकडून ' विद्वन्मान्य,' ही पदवी देऊन त्यांनीं माझें मोठें कौतुक केलें. तेव्हांपासून महत्त्वाच्या कार्यांत ते मला सल्ला विचारीत व केव्हां केव्हां मोठ्या आग्रहानें वर्णाश्रम स्वराज्यसंघाच्या प्रचाराकरितां मला बरोबर घेऊन जात.

कर्म व उपासना यांवर माझी पूर्ण श्रद्धा असली तरी माझें मन मात्र लहानपणापासूनच वेदांतविचाराकडे ओढ घेतें. तपश्चर्या अशी मी कोणतीच केली नाहीं. विद्या, यश, धन, कीर्ति यांकरितां कोणतेंही जपजाप्य केलें नाहीं. संध्या, ब्रह्मयज्ञ, वैश्वदेव, रुद्राभिषेक व रोज १२ अध्याय भागवत व गीता इतकेंच माझें नित्यकर्म असे. २४ तासांत सबंध भागवताचें पारायण, अशीं दोन पारायणें मी केडगांवीं केलीं. अलीकडे तर हें सर्व मुलाचे स्वाधीन करून फक्त संध्या, ब्रह्मयज्ञ व प्रवचन इतकेंच माझें नित्यकर्म चालू आहे. २४ एकादशा, रामनवमी, कृष्णाष्टमी व शिवरात्र इतके पूर्ण उपवास करतों. ह्याशिवाय श्रावणी सोमवारही करतों. शरीराची अशक्तता किंवा मनाचें दौर्बल्य या कारणामुळें आचार व धर्म कडक रीतीनें पाळला जात नाहीं, याची मला जाणीव आहे. माझीं प्रवचनें शेंकडों लोकांनीं लिहून घेतलीं आहेत. कोणी तीं कवितावद्ध करून छापलींही आहेत. मी मात्र अजून एकही पुस्तक लिहिलें नाहीं. याचें कारण, मला लिहिण्याचा सराव नाहीं. हातांत लेखणी घेतली कीं कांहींच आठवेनासें होतें. नाहीं म्हणावयाला " योगशास्त्रावरील

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

प्रवचनें," या नांवाचें ७५ पानी एक पुस्तक वेड्यावांकड्या मराठी भाषेंत लिहून छापलें आहे. संस्कृत व मराठी कविता करावी असें मनाला पुष्कळ वाटे, पण जेव्हां एकएका श्लोकाला तीनतीन चारचार दिवस लागूनही त्यांत व्याकरणाच्या व छंदाच्या चुका राहूं लागल्या, तेव्हां तो नाद सोडून दिला. मी अनेकांना शिकविलें. पण माझा "हा शिष्य", म्हणून कोणाकडेच बोट दाखविण्यास माझें मन घेत नाहीं. कारण माझें शिष्यत्व तो कबूल करील किंवा नाहीं याचीच मला शंका येते, व तसा अनुभवही आला आहे. साहित्याचार्य बाळशास्त्री हरदास व ह. भ. प. निजामपूरकर बोवा हे माझे शिष्य म्हणून स्वतःच सांगतात. पण त्यांची विद्वत्ता व अस्खलित वक्तृत्व पाहून लोकांना त्यांचें सांगणें खरें वाटेल किंवा नाहीं, याचा मला संशय येतो. जें मिळेल तें जेवण चालतें. त्यांत आवड, नावड अशी कांहींच नाहीं. झोंप मात्र भरपूर येते. अभ्यासानें किंवा स्वप्नानें तिला अडथळा कधींच केलेला नाहीं. दंड, बैठका, मलखांब वगैरे व्यायाम कांहीं दिवस केला; पण तो नियमानें कधींच झाला नाहीं. व्यसन असें कोणतेंच नव्हतें व नाहीं. तपकीर कोणी दिलीच तर ओढतों, पण ती नसली तर, जीव व्याकुळ तर होत नाहींच, पण जवळ असूनसुद्धां चुकूनही तिची प्रवचनांत आठवण देखील होत नाहीं. नाटक व सिनेमा पाहतों; पण तें केव्हां स्नेह्यांच्या मुर्वतीखातर, तर केव्हां हल्लीं लोकमताचा प्रवाह कोणीकडे वाहात आहे हें समजून घेऊन त्याची इष्टानिष्टता सांगण्याकरितां. पत्ते वगैरे करमणुकीचे खेळ चांगलेसे येतच नाहींत. मित्रांनीं खेळण्यास शिकवून पाहिलें. पण त्यांत चित्तच रमत नाहीं. म्हणून मला आतां खेळण्याचा आग्रह कोणी करीनासे झालें. त्रास चुकला! गप्पागोष्टींत मात्र चित्त थोडें फार रंगतें. कीर्तन, पुराण, प्रवचन मात्र कोणाचेंही असो ऐकतों. तें ऐकून स्वतःच्या प्रवचनाची अवश्य ती सुधारणा करतों. नवरसांपैकीं शांतिरस व वीररस हे फार आवडतात. बाकीचे जेमतेम कामापुरतेच. थाटामाटाच्या श्रीमंती पोषाखापेक्षां लष्करी पोषाख किंवा साधासुधा ऋषिवेष, डोळ्याला विशेष आवडतो. तंबोऱ्यापेक्षां

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

रायफल प्रिय वाटते. गायनांत ध्रुपदाची लढत ऐकतांना आनंद होतो. जंगली जनावरांत हरिण किंवा वाघ पाहण्यांत मन रमतें. तीर्थयात्रेपेक्षां संतसमागमांत आनंद वाटतो. मी लोकांना जितका विद्वान दिसतों, तितका मी नाहीं, हें माझें मन मला सांगतें. माझा मानसन्मान माझ्या योग्यतेपेक्षां जास्त होतो असें नेहमीं मला वाटतें.

अध्ययनाप्रमाणेंच माझ्या प्रवचनाची तऱ्हाही गांवानिराळीच आहे. ती प्राचीन पद्धतीप्रमाणें पुराणाची तऱ्हा नाहींच नाहीं पण नवीन प्रवचनाचीहि ती तऱ्हा नव्हे. अगदीं घरांतील चुलीपासून तों थेट सार्वभौमाच्या सिंहासना-पर्यंतचे व त्याचप्रमाणें सहाही शास्त्रांपासून तों थेट नाटक सिनेमाच्या हँड-बिलापर्यंतचे सर्व विषय माझ्या प्रवचनांत आले नाहींत असें कधींच होत नाहीं. सगळ्या प्रकारच्या पंचायती त्यांत हटकून यावयाच्याच. अशा तऱ्हेचें प्रव-चन सांगण्यांत माझा उद्देश असा असतो कीं, श्रोत्यांची करमणूक करीत करीत त्यांना शुद्ध शास्त्रीय तत्त्वें समजून द्यावीं. त्याचप्रमाणें हल्लीं शास्त्रीय तत्त्वांचा कसा विपर्यास होत चालला आहे हेंही त्यांच्या मनांत ठसवावें.

कांहीं चालीरीति अशास्त्रीय असून देखील परंपरेनें पूर्वींपासून चालत आलेल्या आहेत, म्हणून त्यांनाच कवटाळून बसल्यामुळें धर्माचरणाचे ऐवजीं आपण कसे अधर्माचरणच करीत आहों, हें त्यांच्या मनांत बिंबवावें.

या प्रवचनांच्या द्वारा देश, समाज शास्त्र, धर्म व ईश्वर यांची थोडीफार सेवा आपल्या हातून घडावी. प्राचीन पुराणपद्धतीनें हें सर्व कार्य पूर्णपणें साधत नाहीं असा माझा अनुभव आहे. अशा तऱ्हेच्या प्रवचनांला सखोल शास्त्रा-भ्यासाशिवाय वक्तृत्व, बहुश्रुतपणा, आधुनिक अनेक विषयांचें वाचन, अद्या-वत् चालू असलेल्या सर्व चळवळींची साग्र माहिती, निरीक्षणशक्ति, स्मरणशक्ति वगैरे साधनांची फारच आवश्यकता लागते. यांपैकीं कांहीं गोष्टी तर जन्मांतरीय कर्मांमुळें नैसर्गिक येणाऱ्या असतात. त्या प्रयत्नांनें उत्पन्न होणाऱ्या नाहींत. पण अनेक विषयांचें वाचन मात्र प्रयत्नसाध्य आहे. म्हणून वर उल्लेखिलेल्या गोष्टी माझ्या स्वाधीनच्या नसल्या, तरी

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

सर्व विषयांचें साधेल तितकें वाचन तरी करावें असें मनांत आलें. पण इतकीं पुस्तकें मला गरीबाला कशीं मिळणार व कोठून ? पुस्तकें विकत घेण्याचें सामर्थ्य नाहीं. वाचनालयांत जावें तर एका वेळेला एकच पुस्तक मिळणार ! मला संवय तर अशी लागलेली होती कीं, एक पुस्तक वाचून कंटाळा आला म्हणजे लगेच दुसऱ्या विषयाचें पुस्तक वाचण्यास हातीं घ्यावयाचें. हीच माझी विश्रांती. ही माझी लहर वाचनालयांत कोण पुरविणार ? म्हणून मी एक युक्ति केली. ती अशी कीं, एक बुकसेलर ( पुस्तकविक्रेता ) गांठला. व त्याच्याशीं स्नेह जोडून त्याचे दुकानावर जाऊन बसूं लागलों व इच्छेस येतील तीं पुस्तकें घेऊन तेथेंच वाचूं लागलों. सर्व शास्त्रें व काव्य, धर्म-शास्त्र, वैद्यशास्त्र, ज्योतिषशास्त्र, मंत्रशास्त्र, पाकशास्त्र, वगैरे वगैरे, सर्व उप-शास्त्रांचीं, मतमतांतरांचीं सर्व पुस्तकें, तीं समजोत वा न समजोत मी वाचून काढलीं. त्यांपैकीं पुष्कळ माझ्या बुद्धिमांद्यामुळें माझे लक्षांत राहिलीं नाहींत. त्यांचा थोडासा अंश लक्षांत राहिला, त्याचाच उपयोग प्रवचनांत करून घेत असतों. माझे प्रवचनांत, माधुर्य व प्रसाद हे गुण माझे वडिलांकडून मला आलेले आहेत, आणि विद्वत्ता ही माझे गुरुजींची देणगी आहे. विषयांतर, अस्ताव्यस्तपणा, विनोद वगैरे माझी स्वतःचीच कमाई आहे.

माझ्या प्रवचनास बसणें म्हणजे श्रोत्यांनीं ती आपण होऊन प्रेमानें स्वीकारलेली शिक्षाच होय. प्रवचनाचा मूळ विषय कोणता, व मी कोठें वहकत चाललों आहें, हें कित्येक वेळां माझें मलाच कळत नाहीं. मग श्रोत्यांना तें कोठून कळणार ? भटकतां भटकतां केव्हां तरी मूळ विषयांवर मी येतों, हें मात्र खास. श्रोते बिचारे टकटक पहात व ऐकत असतात; माझें प्रवचन म्हणजे अनेक विषयांचें कडबोळें म्हटलें तरी चालेल. त्यामुळें “ आज प्रवचनांत काय ऐकलें ” असें जर एखाद्या श्रोत्यास विचारलें, तर “ कांहींच सांगतां येत नाहीं, ” असें तो उत्तर देईल. फार तर “ मजा आला, ” एवढेंच तो सांगेल. कारण तें तसेंच अस्ताव्यस्त असतें. कांहीं श्रोते त्यांतूनही व्यवस्थित सारांश काढून घेतात, ही गोष्ट निराळी. ती

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्यांच्या बुद्धिमत्तेची निदर्शक आहे. प्रवचनांतील दृष्टांत अगदीं घरगुतीच असल्यामुळें कोणाला बरें वाटतें तर कोणाला दुःख होऊन राग येतो. प्रवचनांत गुण म्हटला तर त्याची वेळ केव्हांही चुकून देत नाहीं, आणि श्रम न करतां अनेक विषयांची माहिती श्रोत्यांना बसल्याजागींच होते, एवढाच.

माझ्या प्रपंचासंबंधानें विचार केला तर तो फारसा समाधानकारक नाहीं असेंच म्हणावें लागेल. विवाह दोन झाले, पण दोन्ही बायका अल्प वयां-तच वारल्यामुळें थाटानें गृहस्थाश्रम करतां आला नाहीं. मुलांचींही दोन लग्नें झालीं. सांपत्तिक स्थितिही अगदींच बेताबाताची आहे. उत्पन्न काय तें पुराणावेंच. स्वतःचें घर देखील नव्हतें, पण तें नुकतेंच झालें. बंधूना संतति झालीच नाहीं. दोघी बहिणी. त्यांपैकीं एक वारली व एकीचा नवरा अल्पवयांतच वारला. माझी शरीरप्रकृति नेहमीचीच अशक्त. कांहीं प्रापं-चिक सुख असेल तर मुलगा विद्वान व सुशील आहे. आणि एकुलत्याएक मुलीला घर उत्तम मिळालें आहे. कर्ज नाहीं. पुराणाशिवाय दुसरा प्रतिग्रह नाहीं. अद्यापपर्यंत कोणाचीही नोकरी केली नाहीं इतकेंच. नात्यागोत्याचें कोणीही नाहीं. माझ्याच स्वभावदोषानें आजचा मित्र तो उद्यांचा शत्रु, व आजचा शत्रु तो उद्यांचा मित्र, अशी नेहमीं उलथापालथ होत असते. ह्यामुळें नेमकें व कायमचें असें मित्रमंडळ सांगतां येत नाहीं. तसें म्हटलें तर, माझे सम-कालीन बहुतेक साधु, संत, महंत, शास्त्री, पंडित, नामांकित प्रवचनकार व कीर्तनकार वगैरे सर्वच माझ्या उत्तम परिचयांतले आहेत. बड्या बड्या श्रीमंत गृहस्थ मंडळींशींही माझा बराच परिचय वाढलेला आहे. पण मी भिक्षुक व ते श्रीमंत ही जाणीव मनांत ठेवून मी त्यांच्याशीं वागतों. नाहीं तर द्रोण–द्रुपद संवाद व्हावयाचा, अशी भीति वाटते. धर्माकरितां मी पदवी-त्याग केला म्हणून कोणी माझी महती गाऊं लागले म्हणजे धर्माकरितां प्राण सोडणारे वीर पुरुष माझ्या डोळ्यांसमोर उभे राहून नुसतीच पदवी सोडल्याबद्दल मला लाज वाटूं लागते.

केव्हां केव्हां मिळवांत व प्रसन्न असतें, कृतकृत्यताही वाटते. पण एखादे

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वेळीं तें भयंकर चंचल होतें, तेव्हां असें वाटतें कीं, आपण जन्माला येऊन काय केलें : नीटनेटका प्रपंचही केला नाहीं आणि परमार्थ नाहींच नाहीं.

"संसारीं भ्रमलों बहू भटकलों लोभें सदा वेष्टिलों
पोटार्थी नटलों तुला विसरलों हा! हा! असा फाटलों ॥

असें वाटून मनाला हुरहुर लागते. माझ्या संगतींत असलेले लोक, केव्हां केव्हां मला सोडून जातात, निंदा करतात, अबोला धरतात, पण पुनः येतात, बोलूं लागतात व प्रेमही करतात. हा काय चमत्कार होतो तें कळत नाहीं. तात्पर्य, माझे हे वरील विकार, विचार व व्यवहार नीट लक्ष देऊन जो पाहील त्यास माझ्यांत गुणांचें प्रमाण फार कमी सांपडेल, व दोषच फार दिसून येतील. ते लिहिण्यांत कमी दिसत असले तरी प्रत्यक्ष संगतींत पुष्कळच आढळतील. असें असून देखील माझा होत असलेला मानसन्मान व लोकप्रियता पाहून मला जगन्नाथ पंडितांचा एक श्लोक नेहमीं आठवतो. तो म्हणत असतांना गोपाल-कृष्णाविषयीं मला काय वाटतें, तें लिहितां येत नाहीं. तो श्लोक असा—

वाचा निर्मलया सुधामधुरया यां नाथ शिक्षामदाः ।
तां स्वप्नेऽपि न चिंतयाम्यहमहंभावावृतो निस्त्रपः ॥
इत्यागःशतशालिनं पुनरपि स्वीयेषु मां पश्यतः ।
त्वत्तो नास्ति दयानिधिर्यदुपते मत्तो न मत्तः परः ॥१॥

हे यादवश्रेष्ठा श्रीकृष्णा ! निर्मल आणि अमृतासारखी गोड, अशा (वेद) वाणीनें तूं मला किती तरी उपदेश केलास, पण मोठ्या अहंकारानें निर्लज्ज होऊन त्याचा विचार स्वप्नांत देखील मी केला नाहीं. असे असंख्य अपराध मी केले असूनही, हे नाथा ! तूं मला आपलाच समजत आहेस, हें पाहून मला वाटतें कीं, तुझ्यासारखा दयाळू व माझ्यासारखा उन्मत्त या जगांत दुसरा कोणीही सांपडणार नाहीं. असा या श्लोकाचा अर्थ आहे.

— आणि —

मीही असा आहें

हें आत्मनिरीक्षण वाचूनच माझ्या गुणदोषांची सत्यता पटेल.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

॥ श्रीः ॥

# माझा चित्रपट

## अंक पहिला

## आजोबांचें इतिवृत्त

### ( वडिलांच्या तोंडून ऐकलेल्या माहितीवरून )

माझे आजोबा वे. शा. सं. महादेव वासुदेव बझे हे रत्नागिरी जिल्ह्यांतील कांदळ गांवचे रहिवाशी व धर्माधिकारी होते. ग्रामदेवता रामेश्वर, कुलदेवता श्रीजोगेश्वरी, गोत्र गार्ग्य. ते श्रीमंत मिरजकर यांच्या आश्रयाला पुराण सांगण्याकरितां असावे असें वाटतें. कारण त्रिंबकेश्वरच्या वे. मू. वैसास यांचे वहींत शके १७६१ मध्यें लिहिलेल्या लेखांत "राहणार कांदळ गांव हल्लीं मुक्काम मिरज," असें आजोबांनीं लिहिलेलें आहे. श्रीमंत परशुरामपंत प्रतिनिधि यांच्या धाकट्या पत्नी रमाबाईसाहेब या त्यांच्या पतीशीं न पटल्यामुळें दोनशें रुपये महिना घेऊन सन १८४५ च्या सुमारास काशीवास करण्यास गेल्या. पुढें स. १८६० मध्यें त्या तेथेंच वारल्या. त्यांचे बरोबरच माझे आजोबा आपल्या मातृहीन तीन वर्षांच्या अर्भकाला म्हणजे माझ्या वडिलांना (वासुदेवशास्त्र्यांना) घेऊन काशीस गेले. ते मात्र आपल्या आश्रदात्यांच्या मृत्यूनंतर परत आपल्या गांवीं न जातां मुलासहवर्तमान तेथेंच राहिले.

## त्या वेळची काशीची परिस्थिति

जवळ जवळ ९० वर्षांपूर्वीचा तो काळ. काशींत मुसलमानी सत्ता संपून इंग्रजांच्या सत्तेस प्रारंभ झाला होता. तरीपण गांवची व्यवस्था मुसलमानी पद्धतीप्रमाणेंच होती. प्रत्येक मोहल्ल्यास एकेक फाटक व त्या ठिकाणीं पहारा.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

महल्ल्यांचीं नांवेंही दादुलचौक, नौरंगाबाद वगैरे मुसलमानीच होतीं. खुद्द काशीचें नांवही जुन्या कागदपत्रांतून "मोहम्मदाबाद" असेंच आहे. प्रत्येक महल्ल्याचें फाटक रात्रीं दहाला बंद होऊन सकाळीं ४ ला उघडीत असत. मुसलमानांनीं उध्वस्त केलेलीं विश्वेश्वरादि सर्व देवळें पुन्हां स्थापन करण्यांत आलीं होतीं. दक्षिण व उत्तर हिंदुस्थानांतील सर्व संस्थानिकांनीं घांट, वाडे, मंदिरें बांधून आपापलीं अन्नछत्रें चालविलीं होतीं. शिंद्यांचें अन्नपूर्णासत्र तर येतील तितक्या ब्राह्मणांना मुक्तद्वारच होतें. दुसरें नाटकोटी अन्नसत्र, त्यांत एक दिवस तैलंगांची पाळी व एक दिवस महाराष्ट्रीयांची पाळी अशी व्यवस्था होती. आणि याव्यतिरिक्त प्रत्येक संस्थानिकांच्या वाड्यांतून १०।२० पानांचीं छत्रें अनेक होतीं तीं निराळींच. शिवाय महाराष्ट्रांतून अनेक श्रीमंत, पेन्शनर, जहागिरदार असे गृहस्थ येऊन काशीवास करीत व नित्य पंक्तीस १।२ ब्राह्मण घेऊन जेवीत असत. यात्रा करणारी मंडळी नेहमीं येत व तीही सहस्रभोजन, यज्ञोपवीत, कालाष्टक वगैरे करीत. त्यामुळें काशीकरांना अन्नाची ददात स्वप्नांतही भासत नव्हती. त्यामुळेंच वैदिक, शास्त्री, पंडित आपापल्या विद्येंत निष्णात होऊन तालीमबाजही बनत. विशेष भरणा वैदिक आणि शास्त्र्यांचा. बाहेरून आलेले तेवढेच काय ते गृहस्थ म्हणजे भिक्षुकी न करणारे. याव्यतिरिक्त विद्याभ्यास करण्याकरितां बाहेरून अनेक विद्यार्थी येत व शिकून तयार होऊन जात. स्वामींचीही संख्या बरीच मोठी होती. व त्यांत प्रायः सर्वच विद्वान् व विरक्त असत. त्या वेळेस काशींत दुर्गाघांटीं वासुदेवस्वामी, दशाश्वमेधघांटीं पंडितस्वामी, काकारामपंडित, रामचंद्रशास्त्री सोलापुरकर, जयरामभट्ट भट्ट, गोविंदाचार्य व त्यांचे पुत्र काशीनाथशास्त्री अष्टपुत्रे वैयाकरण, गणेश शास्त्री हर्डीकर नैयायिक, सोनभट भुस्कुटे वैदिक, ( हेच आमचे काशींतील उपाध्याय ) शिंद्यांचे अश्वहृदयज्ञ सरदार बाबासाहेब आपटे, बाळाजीपंत नातु वगैरे विद्वान् व श्रीमंत मंडळी होती. गंगातीरावर संध्याकाळीं संध्येच्या वेळीं नेहमीं शास्त्रचर्चा चालू असे. स्वामींच्या मठांतून नेहमीं प्रस्थानत्रयीचे पाठ

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

चालूच असावयाचे. ‘ क्वीन्स कॉलेज ’ ही संस्कृत शिकण्याची मोठी सरकारी पाठशाळा असून प्राचीन पद्धतीप्रमाणें तेथें संस्कृत शिकविलें जात असे. कांहीं राजेरजवाड्यांनींही आपल्या स्वतंत्र पाठशाळा थापून, शिष्यवृत्त्या ठेवून विद्यार्थ्यांची सोय केली होती. त्यामुळें काशींतील पंडितांची उपजीविकेची उत्तमच सोय झाल्यानें ते सहसा बाहेर जात नसत. याव्यतिरिक्त आपापल्या घरीं सर्वच शास्त्री विद्यार्थी शिकवीत असत. वेदांचें शिक्षण पाठशाळेंत होत नसे. प्राचीन नियमानुसार प्रत्येक गुरुजी आपापल्या घरींच बसून तें देत असत. असा एकही मह्ल्ला नव्हता कीं, जेथें गेलें असतां वेदघोष किंवा शास्त्रचर्चा ऐकूं येणार नाहीं. त्याचप्रमाणें प्रत्येक मंदिरांत पुराण चालू असावयाचें. सर्व महाराष्ट्रीयांची संख्या जवळ जवळ २॥ ते ३ हजारांच्या दरम्यान होती. बहुतकरून सर्वच स्नानसंध्याशील, आचारसंपन्न असे असत. सामान्यतः सर्वच जिनसा स्वस्त असत. सध्याप्रमाणें मराठीचें शिक्षण तेव्हां मुळींच नसून अक्षर ओळख, जास्तींत जास्त पाढे वगैरे शिकून वेदशास्त्राकडेच सर्व लागत. कांहीं कांहीं वैदिक तर वेदाच्या पोथीवरूनच अक्षरओळख करून घेत. तात्पर्य त्यावेळची काशीची स्थिति इतकी सुसंपन्न होती कीं, काशीकरांना बाह्य जगाची ओळख करून घेण्याचें कारणच नव्हतें.

अशी एकंदर काशीची परिस्थिति असल्यानें ती सोडून परत दंडकारण्यांत प्रवेश करण्याची इच्छा माझ्या आजोबांना झाली नाहीं यांत नवल काय ! काशींत देहपात होईपर्यंत बिंदुमाधवाच्या मंदिरांत ते दोन्ही वेळां पुराण सांगत. पुराणांत मध्यंतरीं मोरोपंती आर्यांचा उपयोग करण्याचा त्यांना बराच नाद असे. अशा ब्राह्मणवृत्तीनें ते रहात असत. त्यांच्या बरोबरच आलेली एक लांबच्या नात्यांतील बहीण त्यांच्याजवळ असे. ती त्यांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था ठेवीत असे. बिंदुमाधवघांटावर त्यांनीं एका गंगेच्या मूर्तीची स्थापना केली; व प्रतिवर्षी गंगादशहरोत्सव ते मोठ्या थाटानें साजरा करीत. अशा रीतीनें कालक्रमणा करून काशींतच त्यांनीं देह ठेवला.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## वडिलांचें इतिवृत्त

आजोबा वारले त्या वेळेस माझ्या वडिलांचें वय फक्त १३ वर्षांचें होतें. हें वय म्हणजे केवळ विद्याभ्यासाचें; परंतु याच वेळीं वडील निवर्तलेले, पैसा मुळींच नाहीं, काशीसारखें ख्यालीखुशालीचें शहर, त्यामुळें विद्याभ्यास होणें तर दुरापास्तच झालें. फक्त वार लावून जेवावें, व गांवभर हिंडावें; कारण विचारपूस करणारें डोक्यावर कोणीच नव्हतें. परंतु अशा स्थितींतही त्यांनी एक नियम मात्र उत्तम रीतीनें पाळला. तो हा कीं, सकाळीं सूर्योदयाबरोबर वडिलांच्या जागीं बसून येईल तसें पुराण सांगणें. येईल तसें याचा अर्थ असा कीं, गोष्ट गोवर्धनाची तर श्लोक वाचावयाचा पूतनामोक्षाचा. अशी श्लोक आणि अर्थ यांची विसंगति असली तरी गोष्ट मात्र सुसंगत व सरस सांगत. त्यामुळें स्त्रीश्रोतृसमाज मात्र कौतुक म्हणून साधारणपणें टिकून होता. म्हणूनच श्लोकाचा अर्थ नीट सांगावा इकडे दुर्लक्ष होऊन विद्याभ्यासाकडे मन वळलें नाहीं. एके दिवशीं त्यांच्या एका मित्रानें भर पुराणांत त्यांच्या या श्लोकार्थविसंगतीमुळें त्यांना हटकलें. हें अपमानाचें शल्य सहन न होऊन त्यांचें मन अभ्यासाकडे वळलें. तेव्हांपासून कोणाच्या तरी जवळ जाऊन बरोबर अर्थ समजावून घेऊन व्यवस्थित पुराण सांगूं लागले. उत्तरोत्तर पुराण रंगत गेलें. त्यामुळें साधारण द्रव्यप्राप्तीही होत गेली व हळूहळू वागणूकही व्यवस्थित झाली. पुढें वे. मू. केशवभट गोखले यांच्या बहिणीशीं त्यांचा विवाह झाला. स्वतःच्या घरीं कोणीच नसल्यानें सासुरवाडींच मिळेल तें देऊन राहूं लागले. पुढें पुढें मिळकत बरीच होऊं लागली. पण स्वतंत्र राहणें नसल्यामुळें मिळकत पुरी पडेना आणि शिल्लकही कांहीं राहीना. उलट सासुरवाडच्या लोकांचा वरचष्माच राही. ही परिस्थिति त्यांच्या वडिलांचे मित्र व चहाते यांना बरी वाटेना. त्यांपैकीं एक बापूजी चापेकर, हे जातीनें रंगारी असले तरी कपड्याचे व्यापारी, साधारण श्रीमंत व सच्छील होते आणि माझ्या आजोबांचे चाहातेही होते. त्यांनीं वडिलांना स्वतंत्र राहण्याची सल्ला देऊन त्यांची सर्व व्यवस्था स्वतः

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पाहण्याचें पत्करलें. त्याप्रमाणें वडिलांनींही त्यांच्यावर विश्वास ठेवून स्वतंत्र संसार थाटला. या व्यवस्थेमुळें वडिलांना वेळ मिळूं लागला. वे. शा. सं. नारायणशास्त्री तारे यांचेजवळ सतत ६ वर्षें परान्न सोडून भागवताचें अध्ययन केलें व त्यांत ते निष्णात झाले. बापूजी पुराणांत मिळणारीं धान्यें, फळें वगैरे मिळकत स्वतः ठेवून घेत आणि दोघांच्या पोटापुरती शिधासामुग्री रोज पोंचती करीत व शिल्लक राहिलेल्या जिनसांची बाजारभावानें किंमत लावून ते सर्व जिन्नस स्वतःच विकत घेत. याप्रमाणें पैसा सांठवीत हळूहळू एकेक सोन्याचा जिन्नस, त्यांनीं तयार करवून माझ्या आईच्या अंगावर घातला. त्यामुळें मध्यमवर्गीतल्या गृहस्थाची स्थिति वडिलांना प्राप्त झाली. पुढें एक मुलगी झाली. पण नंतर थोड्याच काळांत ती मुलगी आणि ती बायकोही पण वारली. आणि हा प्रेमळ परोपकारी बापूजी रंगारीही कैलासवासी झाला. नांवलौकिक व सुस्थिति असल्यामुळें दुसऱ्या लग्नास विलंब लागला नाहीं. पेशव्यांबरोबर आलेलें एक अत्यंत गरीब कुटुंब काशींत होतें. त्यांचें नांव गोपाळभट कोल्हटकर. बायकोचें नांव भागीरथीबाई. त्यांना माधव, नारायण व केशव असे तीन मुलगे व यमू मुलगी; तिच्याशीं वडिलांचा द्वितीय विवाह झाला. हीच माझी आई लक्ष्मीबाई. ती स्वरूपानें साधारणच असली तरी शरीरानें सुदृढ व संसारदक्ष असे. त्यामुळें वडिलांचा हा दुसरा संसार उत्तमच थाटला. आईचा स्वभाव थोडा तापट असला तरी वडिलांचा स्वभाव अत्यंत शांत, सहनशील व संतोषप्रिय असल्यानें संसार उत्तम रीतीनें झाला. पुढें सन १८७९ मध्यें पहिला मुलगा झाला. त्याचें नांव रामकृष्ण. त्यानंतर चार वर्षांनीं एक मुलगी दुर्गाताई, नंतर दुसरी मुलगी काशीताई व तिच्यानंतर एक वर्षानें माझा जन्म झाला. माझ्यानंतर बरींच मुलें व मुली झाल्या पण तीं सर्व बाल्यावस्थेंतच गेलीं ! आम्ही दोघे भाऊ व दोन बहिणी एवढींच वडिलांच्या हयातींत शिल्लक राहिलों. या काळांत वडिलांचा नांवलौकिक व साधारण सांपत्तिक उत्कर्ष होऊन आमचें कुटुंब काशींतील प्रतिष्ठित नागरिकांपैकीं एक झालें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

माझे वडील वर्णानें गौर, बांधा उंच व मजबूत, रूपानें साधारण सुंदरांपैकींच होते. वयाच्या चाळिसाव्या वर्षांपासून त्यांना दम्याची व्यथा जडल्यामुळें त्यांची प्रकृति खालावली. ते स्वभावानें प्रेमळ व सरळ होते. काशी आणि गंगा यांच्यावर त्यांची अढळ श्रद्धा असे. त्यामुळें देहपात होईपर्यंत गंगास्नानाशिवाय त्यांचा दिवस गेला नाहीं. आजोबांच्या वेळेस बिंदुमाधव संस्थानांत देवासमोर असलेलें पुराण कांहीं कारणामुळें बंद पडलें तें तेथेंच असलेल्या पिंपळाखालील मारुतीसमोर औंधकरांच्या जागेंतच सांगण्यास त्यांनीं प्रारंभ केला. तेथेंही त्या वेळचे संस्थानचे मॅनेजर श्री.गोपाळराव आपटे यांनीं बराच त्रास दिला. ही गोष्ट श्रीमंतांच्या कानांवर घालण्याकरितां म्हणून स्वतः वडील औंधास गेले; पण त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. या निमित्तानेंच पंढरपूर, कोल्हापूर वगैरे ठिकाणचीं दर्शनें त्याना घेतां आली. एवढाच काय तो त्यांना काशी सोडण्याचा प्रसंग. तरी पण आपल्या वडिलांची गादी समजून चिकाटीनें त्याच जागेंत अनेक हालअपेष्टा सोसून त्यांनीं पुराणाचा क्रम चालूच ठेवला. तो अद्यापही तसाच चालू आहे.

त्यांच्या आयुष्यांतील नित्यक्रम असा. पहाटे दोन वाजतां उठून गंगास्नानाला जात. स्नान करून येतांना गंगाष्टक म्हणत. त्यांतील श्लोकाचा तोच चरण रस्त्यावरील त्याच घराच्या जवळ रोज नेमका यावयाचा. त्यामुळें प्रत्येक जण किती वाजले याचा नेमका अंदाज त्यावरूनच करीत असे. हें सांगण्याचें विशेष कारण असें कीं, त्या वेळेस त्यांच्याजवळ घड्याळ नसून हा सर्व त्यांचा रेखीव कार्यक्रम फक्त नक्षत्रांच्या आधारें चालत असे. घरीं आल्यावर संध्या, देवपूजा व बारा अध्याय भागवत वाचून, सूर्योदयाबरोबर पुराण सांगण्यास जात आणि बरोबर एक तास पुराण सांगत. पुराण सांगण्याची त्यांची पद्धति प्राचीन चालीची होती. कंठ अत्यंत मधुर असल्यामुळें वक्तृत्व फारच मधुर वाटत असे. पद्धति प्राचीनच असली तरी 'जेहेत्ते नैमिषारण्याचे ठायीं" वगैरे कोणतेही दोष नसून श्लोकांचा सरळ अर्थ रसपुष्ट करून सांगत. त्यामुळें त्यांच्या समकालीन सर्व पुराणिकांमध्यें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्यांचीच प्रसिद्धि जास्त होती. त्यांच्या पुराणाला जमत इतके श्रोतेही कोठेंच जमत नसत. त्यावेळीं समकालीन पुराणिकांमध्यें श्री. बाळशास्त्री दातार, श्री. भाऊशास्त्री डोकमारे हे दोघे प्रसिद्ध वेदान्ती पुराणिक होते. शिवाय श्री. रटाटेशास्त्रीही सरस पुराणिकांपैकीं एक होते. पुराण सांगून घरीं आल्यावर काळभैरवाच्या दर्शनास वडील नियमानें जात. पुढें १० वाजतां वैश्वदेव व जेवण करून ११ ते २ पर्यंत झोंपत. नंतर ५ वाजेपर्यंत काव्य, कोष, भागवत वगैरे विद्यार्थ्यांना शिकवून मग दुसऱ्या दिवशींच्या देवपूजेकरितां फुलें आणण्यासाठीं बागेंत जात. तेथून आल्यावर संध्या व फराळ करून झोंपत. असा हा त्यांचा रेखीव कार्यक्रम सतत ५० वर्षें चालला. पुढें पुढें दम्यानें शरीर फारच थकल्यामुळें फुलें आणण्याकरितां बागेंत जाणें बंद झालें व पुराण वडील मुलाच्या स्वाधीन केलें. बाकी सर्व कार्यक्रम मात्र देहपातापर्यंत तसाच चालू होता. पुराणाव्यतिरिक्त इतर प्रतिग्रह केला नाहीं, परान्न घेतलें नाहीं, कधीं एका दिडकीचेंही कर्ज केलें नाहीं, श्राद्ध भोजन तर नाहींच नाहीं. कधीं कुणासही तोडून बोलले नाहींत. पुराण व अध्यापन याखेरीज तिसरा व्यवसाय नाहीं. काशीखंडांत लिहिलेल्या काशींतील सर्व पंचक्रोश्यादि यात्रा अनेक वेळां स्वतः केल्या व लोकांकडून करविल्या. अनेक लुप्तप्राय झालेल्या देवस्थानांचा ग्रंथप्रमाणें शोध लावला. वडिलांनीं स्थापन केलेल्या गंगेचा उत्सव जन्मभर मोठ्या थाटानें साजरा केला. अनेक व्रतें आचरिलीं. अशा रीतीनें आपल्या देखत १५ वर्षेंपर्यंत मुलाच्या स्वाधीन संसार करून घरांत अतिथीप्रमाणें राहिले. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे—

अकृत्वा परसंतापं अगत्वा खलमंदिरम् ॥
अक्लेशयित्वा चात्मानं यदल्पमपि तद्बहु ॥

अशा ब्राह्मणवृत्तीनें राहून माघ वद्य त्रयोदशीच्या दिवशीं आजारी पडून शिवरात्रीच्या दिवशीं रात्रीं ९२ वाजतां त्यांनीं देह ठेवला. [सन १९१४ इ.]

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# माझी कर्मकथा

न ध्यातं पदमीश्वरस्य विधिवत् संसारविच्छित्तये ।
स्वर्गद्वारकपाटपाटनपटुर्धर्मोपि नोपार्जितः ॥
नारीपीनपयोधरोरुयुगुलं स्वप्नेपि नालिंगितम् ।
मातुः केवलमेव यौवनवनच्छेदे कुठारा वयम् ॥

माझा जन्म शके १८१०, भाद्र. शु. १३ स. १८–९–१८८८ रोजीं बिंदुमाधवघाटीं देवराव काका यांचे वाड्यांत झाला. दुसरे दिवशींच अनंत चतुर्दशी असल्यानें माझें नांव अनंत असें ठेविलें. वयाच्या ५–६ वर्षांपर्यंतची अवस्था, शुद्ध अज्ञानमय असल्यानें त्या वेळेस मी सुखी होतों कीं दुःखी होतों हें कांहींच मला सांगतां येणें शक्य नाहीं. आई सांगत असे कीं, तूं शरीरानें गोंडस, डोक्यावर घनदाट काळें कुळकुळीत जावळ, वर्णानें गोरा व अतिशय खेळणारा होतास. पाध्ये नांवाचे एक वृद्ध गृहस्थ एकटेच माझ्या वडिलांच्या आश्रयाला असत. त्यांचेच अंगाखांद्यावर मी वाढलों. त्यांनाच मी आई म्हणत होतों. मला कोणी–आईसुद्धां–रागें भरलें तर त्यांना खपत नसे. त्यांची अंधुक कल्पना अजूनही मला आहे. नाना गंगाजळी नांवाचे एक काशींतीलच गृहस्थ होते. त्यांचें कपड्याचें साधारण दुकान असून लहान मुलांची शाळाही त्यांनीं घातली होती. महाराष्ट्रीय मुलांना अक्षरओळख, बाराखड्या, मिळवण्या, बेरीज, वजाबाकी, गुणाकार, भागाकार, इतकेंच ते शिकवीत. दुसरी शाळा आंग्रे याचे वाड्यांत होती. त्या वेळेस काशींत महाराष्ट्रीयांना एवढेंच प्राथमिक शिक्षण मिळत असे. नाना गंगाजळी हे गृहस्थ फारच ममताळू असत. त्यामुळें लहान लहान मुलें मोठ्या प्रेमानें त्यांचेजवळ बसून शिकत. वयाच्या ६ व्या वर्षी त्यांचेकडे मला शिकण्यास पाठविलें. आठव्या वर्षीं माझी मुंज झाली. नंतर वे. मू. काशीनाथ भट गोडबोले यांचेकडे रुद्र व वे.मू. हरभट पंचनदीकर यांचेकडे पवमान, अष्टाध्यायी यांचें अध्ययन झालें. पुढें घरींच वडिलांनीं दुसऱ्या सर्गा-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पासून सहाव्या सर्गापर्यंत रघुवंश शिकविला. पुराण सांगण्याची वृत्ति घरचीच असल्यामुळें १० व्या वर्षांपासूनच घरीं वडिलांपासून तालीम घेऊन केव्हां केव्हां कौतुक म्हणून मी पुराण सांगूं लागलों. दिवसेंदिवस वडिलांची प्रकृति श्वासानें फार आजारी होऊं लागली त्यामुळें शिक्षण घरीं होईना. म्हणून वडिलांचे एक स्नेही वासुदेवशास्त्री जोशी यांचेकडे त्यांनीं मला शिकण्यास पाठविलें. त्यांची संस्कृत प्राथमिक शिक्षणाची शाळा असे. पंचकाव्यें व कौमुदी इतकेंच शिक्षण तेथें मिळत असे. तेथें पुस्तक घेऊन जात होतों पण सर्व काळ खेळण्यांतच जाई. काव्यांची थोडी आवड होती म्हणून थोडीबहुत व्युत्पत्ति झाली असें भासत असे. पण व्याकरणाचा मनापासूनच कंटाळा असल्यानें कौमुदी पंचसंधीपर्यंत जेमतेम शिकलों पण तीही येत नव्हतीच. म्हणून त्या वेळेपासून व्याकरणाचें पुस्तक सीलबंद करून जें ठेविलें तें अद्यापिही तसेंच आहे. या काळांत वडिलांचे नांवावर, व अल्पवयांत थोडेंसें पुराण सांगतां येत असल्यानें मिळणाऱ्या मानावर विसंबून, विद्या नसतांनाही स्वतःला विद्वान् समजून ऐटीनें वागूं लागलों. पण ईश्वरकृपेनें एक दिवस असा आला कीं, त्याची आठवण येतांच अजूनही लाज वाटते. त्या प्रसंगामुळेंच डोळ्यांत झणझणीत अंजन पडून "मूर्खोऽस्मीति ज्वर इव मदो मे व्यपगतः," अशी स्थिति झाली व पुढील मार्ग व स्वतःचें स्वरूप कांहींसें दिसूं लागलें.

तो प्रसंग असा. एका नागर ब्राह्मणाच्या घरीं श्रावणमासीं रात्रीं लक्ष्मीची पोथी सांगण्याकरितां, मी चांगला पुराणिक म्हणून, मला मुद्दाम बोलाविलें. मीही तें आमंत्रण मोठ्या ऐटीनें स्वीकारून, घरीं कथेचें पूर्वावलोकन करण्यास वडील सांगत असतांही, तें न करतांच पोथी सांगण्यास गेलों. पोथी उघडून श्लोक वाचण्यास आरंभ केला. चार श्लोक झाले, आठ श्लोक वाचले तरी पण एकाचाही अर्थ लागेना. तेव्हां स्वस्थ बसलों. इतक्यांत त्या बाईच्या नवऱ्यानें मोठ्या रागानें समोर येऊन 'चल, ऊठ, चालता हो, मूर्ख कुठला, पुराण सांगायला आला आहे. घे एक पैसा," अशी पुष्पांजली मला बहाल केली. झालें ! मग काय विचारतां ! ऐटीचा विषमज्वर खाडकन

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

उतरलाच. डोळ्यांतून शैत्य वाहूं लागलें आणि थंडगार पडलों. पैसा न घेतांच घरीं आलों तो निजूनच राहिलों. वडिलांसमोर जाण्याची लाज वाटे. ही मुलाची बहादुरी आईच्यामार्फत वडिलांचे कानांवर गेली. पण ते रागें न भरतां इतकेंच म्हणाले कीं, "पुढें सावध रहा." या इतक्या अपमानानेंही मी पूर्ण सावध झालों असें मात्र नाहीं. उलट 'ही पुराणीकपणाची भिक्षुक वृत्ति न करतां आपण इंग्रजी शिकून गृहस्थ व्हावें व नोकरी करून सभ्य गृहस्थ बनावें', असें वाटूं लागलें व तिकडे वळलों. त्या वेळीं माझें वय सुमारें १४-१५ चें असावें.

## मी इंग्रजी शिक्षणाकडे कसा वळलों !
## त्या वेळची काशीची परिस्थिति.

वडिलांच्या वेळची काशीवरील मोंगली छटा जाऊन आंग्लसंस्कृतीचा उषःकाल झाला होता. अर्थात् हा विचार महाराष्ट्रीय समाजापुरताच आहे. या वेळेस पूर्वींप्रमाणें काशींतील फाटकबंदी पूर्ण नाहींशी झाली होती. फाटक सर्रास मोकळें असून पहारे उठले होते. म्युनिसिपालिटीचा कारभार चालू होता. बालाजी अन्नसत्र पूर्वींप्रमाणेंच चालू होतें, पण बाकीचीं संस्थानिकांचीं व खासगी अन्नसत्रें संपुष्टांत आलीं होतीं. धान्य वगैरेची महर्घता डोकावूं लागली होती. वेदशाळा व खासगी शास्त्रशाळाही कमी कमी होऊं लागल्या होत्या. वडिलांच्या वेळेला असलेले बाळशास्त्री रानडे यांचें पंडितांमधील सार्वभौमत्व त्यांच्या निधनानें त्यांच्या शिष्यांमध्यें विभागलें गेलें होतें. त्यांचे अनेक शिष्य झाले, पण विशेष प्रसिद्धीला आलेले म. म. गंगाधरशास्त्री तेलंग C. I.E., म. म. दामोदरशास्त्री भारदे, म. म. तात्याशास्त्री पटवर्धन, म. म. शिवकुमार पंडित हे होत. आणखीही बरेच विद्वान् शिष्य होते. या सर्वांचे निरनिराळे गट पडून कांहीं तरी निमित्तानें ग्रामण्यें होऊन आपसांत चुरस पडूं लागली. त्यांपैकींच एकोद्दिष्ट ग्रामण्य झालें. तें १२ वर्षें सतत चाललें, आणि हीच संधि साधून महाराष्ट्र पंडित व गौड पंडित

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

असा भेद उत्पन्न होऊन पंडितांमधील एकजूट नाहींशी झाली. मोठमोठे सर्वच पंडित 'क्वीन्स कॉलेज ( सरकारी संस्कृत पाठशाळा ) मध्यें व्हेनिस साहेबांच्या हाताखालीं सर्कशींतील वाघाप्रमाणें वागत असत. व्हेनिससाहेब मात्र त्यांची योग्यता ओळखून त्यांना मानानेंच वागवीत. तात्पर्य, या वेळे-पासून पूर्वीं असलेल्या सर्व बाबींतील महाराष्ट्रीयांच्या वर्चस्वाला ओहोटी लागली असें म्हणण्यास हरकत नाहीं.

स्वामींचीही संख्या हळू हळू कमी होत होती. विरक्त व विद्वान् संन्यासी फारच थोडे राहून, फुकट जेवण व मान मिळतो म्हणून, कोणी वारस नाहीं म्हणून, कांहीं मुलाच्या किंवा बायकोच्या रागावरून झालेल्या संन्या-शांची संख्या वाढूं लागली. विद्वान् व विरक्त संन्यासीही होते. बिंदुमाधव घांटावर स्वयंप्रकाशस्वामी हे विरक्त व विद्वान् असून जवळ जवळ ४० वर्षे संन्यासाश्रमांत राहून देहपातापर्यंत प्रस्थानत्रयीचा पाठ सांगत असत. त्याच घांटावर अद्वैताश्रमस्वामी रहात. ते अक्कलकोट स्वामींचे शिष्य असून 'तच्चिंतनं तत्कथनं अन्योन्यं तत्प्रबोधनं' या श्लोकाप्रमाणें त्यांची दिनचर्या असे. भौमानंदस्वामी त्याच घांटावर रहात. ते पूर्वाश्रमींचे उत्तम वैदिक असून दत्तभक्त होते. रात्रीं बारा वाजतां उठून गंगेचें स्नान करून तेथेंच बसून ४ वाजेपर्यंत वेदपाठ करून मठांत जात ते दोन-प्रहरीं फक्त मधुकरीकरितां बाहेर पडत. नंतर पुनः कोणाच्याही दृष्टीला ते पडत नसत. ते कडकडीत विरक्त होते. कृष्णानंदस्वामी हे दुर्गाघांटीं स्वतः बांध-लेल्या देवीच्या देवळांत रहात असत. स्वामी सर्व शास्त्रांत निष्णात असून आपल्या युक्तिवादानें प्रतिपक्षास हां हां म्हणतां निरुत्तर करीत. लो. टिळक काशींत आले त्या वेळेस टिळकांनीं मुद्दाम त्यांची भेट घेतली. स्वामी शाक्त-मार्गी असल्यानें त्यांचा उपयोग लोकांना व्हावा तितका झाला नाहीं. हनु-मानघांटीं दक्षिणामूर्तिस्वामी रहात. ते फार विद्वान् होते. पुण्याचे श्री. विनायकबुवा साखरे त्यांचेकडेच शिकत असत. दुर्गाघांटीं तारक मठांत शांता-श्रमस्वामी असत. ते संस्कृतज्ञ नसले तरी फारच विरक्त, भक्त, तत्त्वज्ञ व

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

आचारसंपन्न होते. ते नेहमीं भागवताचे सप्ताह करीत. रात्रीचे वेळीं ज्ञानेश्वरी वगैरे सांगत. तें ऐकण्यास म. म. नित्यानंद पंडित, गु. लक्ष्मणशास्त्री द्रविड वगैरे मंडळी जात असत. त्यांच्या सहवासानेंच मला वेदांताची गोडी लागली. स्वामी नाशिकच्या रघुनाथ भटजींच्या शिष्यपरंपरेंतील होते. याव्यतिरिक्त गोकर्णस्वामी, वक्रतुंडस्वामी, पूर्णाश्रमस्वामी वगैरे बरेच विद्वान् व विरक्त संन्यासी होते. सर्वच ठिकाणीं वेदांतचर्चा होत असे. पण या वेळेस या सर्वांची स्थिति अस्ताचलाला जाणाऱ्या सूर्याप्रमाणें झाली होती.

त्या वेळेस व्हिक्टोरिया राणीचें राज्य होतें. तिच्याबद्दल लोकांत आदरच होता. वडिलांच्या वेळेस तर अशी समजूत होती कीं, लंकेंत सीतेनें वरप्रदान दिलेली त्रिजटा राक्षसी व्हिक्टोरिया राणी होऊन राज्य करीत आहे व सर्व वानर सीतेच्या वरप्रदानानें साहेब झाले आहेत. याचें कारण असें कीं, दोघांचींही तोंडें लाल आहेत. साधारण पोस्टमनला देखील लोक वचकत असत. कांहीं इनाम घेतल्याशिवाय पोस्टमन तार, मनिऑर्डर देत नसे. आणिक तर काय पण साधें पाकीट आलें तरी दोन पैसे घेतल्याशिवाय देत नसे. मग शिपाई किंवा साहेब यांचा केवढा दरारा असेल याची कल्पनाच करावी. ही स्थिति या वेळेस नव्हती. तरी पण मनिऑर्डर किंवा तारेला पैसे द्यावे लागत. तार बहुधा यायचीच नाहीं. पण कदाचित् आली तर ती वाचण्यास बरेंच भटकावें लागे. एकदां माझ्या बहिणीच्या यजमानांची तार रांचीहून आली. ती तार हातीं पडतांच प्रथम थोडी रडारडी झाली. ती वाचण्यास कोणी मिळेना. माझे मामा थोडे इंग्रजी शिकलेले होते, ते बाहेरून आल्यावर त्यांनीं ती वाचली. 'मी सुखरूप पोंहोचलों ', असा त्यांत मजकूर होता. तार ही मरणाची यावयाची अशी लोकांची ठाम समजूत होती. ज्या इसमाची फौजदार किंवा साधा शिपाई याच्याशीं ओळख असे त्याला देखील लोक भीत. प्रवासी युरोपियन्स शहर पाहण्यास येत, त्या वेळेस त्यांचे-कडे पाहण्याचें देखील भय वाटे. ' तो साहेब आहे ', असें एखाद्या मुलानें बोटानें दाखविलें तर दुसरा मुलगा म्हणे कीं, ' बोट दाखवू नको. साहेब

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

बोट कापून घेईल,' अशी स्थिति होती. महाराष्ट्रीय नाटक कंपनी एकही येत नसे. पारशी नाटक कंपन्या मात्र येत असत. आम्ही महाराष्ट्रीय नाटक पाहण्याची तहान उत्सवाचे शेवटीं होणाऱ्या ललितावरच भागवीत होतों. नाहीं म्हणावयाला माझ्या लहानपणीं एक स्थानिक नाटक मंडळी होती. तिचीं नाटकें पाहिल्याची अंधुक आठवण आहे. हीं नाटकें ब्रह्माघांटीं नारायण दीक्षित पाटणकर यांच्या वाड्यांतील प्रशस्त चौकांत होत असत. या मंडळींनीं दिवसा आचाऱ्यांचें काम करावें, प्रेतें उचलावीं व रात्रीं नाटक करावें. या कंपनीला कांहीं विनोदी लोक "झोळी प्रसाद कंपनी," असें म्हणत. त्यांचें सामान म्हणजे चादरींचे पडदे, कोणाच्या तरी घरचीं लुगडीं, धोतरें, साधारण दागिने, भस्म, कुंकू वगैरे सामान आणलेलें असावयाचें. ज्यांचें सामान असेल त्यांना तिकिट माफ. मध्येंच सोंड गळून पडण्याच्या भीतीनें दुसऱ्यानें उचलून धरलेल्या सोंडेचा गणपति, पोटाला मोराचीं पिसें बांधून नाचत येणारी सरस्वती, लिंबाचा डहाळा डोक्याला बांधून नाचत येणारा विदूषक, हरदासबुवासारखा टाळ वाजवीत उभे राहून पदें म्हणणारा सूत्रधार हीं पात्रें प्रत्येक नाटकांत अढळ असावयाचींच. ही कंपनी आपसांतील भांडणानें पुढें लवकरच मोडली. त्यानंतर पुष्कळच वर्षांनीं प्रथम नाट्यकला प्रवर्तक मंडळी काशींत आली. तेव्हां आम्हाला महाराष्ट्रीय नाटक पाहण्यास मिळालें. या मंडळीला काशींत पैसे मिळण्याऐवजीं बाहेरगांवीं मिळविलेलाच पैसा तेथें खर्च करावा लागला. कंपनीचे त्या वेळचे मालक गोपाळराव, माधवराव वगैरे थोर मनाचे व संभावित वृत्तीचे गृहस्थ होते. त्यांनीं मोठ्या प्रेमानें चार महिने काशींत राहून यात्रा, ब्राह्मणभोजनें वगैरे सर्व विधि केले. काशीकरांना नाटकेंही बरींच फुकट दाखविलीं. एका हिंदुस्थानी श्रीमंताकडून एक उत्तम पक्कें नाटकगृह "विश्वेश्वर थिएटर," नांवाचें बांधविलें. त्यापूर्वीं काशींत एकही पक्कें नाटकगृह नव्हतें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## काशींत आंग्लसंस्कृतीचा उषःकाल

अनेक संस्थानिकांनीं आपापले मोठमोठे वाडे काशींत बांधले. विजयानगरच्या राजाचीही तेथें बरीच मोठी स्थावर संपत्ति आहे. तिचे व्यवस्थापक एक हरिपंत करमरकर नांवाचे गृहस्थ होते. माणूस संपन्न, पण त्यांना मुलगा नव्हता. त्यांनीं माझ्या मामाला म्हणजे गोपाळभट कोल्हटकर यांच्या वडील मुलाला दत्तक घेतलें. त्यांचें त्या घरचें नांव माधव हरि करमरकर असें होतें. हरीपंतांनीं मुलाला इंग्रजीचें मॅट्रिकपर्यंत शिक्षण दिलें. त्या वेळेस इतकें शिक्षण घेतलेला महाराष्ट्रीय मनुष्य काशींत मोठाच विद्वान समजला जात असे. पुढें हरिपंत वारले. मुलगा लहान असल्यामुळें आप्तांनीं संपत्तीची लुटालूट केली. त्यामुळें फारच थोडी संपत्ति घेऊन मुलगा आपल्या पूर्वीच्या गोतावळ्यांत येऊन मिळाला. त्याचे दोघे बंधु नारायणराव व केशवराव आणि तो असे तिघेही एका ठिकाणीं राहूं लागले. त्यांचें पहिलें कुटुंब वारल्यावर त्यांचा दुसरा विवाह पुण्यांतील बारा ज्योतिर्लिंगाच्या देवळांतील काळे यांच्या मुलीशीं झाला. इतकें सांगण्याचें कारण असें कीं, काशींतील नवीन पिढींत माधवरावांच्या इतका इंग्रजी शिकलेला व पुण्याचा संबंध झाल्यामुळे तिकें-डील चळवळीचा माहितगार दुसरा कोणी नव्हता. काशींत पं. मालवीय, रामनारायण मिश्र, वगैरे हिंदुस्थानी विद्वान् मंडळीं ह्यांशीं त्यांचा बराच स्नेह होता. साधारण श्रीमंत व सुशिक्षित म्हणून कलेक्टरपासून पोलिसपर्यंत त्यांचा स्नेह व वजन होतें. ते टिळकांचे भक्त होते. त्यामुळें माधवराव करमरकर यांचें काशींतलि महाराष्ट्र समाजावर बरेंच वजन होतें. महाराष्ट्रांतून श्री. कृष्णाजी आबाजी गुरुजी हे काशींत येऊन त्यांनीं कालिदास नांवाचें पत्र काढलें. त्या पत्राला ह्यांचें बरच साहाय्य होते. तें पत्र राष्ट्रीय असल्यानें, आणि त्या वेळेस टिळकअनुयायांवर सरकारची कडक नजर असल्यान त्यांत एकदां प्रसिद्ध झालेल्या ' काळे व गोरे,' या लेखाचें निमित्त करून मुंबई सरकारनें अलाहाबाद सरकारकरवीं गुरुजींवर खटला भरविला व

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

६००० रु. ची जबर जामीनकी मागितली. पण त्या वेळेस सरकारच्या भीतीनें ती जामीनकी भरावयास कोणीही तयार होईना. तेव्हां श्री. माधवरावांनीं ती रक्कम भरून त्यांची सुटका केली. तो खटला चालविण्यास लो. टिळकांनीं श्री. दादासाहेब करंदीकरांना पाठविलें होतें. तेव्हांपासून काशींत माधवरावांचें वजन फारच वाढलें. काशींतल्या महाराष्ट्र समाजांतील नवीन चळवळीचे सुत्रधार तेच होते. त्यांनीं महाराष्ट्र स्कूलबोर्ड स्थापन करून त्याचेमार्फत एक 'महाराष्ट्र स्कूल,' म्हणून इंग्रजी शिकविण्याची शाळा काढली. त्यांचे त्या वेळचे सहकारी श्री. काशीनाथराव भागवत, बाबूशास्त्री मेहंदळे, राजाभाऊ टोकेकर, तात्यासाहेब थत्ते, रामराव गंगाजळी वगैरे अल्प शिकलेले लोक होते. शाळा कांहीं दिवस बरी चालली. मुलेंही पुष्कळ येऊं लागलीं. मॅट्रिकचा वर्ग उघडला व त्याला योग्य हेडमास्तर हवा म्हणून बेळगांवचे बाजीराव बाळकृष्ण भाटे यांना बोलावून त्यांना हेडमास्तर केलें. पुढें तेथें भाटे मास्तरांचें न पटल्यामुळें त्यांनीं शाळा सोडली व कांहीं दिवसांनीं ती शाळाही बुडाली. अण्णासाहेब नेने यांनींही पुण्याच्या धर्तीवर एक मराठी शाळा काढली. ती अद्यापि 'महाराष्ट्र विद्यालय,' या नांवानें चालू आहे.

पुण्याच्या धर्तीवर श्री. आंग्रे यांच्या वाड्यांत गणेशोत्सव सुरू झाला. सभा होऊं लागल्या. पहिल्या सभेला काशीकरांची बरीच गर्दी झाली. पण या सभेंत दक्षिणा नसून नुसतींच व्याख्यानें होतात म्हणून लोक येईनात. उलट या नवीन पद्धतीची टवाळीच होऊं लागली. सावळेरामबुवा सरनाईक हे पुण्याकडून येऊन त्यांनीं काशींत ब्रह्माघाटीं शिवगोविंदधाम नांवाचें एक रामाच देऊळ बांधून तेथें वाचनालय ठेविलें. याच देवळांत मी लहानपणीं पुष्कळ दिवस पुराण सांगत असें. त्या वेळेस लो. टिळक तेथेंच उतरले होते. त्यांनीं पुराण ऐकून मला दिलेली शाबासकी अजून आठवते. तेथें महाराष्ट्रीय वर्तमानपत्रें येऊं लागलीं. त्यामुळें काशीकरांना महाराष्ट्रांतील बातमी कळूं लागली. महाराष्ट्रांतील बडे बडे लोक लो. टिळक, दा. खापर्डे,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

रा. करंदीकर वगैरे तेथेंच उतरूं लागले. काशींत कॉंग्रेस झाल्यामुळें बरेच महाराष्ट्रीय लोक त्या वेळेस आले व त्यांचीं राजकीय व्याख्यानें झालीं. त्यामुळें काशींतही हलु हळू चळवळीचे व सुधारणेचे वारे वाहूं लागले. मुलें इंग्रजी शिकूं लागलीं व त्यामुळें होणारे परिणाम भासूं लागले. एकदां आम्ही प्रथमच शिवाजी उत्सव केला. त्यामध्यें आपाशास्त्री साठे, केळकर मास्तर, गोविंदशास्त्री दुगवेकर वगैरे सर्वच होते. शिवाजीची भली थोरली एक मातीची मूर्ति केली ` `. मांडव घातला होता. उत्सवास आरंभ होणार तोंच पोलिसांनीं येऊन उत्सव उधळून लावला. त्या वेळेस टिळकांच्या फोटोवरही पोलिसांची वक्रदृष्टि होती. अशी आंग्लसंस्कृतीची प्रभा काशींत फांकूं लागली. तिचे आद्य जनक माधवराव करमरकर हे माझे मामा असल्यानें ते नेहमीं बाबांना थट्टेनें म्हणत कीं, एक मुलगा पुराणीक केला पण भाऊला मात्र इंग्रजी शिकवा. भिक्षुकी पुरे ! पण ही गोष्ट वडिलांनीं मनावर कधींच घेतली नाहीं. त्याचें कारण असें कीं, एक तर ते श्वासानें फारच त्रस्त असत आणि इंग्रजी शिकविण्याची त्यांची इच्छाही नव्हती व तशी त्यांची आर्थिक स्थितीहि नव्हती. “ भाऊला कांहींच विद्या नाहीं याचें कसें होणार” असें आईनें एखादे वेळीं म्हटलें तर ते म्हणत कीं, त्याच्या प्रारब्धांत असेल तसें होईल. मी तरी काय करूं. तात्पर्य अस्ताला जाणारी प्राचीन संस्कृति व उदयाला येणारी आंग्ल संस्कृति, यांचा हा संधिकाल होता. थोडा कां होईना पण इंग्रजी शिकलेल्यांना मान मिळत असे. त्याचा परिणाम माझ्या मनावर झाला. प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें वडिलांना आलेलें औदासीन्य, मामांचा उपदेश, पुराणांत नागर ब्राह्मणानें केलेला अपमान या सर्व कारणामुळें इंग्रजी शिकण्याचें मीच ठरविलें. पण ती विद्या खर्चाची असल्यामुळें तेंही जुळेना.

## माझी दैन्यावस्था

माझी प्रकृति फारच अशक्त, शरीर किडकिडीत, डोक्याला खवडे, डोकेदुखी व विद्या नाहीं. लहानपणचें कौतुकही हलु हळू कमी होत

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

चाललेलें. माझ्या वडील बंधूंचें पुराण प्राचीन पद्धतीप्रमाणें रंगांत चालू होतें. त्यांच्या गैरहजेरींत कधीं कधीं मीही पण पुराण सांगण्यास जात असें, परंतु तें कोणालाही आवडत नसे. कांहीं बायका तर मला व्यासपीठावर पाहतांच दुरून परस्परच जात. कांहीं नाइलाजानें बसत. पण "दादा कां आले नाहींत. कोठें गेले, केव्हां येणार ? " असें विचारून विचारून भंडावून सोडीत, तेंही दुःख वाटे. पुराणांत मिळालेले उत्तम कपडे, आंगठ्या वगैरे बंधूंची स्वपराक्रमाची मिळकत, म्हणून ती तेच वापरीत. त्यामुळें त्यांच्या व माझ्या पोषाखांत तर अंतर होतेंच, पण त्यांचें सुंदर रूप, गौरवर्ण, तुळतुळीत गोंडस शरीर व लोकप्रियता यांनींही आमच्यांत बरेंच अंतर पडलें होतें. अनोळखी माणसाला आम्ही दोघे सख्खे भाऊ आहोंत अशी कल्पनाही येत नसे. खावें, निमित्ताला मात्र शाळेंत जावें, गांवभर भटकावें, कथा–कीर्तनें ऐकावीं, असा माझा कांहीं काळ गेला. पण ईश्वरकृपेनें म्हणा किंवा माझ्या प्रारब्धानें म्हणा कोणतेंही दुर्व्यसन मात्र मला लागलें नाहीं. अशा परिस्थितींत देखील माझा स्वभाव मानीच होता.

याच काळांत चालकांशीं न पटल्यामुळें भाटे मास्तरांनी महाराष्ट्र स्कूल सोडून, ब्रह्मघाटीं शेणवयांचे मठांत "संस्कृतांग्लपाठशाळा," नांवाची एक स्वतंत्र शाळा काढली. तिचा उद्देश असा होता कीं, संस्कृत शिकलेल्या विद्यार्थ्यांना ए, बी, सी, डी पासून इंग्रजी शिकवून तीन वर्षांत मॅट्रिक करावयाचें. या उद्देशामुळें बरेच संस्कृत शिकलेले व न शिकलेलेही विद्यार्थी भराभर शाळेंत येऊं लागले. त्यांत मीही आपलें नांव घातलें. शाळेला फी नव्हती. थोड्याच काळांत शाळेंत शेंपन्नास विद्यार्थी आले. स्वतः भाटे मास्तर इंग्रजी, वैद्य आपाशास्त्री साठे गणित व कान्हेरेशास्त्री संस्कृत शिकवीत. कान्हेरेशास्त्री विलायतेला गेल्यावर गोविंदशास्त्री सोलापूरकर हे संस्कृत शिकवीत. प्रथम अक्षरओळख झाल्यावर हॉवर्डचीं दोन प्राथमिक पुस्तकें, सँडफर्ड अँड मर्टन, व्हिकार ऑफ वेकफील्ड व बरो-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

बरच गणित असा शिक्षणाचा कार्यक्रम असे. आरंभीं आरंभीं शाळा बरीच भरभराटीस आली. एका वर्षांत मी "व्हिकार" पर्यंत आलों.

## भाटे मास्तर

भाटे मास्तर स्वभावानें सरळ होते, त्यांचें इंग्लिश उत्तम असून ते लेखही उत्तम लिहीत. शिक्षक तर उत्तमच होते, पण स्वभाव मात्र कल्पनातीत विक्षिप्त होता. त्यामुळें उभ्या आयुष्यांत त्यांचें कोणाशींच पटलें नाहीं. आवांक्याबाहेरची त्यांची महत्वाकांक्षा असल्यामुळें ते काशींतील अनेक संस्थांचे सभासद झाले. नवीन नवीन कल्पना काढून ते विचित्र विचित्र कार्यक्रम आरंभीत. पण ते सर्व लयास जाऊन त्यांचा उपहास होई. विवेकानंदांची शिष्या सिस्टर निवेदिता, या काशींत आल्या तेव्हां त्यांना शाळेंत बोलावून हळदीकुंकवाचा समारंभ करून त्यांचें व्याख्यान करविलें. दिवसभर उपास करून रात्रीं भोजनाचा त्यानीं क्लब काढला. "काशी पत्रिका," नांवाचें इंग्रजी मासिक काढलें. उतरत्या वयांत बी. ए. होण्याची इच्छा धरून अभ्यास सुरू केला. त्यांची पहिली बायको वारून बरींच वर्षें झालीं होतीं. तरी पण आतां त्यांना विवाह करण्याची इच्छा उत्पन्न होऊन त्याकरितां ते बारीकसारीक खटपटीही करूं लागले. त्यावेळेस लाटस्वामी नावांचे एक लठ्ठ संन्याशी योगी काशींत आले. ते थिऑसफी व बिझांटबाई यांचे कट्टर शत्रु होते. आमचे मास्तरही थिऑसफीचे विरुद्ध असल्यामुळें दोघांची गट्टी जमली. थिऑसफी विरुद्ध व्याख्यानांची झोड करून त्यांनीं बरीच खळबळ उडवून दिली. अशा विचित्र कार्यक्रमामुळें त्यांचें शाळेकडे दुर्लक्ष झालें आणि शाळा व त्यांची प्रथम प्रथम वाढलेली लोकप्रियता बुडाली. त्यामुळेंच ते वैतागून साधूचा वेष घेऊन काशींतून निघून गेले. तेव्हां माझेंही इंग्रजीचें शिक्षण घेणें लयास गेलें, व सभ्य गृहस्थ होण्याच्या आशेनेंही मला सोडून दिलें. मीं मोकळा होऊन पूर्वीप्रमाणें भटकूं लागलों. या शाळेमुळें माझा एक फायदा मात्र झाला. तो असा कीं, मी इंग्रजी शिकत असल्यामुळें पुढें मोठी नोकरी करून सभ्य गृहस्थ

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

होणार, या आशेनें विश्वनाथराव गोरे यांनी आपली मुलगी ( बहिणा ) मला दिली. पुढें इंग्रजी शिकणें बंद होऊन शास्त्रच शिकूं लागलों, असें त्यांना कळतांच माझेवरची त्यांची मर्जी उतरली व ती त्यांचे मरणापर्यंत तशीच कायम राहिली. आम्हां जांवईसासऱ्यांचें शेवटपर्यंत मौनव्रतच होतें.

भाटे मास्तरांचे शाळेंतील आपाशास्त्री साठे यांचें माझ्याशीं गुरुशिष्याचें जें नातें होतें तें पुढें स्नेहसंबंधांत परिणत झालें. तें अजूनही तसेंच कायम आहे. ह्यावेळीं आम्हीं बिंदुमाधव घांटावरील घर सोडून रामघांटीं काशी-राजाश्रित जोशीबुवा यांचे घरांत भाड्यानें रहात होतों.

## माझ्या सुदैवाचा उषःकाल

ह्याप्रमाणें इंग्रजी शिकण्याची आशा विलयास गेल्यावर पुनः शास्त्राध्ययन करावें असें माझ्या सुदैवानें मला वाटूं लागलें. पण मला शिकविणार कोण ! कारण त्या वेळेस काशींत सर्वच बडेबडे पंडित. त्यांचेजवळ भाष्यासारख्या बड्या ग्रंथांचें अध्ययन चालावयाचें. तेथें माझी डाळ कशी शिजणार ! अशा चिंतेंतच माझे कांहीं दिवस गले.

त्या काळांत सर्व जुने पंडित कृतकार्य झाले होते. पण नवीन उदयोन्मुख पंडितांत सूर्यचंद्रांप्रमाणें दोन पंडित चमकत होते. त्यांपैकीं एक नित्यानंद पंडित पर्वतीय व दुसरे गु. श्रीलक्ष्मणशास्त्री द्रविड. बाकी आणखीही हिंदु-स्थानी व महाराष्ट्रीय पंडित कोणी नव्हते असें मात्र नाहीं. ह्या दोन पंडि-तांची विद्वान् म्हणून प्रसिद्धि होतीच. तशांत स्वभाव व सदाचार ह्या योगानें हे दोघेही विशेष प्रसिद्ध झाले होते. हे सर्व शास्त्रांत निष्णात असून भगव-द्भक्तही होते. हा भक्ती व विभक्ति यांचा प्रीतिसंगम गंगायमुनांच्या संग-माप्रमाणें परम फलप्रद असल्यामुळेंच तो सर्व ठिकाणीं आढळत नाहीं.

## गु. म. म. नित्यानंद पंडित पर्वतीय

गु. नित्यानंद पंडितजी हे जातीनें पर्वतीय हिंदुस्थानी ब्राह्मण असले तरी

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्यांचें सर्व शिक्षण म. म. गंगाधरशास्त्री तेलंग यांचे जवळ झाल्यानें त्यांचे

उच्चार, आचार व विचार महाराष्ट्रीयच असत. ते नव्य न्यायशास्त्र सोडून सर्व शास्त्रांत पारंगत होते. पण त्यांचा बाणा व्याकरणशास्त्राचा. ज्ञानेश्वरी, नाथभागवत वगैरे मराठी ग्रंथांचा त्यांचा अभ्यास चांगला होता. श्रीमत्-भागवताचीं ते नेहमीं पारायणें करीत. त्यांनीं श्रीशांताश्रम स्वामीमहाराजांना मोक्षगुरु केलें होतें. शेवटीं संन्यास घेऊन गंगातीरावर त्यांनीं देह ठेविला. हल्लीं वैयाकरण म्हणून प्रसिद्ध असलेले बहुतेक महाराष्ट्रीय व गौड पंडित त्यांचेच शिष्य आहेत. त्यांनीं संस्कारदीपक, शेखरावर–दीपक नांवाचें विस्तृत टिपण वगैरे बरेच उपयुक्त ग्रंथ लिहिले आहेत.

## गु. म. म. लक्ष्मणशास्त्री द्रविड

गु. म. म. श्रीलक्ष्मणशास्त्री द्राविड यांचे सर्वच पूर्वज वैदिक होते. त्यांचे वडील जटापाठी असल्यामुळें त्यांचें आडनांवच जटापाठी पडलें. ते वैदिक होते तरी त्यांना वारकरी भजनाचा मोठा नाद असून ते उत्तम भजनही करीत असत. त्यांना सीतारामशास्त्री, लक्ष्मणशास्त्री, नारायणशास्त्री व वेंकटेश-शास्त्री असे चार पुत्र झाले. पहिले दोघे शास्त्री, तिसरे वैदिक व चौथे बी. ए. आहेत. त्यांपैकीं गु. लक्ष्मणशास्त्री हेच विशेष प्रसिद्धीला आले. त्यांचेच सुयोग्य पुत्र श्रीराजेश्वरशास्त्री हे आहेत. त्यांचें वर्णन "बापसे बेटा सवाई," या हिंदुस्थानी म्हणीनें केलें तर अतिशयोक्तीचें होणार नाहीं. गु. लक्ष्मण-शास्त्री ह्यांनीं न्यायशास्त्राचें अध्ययन कैलासचंद्र भट्टाचार्य यांचेजवळ केलें. भट्टाचार्य हे जुन्या पिढींतील फारच मोठे नैयायिक होते. त्या वेळचे सर्वच पंडित त्यांना गुरुतुल्य मानीत. त्यांचेच जोडीचे न्यायवेदांतमीमांसा या शास्त्रांचे प्रगाढ पंडित सुब्रह्मण्यशास्त्री होते. त्यांचेजवळ वेदांतादि सर्व दर्शनग्रंथांचें अध्ययन शास्त्रीबुवांनीं केलें. ह्या शिष्याची विद्वत्ता पाहून त्यांस सुब्रह्मण्य-शास्त्र्यांनीं आपली मुलगी दिली. तिचाच मुलगा श्रीराजेश्वरशास्त्री. ती मुलगी वारल्यावर सुब्रह्मण्यशास्त्रींनीं आपली दुसरीही मुलगी त्यांनाच दिली. गु. लक्ष्मणशास्त्री व्याकरण सोडून बाकीच्या सर्व शास्त्रांत निष्णात असले

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तरी बाणा मात्र वेदान्तशास्त्राचा. हेही वारकरी भजन उत्तम करीत. गु. नित्यानंद पंडितजींचा व्याकरणाकडे ओढा, तर शास्त्रीबुवांचा न्यायवेदांताकडे. माझें मुळांतच व्याकरणाशीं वांकडें असल्यामुळें मी पंडितजींकडे न जातां न्याय शिकण्याकरितां गु. लक्ष्मणशास्त्री यांकडे जाऊन शिकूं लागलों. प्रथम प्रथम थोडें अवघड गेलें. पण पुढें पुढें न्यायांत प्रवेश होऊन शिकण्याची गोडी लागली. तर्क—संग्रहावरील नीलकंठी शिकतांना नारायणशास्त्री खिस्ते, पांडुरंगशास्त्री ओल्डमने, लक्ष्मणशास्त्री लळीत हे सहाध्यायी होते. नंतर शेवटपर्यंत मी एकटाच होतों. मुक्तावली, पंचलक्षणी, सिद्धांत लक्षणापर्यंत न्यायशास्त्रांत प्रवेश करून, वेदांताकडे चित्ताचा कल असल्यानें तो शिकूं लागलों. पूर्वमीमांसा, सांख्ययोग, भामती, कल्पतरु वगैरे ग्रंथांचें अध्ययन शास्त्रीबुवांकडेच केलें. या अध्ययनानें माझी दृष्टि निवळून मोठा पंडित झालों नाहीं, तरी पण शास्त्रप्रमेयें कळून बुद्धि सुसंस्कृत झाली व शास्त्राचें महत्त्व कळूं लागलें. पुढें आशुतोष मुकर्जी यांच्या अत्याग्रहामुळें गु.लक्ष्मणशास्त्री कलकत्ता संस्कृत कॉलेजमध्यें प्राध्यापक म्हणून गेले. त्यामुळें धर्मशास्त्र, वेदांतमीमांसा वगैरे विषयांच्या कांहीं ग्रंथांचें अध्ययन म. म. नित्यानंद पंडितजींजवळ मला पूर्ण करावें लागलें. परीक्षेला उपयोगी पडेल असें अध्ययन म्हणजे एका वर्षांत अनेक ग्रंथ संपविण्याचे श्रम माझ्यानें होत नसत. व मला परीक्षेची तितकी आवडही नसल्यामुळें मी परीक्षेच्या नादीं लागलों नाहीं. नाहीं म्हणावयास कांहीं कारणामुळें कलकत्त्याची 'वेदांत-मध्यमा,' ही परीक्षा मी उत्तम रीतीनें पास झालों.

## दत्तक गुरु

परीक्षा देण्याचें कारण असें घडलें कीं, कलकत्त्याच्या परीक्षेचें केंद्र पाटणा आहे. तेथें एक संस्कृत शाळा होती. त्या शाळेंतील विद्यार्थी उत्तम रीतीनें पास झाले तर गुरुजींचा पगार वाढत असे. म्हणून त्या शाळेंतील एक हिंदुस्थानी पंडित काशींत येऊन आमच्या गुरुजींची प्रार्थना करूं लागले कीं, खात्रीनें उच्चांक मिळविणारे विद्यार्थी तुमच्या जवळ असतील

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तर, त्यांना माझे नांवें परीक्षा देण्यास सांगावें. म्हणजे माझा गरिबाचा पगार वाढेल. मी विद्यार्थ्यांचा सर्व खर्च देईन. शास्त्रीबुवांना दया येऊन ती गोष्ट त्यांनी कबूल केली. त्याप्रमाणें मी वेदांतांत, श्रीपादशास्त्री हसूरकर न्यायांत, व त्यांचे धाकटे बंधु भिमराव काव्यांत, अशा रीतीनें तीघेही 'मध्यमेंत,' उत्तम रीतीनें उत्तीर्ण झालों. त्यावेळेस आमच्या भाटे मास्तरांचे भावे रा. ढवळे आय. सी. एस्. हे पाटण्यांत कलेक्टर होते. आपल्याच बंगल्यांत त्यांनीं आम्हांला मोठ्या आग्रहानें ठेवून घेतलें. मध्यमेंतरींची थोडी गंमत सांगावयाची म्हणजे आम्ही पाटण्याला "तेथेंच आमचे दत्तक गुरुजी आम्हास पैसे देतील," असें समजून आपल्याच खर्चानें गेलों. पण गुरुजींचें दर्शनच होईना. राहण्याची व जेवण्याची सोय रा. ढवळ्यांच्या येथें होती म्हणून बरें झालें. पण रेल्वेभाड्याची काय वाट? एक पेपर झाला तरी गुरुजी दिसेनात. इतक्यांत रस्त्यावर फिरतांना गुरुजींना ओळखून आम्ही त्यांना घेरलेच. त्यांनीं कावराबावरा चेहरा करून न भेटण्याचीं अनेक कारणें सांगितलीं, पण आम्ही स्पष्टच सांगितलें कीं, जाण्यायेण्याचा खर्व याच क्षणीं देत असाल तर उद्याचा पेपर लिहितों, नाहींतर आतांच आम्ही परत काशीला जातों. ही परीक्षा आम्ही आपल्या स्वतःकरितां देत नसून तुमच्याच पगारवाढीकरितां देत आहों. गुरुजी घाबरले आणि चटकन् पैसे काढून ते त्यांनीं तेथल्या तेथेंच आम्हाला दिले. नंतर आम्ही त्यांचें दत्तविधान रद्द केलें.

## माझें मित्र मंडळ

म. म. गंगाधरशास्त्री तेलंग C. I. E. ह्यांचे जवळ मी काव्यप्रकाशाचें अध्ययन केलें. अध्ययन चालू असतां मी आपल्या घरीं अध्यापनही दिवसभर करीत असें. यावेळेस दक्षिणेंतून शिकण्याकरितां अनेक विद्यार्थी आले होते. श्रीपादशास्त्री हसूरकर, सीतारामशास्त्री शेंडे, माधवशास्त्री भंडारी व त्यांचें बंधु रामशास्त्री, भार्गवशास्त्री जोशी, संकेश्वरचे हल्लीचे शंकराचार्य

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

(जेरे), काशींतील नारायणशास्त्री खिस्ते, सीतारामशास्त्री केळकर, गोपाळशास्त्री नेने, विश्वनाथशास्त्री द्रविड, श्रीनिवासशास्त्री चुनेकर, ही सर्व मंडळी कोणी गु. पंडितजींचे शिष्य, तर कोणी गु. लक्ष्मणशास्त्रींचे शिष्य व कोणी उभयतांचेही शिष्य होते त्यामुळें हे सर्व माझे मित्रच झाले. यांपैकीं कोणी माझे सहाध्यायी, कोणी सतीर्थ्य, कोणी समान विचारी, व कोणी निर्व्वळ प्रेमी होते. अद्यापही त्यांचें तें मजवरचें प्रेम कायम आहे. वरील सर्वच मंडळी विद्वान् होऊन उच्चपदांवर अधिष्ठित झाली आहे.

श्रीपादशास्त्री हसूरकर हे अनेक परीक्षा पास होऊन इंदूर संस्कृत-कॉलेजचे प्रिन्सिपाल झाले. शेंडेशास्त्री महामहोपाध्याय होऊन कलकत्ता-कॉलेजमध्यें लेक्चरर झाले महामहोपाध्याय भडारीशास्त्री लाहोरास प्रिन्सि-पाल झाले. भार्गवशास्त्री हे वुइल्सन् कॉलेजमध्यें प्रोफेसर आहेत. जेरे तर शंकराचार्यच झाले. खिस्तेशास्त्री उत्तम पंडित व कवि असून काशींतील सरकारी सरस्वतीभवनाचे सहकारी लायब्रेरियन आहेत. सीतारामशास्त्री केळकर हे न्यायतीर्थ व सांख्ययोगाचार्य होऊन धनकनक संपन्न असल्यानें नौकरी न करतां अनेकांना आपल्या विद्येनें व धनानें मदत करीत आहेत. गोपाळशास्त्री नेने काशींतील संस्कृत कॉलेजांत अध्यापक आहेत. चुनेकर हे काशींतील वैद्य त्रिंबकशास्त्री यांचे पट्टशिष्य असून उत्तम वैद्य झाले आहेत. त्रिंबकशास्त्रींचे खालोखाल काशींत त्यांचेंच नांव आहे. विश्वनाथशास्त्री द्रविड हे ग्वाल्हेरमध्यें प्रोफेसर आहेत. मी मात्र जसा होतों तसाच आहे. एक महामहोपाध्यायाची पदवी मिळाली होती, ती मी सहा महिन्यांतच टाकून दिली. तरी पण वरील माझे सर्व मित्र विद्वान् आहेत, ह्याचा मात्र पूर्ण अभिमान माझे जवळ आहे.

असो. आतां मात्र मी काशींत थोडा नांवारूपाला आलों. माझा मला भरंवसा येऊं लागला. आपल्या आर्थिक थाटामाटाचें दैन्य वाटेनासें झालें. लोकही सामान्य पुराणिकांपेक्षां उच्च दृष्टीनें मजकडे पाहूं लागले. पुराणांतही माझी विद्वत्ता झळकूं लागली, तरी पुराण सांगण्याच्या प्राचीन पद्धतींत माझें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

समाधान होईना. त्यावेळेस काशींतही प्रवचनपद्धति माहितच नव्हती. मधून मधून अध्यापकाची नौकरी करण्याची हुक्की येई व त्याकरितां खटपटही करीत असें. पण माझ्या सुदैवानें नौकरी मला मिळालीच नाहीं.

## मी प्रवचनाकडे कसा वळलों

सुप्रसिद्ध गीताप्रवचनकार रामशास्त्री कान्हेरे काशींत आले. शारदीय नवरात्रांत बालाजी मंदिरांत 'कर्मण्यकर्म यः पश्येत्' या श्लोकावर त्यांचें प्रवचन झालें. त्यांचा लौकिक व नवीन प्रवचनपद्धति ऐकून लोकांची फारच गर्दी झाली. मीही मुद्दाम प्रवचनास गेलों होतों. पण माझी व सर्व विद्वान् श्रोत्यांची निराशाच झाली; कारण शास्त्रीबुवांनीं एकदा श्लोक वाचला तेवढाच. सबंध तासभराच्या प्रवचनांत "दारू पिऊं नये, अमुक साहेब असें म्हणतो, अमुक तसें म्हणतो," याचा व इतस्ततः अभंग, गाणीं वगैरे ह्यांचा भडिमार करूनच त्यांनीं आपलें प्रवचन संपविलें. श्लोकाच्या खऱ्या अर्थाला नुसता स्पर्शही केला नाहीं. प्रवचनांत शास्त्राध्ययनाचा गंधही आला नाहीं. दुसऱ्या दिवशीं मंडळींनी माझें प्रवचन ठरविलें. तें मी मोठ्या आनंदानें कबूल केलें आणि तोच श्लोक घेऊन आचार्यांच्या भाष्यानुसार शास्त्रीय रीतीनें त्यावर दीड तासपर्यंत प्रवचन केलें. तें फारच परिणामकारक झालें. लोकांनाही तें पसंत पडलें. तेव्हांपासून वेदान्तविषय प्रवचनरूपानेंच सांगूं लागलों.

## महत्समागम

या वेळेस आम्ही रामघांटचें घर सोडून दुर्गाघांटीं श्रीमंत नाना फडणवीस यांचे वाड्यांत वरच्या मजल्यावर भाड्यानें राहण्यास आलों होतों. त्या वाड्यांत त्या वेळीं गु. नित्यानंद पंडित, गणपतीबुवा भागवत माझे मामा, (आईचे आतेभाऊ, हे एकनाथ संप्रदायांतील असून कीर्तनकार होते. त्यांचे चिरंजीव ह. भ. प. विनायकबुवा भागवत हे रामचंद्रबुवा चांदवडकर यांचे पट्टशिष्य असून उत्तम कीर्तनकार व उत्कृष्ट कवि आहेत.)

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मुकुंदराव काळविठ, गोदूताई, (माई, भक्त व वेदांती होत्या) बापट मास्तर अशांचीं बिऱ्हाडें होतीं. हा भक्त, विरक्त व वेदांती यांचा मेळावाच होता, असें म्हटलें तरी चालेल. बिंदुमाधव घांटावर श्रीअद्वैताश्रम स्वामी रहात असत. हे अत्यंत विरक्त व वेदान्तनिष्ठ असून अक्कलकोट स्वामींचे कृपेस पात्र झालेले होते. एक दिवस संध्याकाळीं गंगेवरून संध्या करून त्यांचे मठावरून येतांना ते आपल्या मठाचे दारांतच मला दिसले. त्यांना वंदन करून मी उभा राहिलों. तोंच त्यांनीं मोठ्या प्रेमानें जवळ बोलावून "तूं आम्हांला बृहदारण्य सांगशील काय !" असा अवाचित प्रश्न केला. मीही पण एकदम हो म्हणून कबूल केलें. तोंपर्यंत उपनिषदें वगैरे ग्रंथ अधिकारवाणीनें मी पूर्वी कधींही सांगितले नव्हते. मी प्रथम बृहदारण्य सांगून नंतर प्रस्थान त्रयी ( उपनिषदें, शारीरक भाष्य व गीता ) शांतिपुरःसर यथाविधि सांगितली. शांतिपुरःसर सांगतांना मध्यें शास्त्रीय अनध्याय बरेच पडत. त्या अनध्यायांत आचार्यांचे समग्र ग्रंथ व पंचदशी वगैरे अन्यही प्रकरण-ग्रंथ सांगितले. यथाशास्त्र उपनिषदांचा पाठ चालत असल्याकारणानें स्त्री व शूद्र यांना स्वामी येऊं देत नसत. वेळ सकाळीं साताची. मठ अगदींच गंगातीरावर. श्रोते सर्वच वृद्ध व विरक्त आणि वक्ता अगदींच अल्पवयी व संसारी. या सर्व दृश्याचा लोकांवर फारच आश्चर्यकारक व आनंददायक परिणाम होत असे. ज्यांना हें दृश्य पाहावत नसे असेही लोक तेथें होतेच. त्यांनीं "या मुलाकडून उपनिषदें काय ऐकतां," असें स्वामीमहाराजांना पुष्कळ वेळां सांगून पाहिलें. पण स्वामींनीं तिकडे लक्षच दिलें नाहीं. गृहस्थानें संन्याशाला उपनिषदें सांगू नयेत. त्यांतल्या त्यांत बृहदारण्य तर मुळींच सांगू नये. कारण तें विरक्त संन्याशाशिवाय गृहस्थाला हानिकारक आहे असें ते मलाही सांगत. पण "अन्य निमित्तानें मरण येण्यापेक्षां बृहदारण्य सांगण्यानें मला मरण आल्यास फारच उत्तम होईल" असें मीही त्यांना ठांसून सांगत असें. त्या वेळीं प्रस्थानत्रयीचे पाठ सांगणारे सर्वच विद्वान स्वामी समाधिस्थ झाल्यामुळें फक्त माझाच काय तो पाठ चालत असे.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्यामुळें परगांवांहून येणारी मोठमोठी श्रीमंत, महंत, संत व वेदांत–प्रेमी मंडळी नेमकी माझेच पाठांस येत व ते ऐकून प्रसन्न होऊन माझ्याशीं परिचय करीत.

कै. श्रीमंत ग्वाल्हेरचे सरदार रामरावजी जठार, स्वानंदसाम्राज्यकर्ते, अण्णासाहेब विजापूरकर, एक श्लोकी गीता व गुरुप्रसाद वगैरे ग्रंथांचे कर्ते पुण्याचे दामले स्वामी, घराचे मालक नानासाहेब फडणीस, कांहीं प्रच्छन्न योगी, वेदांती, विरक्त वगैरे अनेक लोकांचा वेदांत प्रवचनाच्या योगानें काशींतच परिचय झाला. शंका, समाधान, वादविवाद व अनेक विषयांवरील चर्चा कांहीं एकांतांत तर कांहीं उघड होऊं लागल्या. तात्पर्य आतां मी विद्यार्थि मंडळांतून निघून उच्च वातावरणांत हिंडूं लागलों. त्या वेळेसही मला आर्थिक लाभ होत नसला तरी पारमार्थिक लाभ मोठा होत गेल्यानें मला पूर्ण समाधान वत असे.

## चौंडेमहाराजांचा परिचय

या काळांत चौंडेमहाराजही काशींत येऊं लागले होते. त्यांचें कीर्तन फारच उत्तम व भक्तिरसानें ओथंबलेलें असे. सर्व काशी, त्यांनीं आपल्या कीर्तनानें व निरभिमानी प्रेमळ स्वभावानें, मोहून टाकली. उत्सव महोत्सव फारच मोठ्या प्रमाणांत, लोकांच्या उत्साहानेंच होत असत. त्यांच्या प्रेमळ भजनांत गु. लक्ष्मणशास्त्री वगैरे मोठी मंडळीही भाग घेत. मीही पण

" नृत्यति पिनाकपाणौ नृत्यंत्यन्येऽपि भूतवेतालाः "

या न्यायानें भजनांत भाग घेत होतों. त्यामुळें त्यांचा व माझा बराच परिचय झाला. पुढें भजन व उत्सव याकरितां सत्तेची स्वतंत्र जागा असावी म्हणून चौंडेमहाराजांनीं रामघांटावर एक राममंदिर बांधलें. त्यांत श्रीराम व रामदासस्वामी यांची स्थापना केली. त्या वेळीं आम्ही त्यांचे देवळाजवळच रामघांटीं रहात होतों. आतां तर आमच्या घराशीं त्यांचा फारच प्रेमाचा घरोबा झाला. माझ्या वडिलांवर त्यांचें व बुवांवर वडिलांचें आदर-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

युक्त पण स्वजनांप्रमाणें प्रेम असे. माझ्या वडिलांनाही कांहीं सांसारिक कार्य नसल्यानें, ते नेहमींच देवळांत जाऊन बसत. सबंध देवळाचें काम त्यांचेच देखरेखीखालीं झालें, असें म्हटलें तरी चालेल. देवळांतील पुराणिकाचा मान त्यांनीं मलाच दिला. अजूनही मी काशींत असलों तर उत्सवाचे शेवटीं पुराणिकाच्या मानाचा विडा मलाच मिळतो. त्या देवळांत मी वाल्मीकि रामायण प्रथमच सांगितलें. त्या वेळेस मला देवळांतून एक शाल मिळाली. तीच मला मिळालेली पहिली शाल. त्याचे पूर्वी मी घाबळच पांघरीत असें. त्यानंतर शेंकडों शाली मिळाल्या, पण अजून ती पहिली शाल मला आठवते. स्थापनेचा एक श्लोकही मी करून दिला होता. तो असा—

शाके नागदृगष्टभूपरिमिते शुक्ले तपस्ये रवौ ।
पंचम्यामभिजिन्मुहूर्तसमये श्रीरामघट्टे शुभे ।।
काश्यां बालकरामसंदिरमिदं श्रीरामदासाश्रमे ।
मार्तंडात्मजबालकृष्णहरिदासेन प्रतिष्ठापितम् ।।

पुढें हळुहळू चौंडेमहाराजांचें लक्ष कीर्तन करून महंताच्या थाटांत न रमतां गोरक्षणासारख्या अत्यंत उपयुक्त कार्याकडे लागलें. काशींतच चळवळीचा आरंभ झाला. आम्हीही यथाशक्ति हातभार लावीतच होतों. वेद, शास्त्र, पुराण व इतिहास या सर्वांतील गोविषयक वेंचे काढून मी एक पुस्तक तयार करून त्यांना दिलें. "गोवर्धन," हें नांव माझ्याच कल्पनेनें त्यांनीं 'मासिक' व 'संस्था' ह्यांस दिलें आहे. वडिलांच्या मरणसमयीं महाराज जवळ होते. वडिलांची वाचा बंद झाली होती, ते बेशुद्ध स्थितींत होते, डोळे मिटले होते, तरी पण महाराजांनीं "कसें काय शास्त्रीमहाराज," असें विचारतांच वडिलांनीं डोळे उघडून त्यांचेकडे पाहून "ठीक आहे," असें हसून उत्तर देऊन डोळे झांकले. अजूनही वडिलांप्रमाणें महाराज मजवर प्रेम करतात व मीही त्यांना घरचेच समजून त्यांच्याशीं मोठ्या प्रेमानें अघळपघळ वागतों. हा इतका त्यांचा आमचा संबंध अनंतदासांना माहीत

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

असूनही त्यांच्या चरित्रांत आमच्या घराण्याचा किंवा नांवाचाही उल्लेख केलेला नाहीं ह्याचें आश्चर्य वाटतें.

त्यांच्या चरित्रांत " गजानन शर्मा देवरात " म्हणून एक स्वतंत्र प्रकरण लिहून ज्याचें वर्णन केलें आहे तो एक गोकर्णाचा विद्यार्थी म्हणून श्री. वासुदेवानंद स्वामींच्या सांगण्यावरून शिकण्याकरितां काशींत आला होता. तो माझेच जवळ कांहीं दिवस तर्कसंग्रह शिकत होता. तो पुढें लौकरच काशींतून गेला.

## श्री नारायणमहाराज यांचा परिचय

गोविंदबावा नाशिककर हे अतिशय उत्तम हरदास असून ग्वाल्हेर सरकारचे गुरु होते. त्यांनीं संन्यास घेऊन " तारकाश्रम," नांव धारण केलें. काशींत दुर्गाघांटीं " तारक–मठ," नांवाचा मठ स्थापन करून ते तेथेंच राहिले. त्यांचे कीर्तनाचे शिष्य रामचंद्रबोवा चांदवडकर. यांना कीर्तनाचार्य ही पदवी असून ते खरोखरच कीर्तनाचार्य होते. त्यांचीं मी पुष्कळच कीर्तनें ऐकलीं आहेत. ते नारायण महाराजांचे भक्त असल्यानें त्यानीं १९१५ सालीं आपल्या मुलीच्या लग्नाकरितां महाराजांना काशींत बोलाविलें. नुकतीच महाराजानीं केडगांवीं दत्तस्थापना केली होती. महाराज काशींत त्या वेळेस प्रथमच आले. त्यांचा मुक्काम श्रीमंत दिनकरराव राजवाडे यांच्या वाड्यांत होता. बरोबर अंजनाबाई, वसंत शेट वगैरे बरीच श्रीमंत मंडळी होती. महाराजांची कीर्ति कर्णोपकर्णी पूर्वीपासूनच काशींत पसरली होती. त्यांच्या दर्शनाकरितां काशीकरांची अलोट गर्दी होत असे. त्या गर्दींत मीही पण दर्शनास गेलों. साधुसंतांचीं दर्शनें घ्यावीं व शास्त्रांत लिहिलेलीं संतलक्षणें पडताळून पहावीं, त्यांच्या सर्व व्यवहाराचें सूक्ष्म दृष्टीनें म्हणजे कुत्सित किंवा दोषैक दृष्टीनें नव्हे, तर शास्त्रीय कठोर दृष्टीनें निरीक्षण करावें, ह्याची मला फार इच्छा असे. महाराजांची माझी दृष्टादृष्ट होतांच त्यांनीं मला बोलावून जवळ बसविलें, तेव्हांपासून ते तेथें होते तोंपर्यंत

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मी त्यांचेकडे जात असें. एक दिवस त्रिस्थळी यात्रेबद्दल त्यांची चर्चा चालू होती. त्यांत कांहीं शास्त्रीही होते. अगोदर काशीयात्रा करावी कां प्रयाग, कां गयायात्रा करावी असा वाद चालू होता. त्या वादांत मी भाग घेतला व आपलें म्हणणेंच सयुक्तिक आहे असें त्यांना त्रिस्थळी-सेतु-ग्रंथाच्या आधारें पटवून दिलें. मग त्याप्रमाणेंच महाराजांनीं यात्रा केली. तेव्हांपासून महाराजांचें माझेवर विशेष प्रेम जडलें; व जातांना ते मला म्हणाले कीं, 'तुम्ही केडगांवीं दत्तदर्शनार्थं अवश्य यावें.' काशींतील एवढाच माझा त्यांचा परिचय.

तारक मठांत श्रीशांताश्रमस्वामी रहात. त्यांचेकडे रात्रीं गु.नित्यानंद पंडित, गु. लक्ष्मणशास्त्री द्रविड, परांजपे मास्तर, प्रो. तुकारामपंत लड्डु, सखारामबोवा लोणकर वगैरे मंडळी जमून वेदांतचर्चा होई. तेथेंही मी नित्य नियमानें जात असें. श्रीवासुदेवानंद सरस्वतीमहाराज काशींत आले, ते तारक मठांतच उतरले होते. महाराजांचा मुक्काम काशींत तीनच दिवस होता, पण तेवढ्यांत मला त्यांचा बराच सहवास होऊन पुष्कळ गोष्टी ऐकावयास मिळाल्या.

श्रीशांताश्रमस्वामींचा व गोंदवलेकरमहाराजांचा बराच स्नेहसंबंध असल्यानें, बुवा काशींत आले म्हणजे स्वामीमहाराजांकडे येऊन बसत व गोष्टी चालत. मी मठांत स्वामीमहाराजांजवळ असावयाचाच, म्हणून मलाही त्यांच्या गोष्टी ऐकावयास मिळत. स्वामी व गोंदवलेकरमहाराज गंगातीरावर किंवा देवदर्शनार्थ जात, त्या वेळेस मीही पुष्कळ वेळां त्यांचेबरोबर असें. बुवांचा काशींतील सर्व कार्यक्रम मी मोठ्या अभ्यासू पण शास्त्रीय दृष्टीनें पाहात असें. परंतु त्यांच्या चरित्रांत व आरत्यामध्यें लिहिलेलें "काशीक्षेत्रीं मेलेल्याला जिवंत केलें," असले चमत्कार केव्हांच माझे दृष्टीस पडले नाहींत. व काशींत ऐकीवांतही पण येत नाहींत. असो.

बिंदुमाधव संस्थानचे मॅनेजर काशीनाथपंत वैशंपायन हेही माझे स्नेही असत. त्यांचेकडे रात्रीच्या वेळीं सहज गायनाच्या करमणुकीकरितां म्हणून गोविंद-राव जोगळेकर वकील, सानेमामा, योगानंद ब्रह्मचारी, रामशास्त्री मडकम-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कर वगैरे मंडळी जमत. तेथेंही मी कधीं कधीं करमणूक म्हणून जात असें. अशा अनेक महापुरुषांचा समागम, सहवास व संवाद त्या दिवसांत बराच होत असल्यामुळें माझे दिवस आनंदांत जात. असा मी स्वतः जरी आनंदांत होतों तरी " आतांपासूनच हा संन्याशांचा गुरु झाला, संसार करीत नाहीं, पैसे मिळवीत नाहीं," असा उपहास घरींदारीं चालतच असे.

माझ्या या उत्कर्षाचें वडिलांना मात्र कौतुक वाटून " पुढें भाऊचें कसें होईल," ही त्यांची एक काळजी कमी झाली. तरी आम्हां उभयतां बंधूंना संतति नसल्याबद्दल त्यांना थोडी रुखरुख वाटे. पुढें लौकरच मला एक मुलगी झाली. पण जन्माचे दुसरे दिवशींच ती वारली. तरी पण " सून वंध्या नाहीं, होतील मुलें," असें वाटून त्यांची ती रुखरुखही नाहींशी झाली. वडील बंधूंना संतति झालीच नाहीं. वडिलांचा स्वभाव मुळांतच समाधानी असल्यानें त्यांचेदेखत त्यांचा जांवई—वडील मुलीचा नवरा,–एक मोठी मुलेंबाळें झालेली मुलगी व अनेक लहान मुलें वारलीं होतीं, तरी पण त्यांची समाधानी व आनंदी वृत्ति कधींच ढळली नाहीं. अशा समाधानी वृत्तींतच माझ्या उत्कर्षाच्या अरुणोदयीं नाना फडणिसांचे वाड्यांत त्यांनीं आपला देह ठेविला. त्यांची प्रेमळ, विरक्त, ममताळू व आनंदी मूर्ति डोळ्यांसमोर उभी राहिली म्हणजे अजूनही त्यांच्या वियोगाचें दुःख मला जाणवतें.

अद्वैताश्रम स्वामीमहाराज समाधिस्थ झाल्यानंतरही त्या मठांत मी कांहीं दिवस पाठ सांगून प्रस्थानत्रय संपविलें. त्याच सुमारास चैत्र शु॥ ९ रामनवमीचे ( सन १९१५ ) दिवशीं दोन प्रहरीं मला मुलगा झाला. त्याचें नांव रामचंद्र ठेविलें. वडील बंधूंच्या हौसेनें त्याचे जातकर्मादिक सर्व संस्कार यथाविधि केले.

हा माझ्या जन्मभूमीशीं—म्हणजे काशीशीं–संबद्ध असलेला माझ्या आयुष्याचा पूर्वार्ध, अशा रीतीनें पार पडला. यानंतर जवळ जवळ मी काशीला दुरावलोंच म्हटलें तरी चालेल.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri



पं. भाऊशास्त्री वझे उज्जैन १९२४



पं. भाऊशास्त्री वझे पुणें १९३६

छपाई—कलागृह प्रेस पुणें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# माझा महाराष्ट्रांतील पहिला प्रवास
# सन १९१५

### केल्यानें देशाटन, पंडितमैत्री सभेंत संचार ॥
### शास्त्रग्रंथविलोकन मनुजा चातुर्य येतसे फार ॥

काशींतील माझे एक मित्र गोविंदराव जोगळेकर वकील हे १९१५ सालीं पुणें पाहण्यास जाऊं लागले. तेव्हां मलाही पुणें पाहण्याची इच्छा उत्पन्न होऊन त्यांचेबरोबरच जावेसें वाटलें. त्यापूर्वी काशी मीं कधीं सोडलीच नव्हती. जन्म काशींतला, बाल्य, विद्याभ्यास व तारुण्याचा कांहीं भाग तेथेंच गेलेला होता. तरी मी महाराष्ट्रीय आहें, महाराष्ट्रच माझी खरी जन्मभूमि व कर्मभूमि आहे, असें मला नेहमीं वाटे. येथें शिवाजीमहाराज जन्माला आले होते आणि त्यांनीं यवनाक्रांत भारतभूमीला महाराष्ट्रापुरतेंच कां होईना, पण स्वतंत्र करून तेथें धर्माची स्थापना केली होती. ईश्वरानें शिवाजीमहाराजांना जास्त आयुष्य दिलें असतें तर महाराष्ट्राप्रमाणें आमचाही प्रांत स्वतंत्र करून येथेंही त्यांनीं धर्माची स्थापना केली असती. तसें घडून आलें नाहीं याबद्दल मला अजूनसुद्धा वाईट वाटतें. तो शिवाजीमहाराजांचा महाराष्ट्र, एकदां तरी डोळ्यांनीं पाहावा असें नेहमीं वाटत असे. दुसरेंही कारण असें होतें कीं, काशींत १९०५ सालीं कांग्रेस झाली. तेव्हां लो. टिळक, रा. खापर्डे, रा. करंदीकर वगैरे बडेबडे महाराष्ट्रीय विद्वान् काशींत आले होते. त्यावेळेस ना. गोखले हे अध्यक्ष होते. त्यामुळें केसरींतून ज्यांची कीर्ति, लेख, वादविवाद मीं वाचित असें, ते पुणेकर प्रत्यक्ष पाहण्यांत आले. त्यांचे ते सुटसुटीत व स्वच्छ पोशाख, ती चुटचुटीत शुद्ध मराठी भाषा, सर्वज्ञतेची झळक मारणारें बोलणें, कामाची तडफ, वादविवादांत आपलीच छाप दुसऱ्यावर ठेवण्याची कला वगैरे गोष्टी पाहून मला मोठेच कौतुक व आदर वाटला. आमच्या प्रांतांत तर सर्वच याच्या उलट. अघळपघळ पोशाख त्याचप्रमाणें भाषाही अघळपघळ. मुद्दा लहानसाच, पण त्याची प्रस्तावनाच

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

भली थोरली. ८०० वर्षें मुसलमानी अमलाखालीं राहिल्यानें गुलामगिरीचा विनय अंगांत मुरून गेला होता. त्यामुळें आंगांत, भाषेंत, वागण्यांत, पोषाखांत तडफ मुळींच नाही. परिस्थिति गरीबीची असली तरी मिजास व भाषा मात्र बादशाही. सर्व हिंदुमात्रांची ही स्थिति त्यांतल्या त्यांत महाराष्ट्रीय वैदिक, शास्त्रीमंडळीबद्दल तर बोलावयासच नको. सर्वच शंकराचे गण म्हटलें तरी चालेल. पोषाख तर धोतर, उपरणे व हातांत एक चार हाती पंचा येवढाच. हिंदी मराठी मिश्रित घेडगुजरी भाषा. वैदिक तर केवळ वेदोनारायणच. वेदाक्षराशिवाय त्यांना बाह्य कांहींच माहीत नसावयाचे. अक्षरें हीं वाचण्याकरितांच ईश्वरानें निर्माण केलीं, लिहिण्याकरितां नाहींत, ही गोष्ट त्यांच्या आचरणावरूनच दिसून येई. वेदांचा अर्थ करतां येणारच नाहीं, जर तो केला तर तें एक भयंकर पापच. शास्त्री मंडळी वेदांचा अर्थ करतात म्हणून कट्टर वैदिक त्यांना मनांतून नास्तिकच समजत. याच्या अगदीं उलट पुणेकरांची स्थिति नजरेस आली. त्यावेळेस आजच्याइतकें महाराष्ट्रीयांचें दळणवळण काशीशीं नसल्यानें कांहीं थोडीशीच विद्वान पुणेकर मंडळी काशींत येत. आमच्या प्रांताच्या अगदीं उलट असे त्यांच्या आंगचे गुण पाहून अगदीं आरंभीं आरंभीं हिंदुस्थानांत येणाऱ्या साहेबांना पाहून, हिंदुस्थानच्या लोकांना जसें नवल वाटत होतें, तसेंच मलाही पुणेकरांना पाहून नवल वाटलें. म्हणून पुण्यास जाण्याचें ठरवून मी गोविंदरावांबरोबर निघालों.

काशींतील घराचे मालक नानासाहेब फडणीस बेलबागकर यांचे घरीं उतरण्याचें ठरविलें होतें. आणि तसें त्यांना निघण्यापूर्वी पत्रही टाकलें होतें; म्हणून उतरण्याची काळजी नव्हती. घरीं आई, वडील बंधु, त्यांची बायको, व ताई ( यजमान लहानपणींच वारल्यामुळें ती आमचे येथें राहत असे. ) ही मंडळी होती, त्यामुळें घरची काळजी नव्हतीच. काशींत परिचय झालेल्या पुणेकर मंडळीनींही बोलाविलें होतें. आम्ही दोघेही कलकत्ता मेलनें दुसरे दिवशीं कल्याणला आलों. प्रथम पुण्यास जाण्याचें ठरविलें होतें; म्हणून तेथेंच उतरलों.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## माझ्या कूपमंडूक वृत्तीचा एक नमुना

महाराष्ट्रांत आलों असें वाटून आनंद झाला. हमाल, फळवाला, चहा-वाला, गाडींतील सर्व प्रवासी, स्टेशनचा सर्व नोकरवर्ग, सर्वच मराठी बोलत होते. स्त्रीपुरुषांचा संमिश्र व्यवहार, स्त्रीस्वातंत्र्य, पुरुषाप्रमाणेंच निर्भीड रीतीनें चाललेला स्त्रियांचा व्यवहार, प्रत्येकाच्या हातात वर्तमानपत्रें, कोणी गंभीर रीतीनें वाचतात, तर कोणी त्यांतील विषयांची चर्चा करीत विवाद करितात, त्यांत स्त्रियाही भाग घेतात, हीं सर्व दृश्यें प्रथमच पहावयास मिळालीं. वयाचे २७ वर्षेपर्यंत पडदाप्रथेच्या प्रांतांत मी राहिल्यानें शकुंतलेला राजगृहीं पोहोंचविण्यास आलेल्या शार्ङ्गरवाप्रमाणें हें सर्व पाहून आश्चर्यचकितच झालों. आमच्याकडे तर बहुतेक सर्व बायका उपवस्त्रानें तोंडासकट सर्व अंग गुंढाळून रस्त्यानें जावयाच्या. दुसऱ्या पुरुषाशीं बरोबरीनें बोलणें तर दूरच राहिलें; पण एखादा मनुष्य घरीं येऊन दारांतून पुरुषाला हांका मारू लागला व तो घरीं नसला, तर त्या घरच्या बायका समोर तर येणार नाहींतच पण हांका मारून मारून आलेल्या इसमाचा जीव कासावीस झाला तरी त्याला उत्तर म्हणून द्यावयाच्या नाहींत. सर्वच बायका अक्षर शत्रु होत्या. हा सर्व मुसलमानी संस्कृतीचा परिणाम ! ही अतिरेकाला गेलेली पडद्याची चाल काशींतील महाराष्ट्रीय स्त्रीसमाजांत नव्हती. तरी पण महाराष्ट्रांतील स्त्रियांइतका मोकळेपणाही तेथें नव्हता. आमचे गोविंदराव एक दोन वेळां पुण्याला जाऊन आले होते. म्हणून त्यांना या दृश्याचें कांहींच नवल वाटलें नाहीं. दुपारीं आम्ही पुना–एक्सप्रेसमध्यें बसलों. तेथें घडलेला प्रकार विशेष महत्त्वाचा नसला तरी माझ्या कूपमंडूकवृत्तीचा एक नमुना म्हणून लिहिल्यास वाचकांची थोडी करमणूकच होईल; तो असा. ती एक्सप्रेस दिवसाची असल्यामुळें दोनच माणसें बसतील अशीं बाकें तींमध्यें होतीं. एका बाजूस त्यांचेवर कोठें कोठें दोन पुरुष, तर कोठें कोठें दोन बायकाच, कोठें एक बाई व एक पुरुष असे बसलेले मी पाहिले. बाईजवळ चिकटून बसलेला पुरुष तिचा कोणी तरी आप्तच असला पाहिजे अशी माझी सम-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

जूत झाली होती. सर्व बांक स्त्रीपुरुषांनीं भरले होते. एका बाकांवर एक बाई एकटीच बसली होती. तिच्या जवळ एक जागा रिकामी होती, तरी मी संकोचानें तिच्या जवळ न बसतां खालीच तिच्या समोर ट्रंक ठेवून त्यावर बसलों. हा माझ्यासारख्या संस्कृतज्ञाचा असंस्कृतपणा पाहून सर्व मंडळी माझेकडे टकमका पाहून हंसू लागली. पण मला मात्र त्याचें कारण कांहींच कळेना. कांहीं वेळानें बाईच्या जवळच्या जागेवर नवीन गृहस्थ येऊन बसला. बाकीच्या बाकांवरही अशीच ये जा होऊं लागली. तेव्हां मी तर्कशास्त्राच्या आधारें अन्वय व्यतिरेक करून अशी व्याप्ति ठरविली कीं, कोणीही कोणा-जवळ बसल्यास हरकत नाहीं, ही या प्रांताची पद्धतच आहे. मी केला तो मूर्खपणा केला. जागा रिकामी असतांनाही मी खालींच बसलों, म्हणून लोक मला हंसले. नंतर एक जागा रिकामी होतांच मी चट्कन् जाऊन एका बाईजवळ बसलों. पण संवय नसल्यामुळें शेवटपर्यंत खिडकीकडे तोंड करून जुन्या काळच्या नवऱ्यामुलीप्रमाणेंच बसलें होतों. पण पुढें मात्र गाडींत स्वत:पुरती जागा कोठेंही करून घेण्यांत पटाईत झालों.

संध्याकाळीं पुण्यास पोंहोंचलों. गोविंदराव हे त्यांचे मित्र बारामतीचे नानासाहेब मोडक सी. आय. डी. चे इन्स्पेक्टर, यांचे घरीं गेले; व मी टांगा करून वेलबागेंत गेलों. पुढें पुणें सोडीपर्यंत गोविंदरावाशीं माझी गांठ क्वचितच पडली. आतां मात्र मी अगदीं एकटाच झालों. घरांत जाऊन नानासाहेबांचा तपास करितां दारावरील त्यांच्या शिपायानें ते मेणवलीला गेले असें सांगतांच माझी कंबर खचली. कांहीं लोक ओळखीचे असले तरी त्यांचा पत्ता मला माहीत नव्हता. प्रवास कधींच केला नसल्यानें रात्रीच्या वेळीं पराठिकाणीं हिंडून त्यांना हुडकून काढण्याचें धैर्य मला झालें नाहीं. यामुळें फारच विवंचनेंत पडलों. पण तो दारावरील शिपाई काशींतील ओळखीचा निघाल्यामुळें "कांहीं काळजी करूं नका. मी हॉल उघडून देतों. तेथें सुखानें झोपा. मी ब्राह्मण असतों तर आपल्या घरीं तुमच्या जेवणाचीही सोय केली असती पण काय करूं!" असें म्हणून त्यानें हॉल उघडून दिला. तेथें मीं

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

रात्रभर झोंप घेण्याचा निष्फळ प्रयत्न केला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं पहिला प्रश्न जेवण्याचाच डोळ्यासमोर दत्त म्हणून उभा राहिला. संवय नसल्यामुळें खाणावळींत जाण्याची इच्छा होईना. स्नानसंध्या आटोपून देवळांत नारायणाचे दर्शनास गेलों, तोंच देवाचे पुजारी शिवरामशास्त्री जोगळेकर यांनी मला ओळखिलें व कुशल प्रश्न केला. त्यांची माझी काशीची ओळख होती. नानासाहेब येथें नाहींत तेव्हां माझेकडेच जेवण्यास यावें असा त्यांनीं आग्रह केला. मनांतून हवेंच होतें. पण वरून आढेवेढे घेत कबूल केलें व त्यांचेकडेच जेऊं लागलों. तीन दिवस जेवलों पण प्रशस्त वाटेना. मामांचे सासुरवाड पुण्यांतच असल्यानें तिकडे एक दिवस, तर मोडकांकडे एक दिवस असा जेऊं लागलों. मधून मधून बरोबर आणलेले चिवडा लाडू खाऊनच चार पांच दिवस काढले. बरोबर कोणी ओळखीचें नसल्यामुळें पुणें ही पहाणें झालें नाहीं; व त्यामुळें दिवसभर घरीं बसून रहावें लागत असे. 'बरा होतो घरीं उगाच आठवली पंढरी' असें वाटूं लागलें. एक दिवस सहज लक्षांत आलें कीं, आपल्या अत्यंत परिचयाचे दामलेस्वामी तूर्त येथेंच आहेत, तेव्हां त्यांना भेटावें म्हणून त्यांचा शोध करून त्यांच्या घरीं गेलों. त्यांची भेट झाली तेव्हां थोडें हायसें झालें.

## लोकमान्य टिळकांशीं भेट

स्वामींचेजवळ लो. टिळकांशीं भेटण्याची इच्छा मी प्रगट केली. त्यांचा व टिळकांचा बराच स्नेह होता. त्यांनीं माझा परिचय करून देणारें एक पत्र टिळकांना देण्यास मजजवळ दिलें. पण त्या वेळेस टिळक नुकतेच सुटून आले होते म्हणून त्यांचेवर व त्यांना भेटण्यास जाणाऱ्यावर शिपायांची सक्त नजर असे. माझें नांव पोलिसडायरींत न नोंदतां टिळकांची भेट कशी होईल, याचा विचार त्यांना पडला. नानासाहेब मोडक हे सी.आय्. डी. इन्स्पेक्टर होते. ते आमच्या गोविंदरावांचे मित्र असल्यानें माझाही त्यांच्याशीं परिचय झाला होता. तेव्हां त्यांच्या कानांवर मीं ही गोष्ट घातली; व त्यांनींही युक्तीनें गायकवाडवाड्यांत माझा प्रवेश करवून दिला. भैय्याच्या सांगण्यावरून

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

डाव्या बाजूचा दादर चढून सरळ वर गेलों, तों बाहेरच खुर्चीवर लोकमान्य एकटेच बसले होते. योगच चांगला होता.

त्यांची उघडी व श्यामवर्ण भव्य मूर्ति पाहून मी नमस्कार केला. त्यांनींही मोठ्या आदरानें उत्थापन देऊन मला खुर्चीवर बसविलें. दामले स्वामींचें पत्र त्यांनीं वाचून पाहिल्यामुळें माझेबद्दल मला कांहींच सांगण्याची जरूर राहिली नव्हती. पण पुढें कांहीं तरी बोलावें म्हणून अण्णासाहेब विजापूरकर येथें आहेत काय ?–कारण त्यांचा माझा काशींतला परिचय होता—म्हणून सहज मी विचारलें. तोंच ते उठून " दम धरा, मी तपास करून सांगतों," असें म्हणून दादर उतरून गेले. मी नको नको म्हणत असतांही ते खालीं ऑफिसमध्यें जाऊन तपास करून आले. " अण्णासाहेब तळेगांवीं आहेत," असें त्यांनीं मला सांगितलें. एवढ्या मोठ्या माणसाचा हा इतका सरळ स्वभाव पाहून मला फारच मोठें आश्चर्य वाटलें व कोठून अण्णासाहेबांचें नांव काढलें असें मला होऊन गेले. पुढें त्यांनींच गीतारहस्याची गोष्ट काढली. " माझ्या गीतारहस्याबद्दल काशीकर पंडितांचें काय मत आहे," असा त्यांनीं मला प्रश्न केला. मी उत्तर दिलें कीं काशींतील हिंदुस्थानी पंडितांना मराठी भाषा समजत नसल्यामुळें त्यांनीं तें वाचलेंच नाहीं. राहिले महाराष्ट्रीय पंडित. त्यांना संस्कृताशिवाय कोणत्याही इतर भाषांतील ग्रंथ वाचण्याचा कंटाळा व वेळही नाहीं. खरें बोलावयाचें म्हणजे आपल्या नेहमींच्या पठणपाठणांतील ग्रंथाव्यतिरिक्त दुसरे ग्रंथ वाचण्याची जुन्या पंडितांना आवडच नाहीं. गीतारहस्य त्यांनीं वाचलेंच नाहीं. मग अभिप्राय कसा देणार ! तो ग्रंथ आपण संस्कृतांत लिहिला असता तर त्याचें समालोचन झालें असतें.

"आपलें काय मत आहे," असा त्यांनीं प्रश्न केल्यावर मी म्हणालों. ग्रंथ तर सर्व दृष्टीनें अपूर्व झाला आहे, यांत तर कांहींच संशय नाहीं. पण रहस्याचा जो मुख्य भाग आहे कीं, ज्ञान झाल्यानंतरही ज्ञानी पुरुषाला गीतादेवी कर्म करण्याची आज्ञा करते, त्याबद्दल थोडें विचारावेंसें वाटतें. तें असें कीं, आज्ञा

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

या शब्दाचा अर्थ असा होतो कीं, तिचें पालन केलें तर फळ मिळतें आणि ती मोडली तर दंड होतो. ज्ञानी पुरुषानें गीतेची आज्ञा मोडून कर्म केलें नाहीं तर त्याला मोक्ष मिळणार नाहीं, असें आपलें मत आहे काय? लो. टिळक म्हणाले छेः ज्ञान झाल्यानंतर मोक्ष हा मिळणारच मग तो कर्म करो वा न करो. मग गीतादेवीच्या आज्ञेचें स्वारस्यच काय उरलें असें मी म्हणालों, त्यावर ते म्हणाले आज्ञा नाहीं विनंति म्हणा ना, मी म्हणालों ठीक आहे. विनंति मान्य करणें श्रीमंतांच्या मनावरची गोष्ट आहे. जनक, शंकराचार्य, रामदास यांनीं विनंति मान्य करून देशकार्यादि अनेक कर्में केलीं. शुकाचार्यादिकांनीं विनंति मान्य केली नाहीं. शंकराचार्यांचाही विनंतीबद्दल विरोध नाहीं. मग आपण संन्यासमार्गी म्हणून प्रच्छन्न टीका कां केली? त्यावर ते हसून म्हणाले " अहो शंकराचार्यांबद्दल मला अत्यंत आदर आहे व मला पक्कें माहीत आहे कीं, शंकराचार्यांचें मत व ग्रंथ यावचंद्रदिवाकरौ चालणार. गीतारहस्यच मागें पडेल. वल्लभ, रामानुज, माध्व यांच्या प्रमाणेंच मीही देशकालाला अनुसरून तो ग्रंथ लिहिला आहे. यथार्थ तत्त्वज्ञान न होता तत्त्वज्ञानाच्या आभासानें स्वतःला तत्त्वज्ञानी समजून निष्क्रिय झालेल्या संन्याशांकरतां तो ग्रंथ आहे. यानंतर आणखीही सामान्य गोष्टी करून त्यांनीं आपल्या स्वाक्षरीचें एक गीतारहस्याचें पुस्तक मला दिलें. मी तें पुस्तक अजूनही मोठ्या आदरानें जपून ठेविलें आहे. नंतर नमस्कार करून मी त्यांचा निरोप घेतला. काशींत गेल्यावर विश्वेश्वराचें दर्शन झाल्यानें जशी कृतकृत्यता वाटते, त्याचप्रमाणें पुण्यांत जाऊन लो. टिळकांशीं भेट होतांच मला वाटलें. नंतर पुण्यांत चित्तच लागेना. लगेच गोविंदरावांना भेटून दिवाळी पाहण्याकरितां मुंबईस जाण्याचें ठरवून मुंबईला गेलों. या खेपेस पुण्यांत प्रवचनाचा योग आलाच नाहीं.

## मुंबई

आम्ही आपली व्हिक्टोरिया, काकडवाडी आर्यसमाजासमोर वैद्य आपा-शास्त्री साठे यांचे घराजवळ उभी केली. त्यावेळेस ते तेथें भाड्यानें रहात असत. पुढें ईश्वरकृपेनें म्हणा किंवा त्यांच्या पराक्रमानें म्हणा तेंच घर त्यांनीं

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

विकत घेतलें. मी वर गेलों तों समोरच ते एका खुर्चीवर आसनमांडी ठोकून बसले होते. आपल्या दोन्ही हातांत रोग्याच्या दोन्ही हाताच्या नाडया एकाच वेळीं धरून डोळे झांकून, ते रोगपरीक्षा करीत होते. विशाल मिशा, नासाग्रात्-केशपर्यंतम् शुभ्र चंदनाचें उभें गंध, संपत्तीचें द्योतक म्हणून मस्तकावर चकचकणारें टक्कल, उघडेंबंब शरीर, सभोंवार प्रमथादिक गणांप्रमाणें रोग्यांची गर्दी, अशी ती द्विभुज शुंडारहित सुहृद्प्रेममय गणरायाची मूर्ति पाहून आनंद झाला. मीं "नमस्कार मास्तरसाहेब," म्हणतांच डोळे उघडून मजकडे त्यांनीं पाहिलें. त्याबरोबर त्यांचा आनंद गगनांत मावेना. "हो! हो! आपला भाऊ आला, ठीक आहे. कसं काय? अरे! याला कांहीं खावयाला द्या," असें मोठमोठ्यानें आपल्या कुटुंबाला सांगूं लागले. मलाही आपल्या घरीं आल्यासारखें वाटलें. स्नान, संध्या, भोजन झाल्यावर लहानपणच्या गोष्टी निघाल्या. आमची इंग्रजी शाळा, भाटेमास्तर वगैरे अनेक गोष्टी होऊन मोठाच हंशा पिकला. त्यांनींही काशी सोडून मुंबईंत येऊन आपला धंदा कसा भरभराटीस आणला, भिळकत कशी होत गेली वगैरे सर्व गोष्टी मन मोकळें करून सांगितल्या. मी व गोविंदराव तेथें मोठ्या आनंदांत होतों. आमच्या वहिनी (आप्पांचें कुटुंब) आम्हांला रोज नवीन नवीन जिनसा करून खायला घालीत. आमच्या आप्पांचे येथें तर नेहमीं पाहुण्यांची गर्दी असावयाचीच. रोगी व पाहुणे ह्यांच्यामुळें घरच्या मंडळींना क्षणभरही स्वस्थ बसावयास जागाच मिळत नसे आप्पाप्रमाणें वहिनींनाही पाहुण्यांचा कंटाळा नव्हता. त्यांचे पूर्वसंबंधाचे शालक प्रो. नानासाहेब बेहरे व काशींतील माझे व आप्पांचे स्नेही श्रीपादशास्त्री हसूरकर हे एकदां मुंबईस त्यांचेकडे आले होते. तेव्हां आप्पांचे व त्यांच्या कुटुंबांचे वर्णनपर श्लोक करून त्यांनीं भिंतीवर लिहिलेले होते ते सहज माझ्या दृष्टिस पडले. झालें! मलाही काव्याची स्फूर्ति झाली. लगेच खालील मराठी आर्या करून मीही त्या तेथेंच लिहून ठेविल्या.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

आर्या

येवो तुमच्या सदनीं, धन यश सौख्याब्धिचें सदा भरतें।
जेथें सद्धर्म वसे, तेथें होईल तें कसें सरतें ॥१॥
धन्वंतरीहि तुमचा आयुर्वेदाभिमान पाहून।
शाबास! बरें केलें आंग्लसभाजीं म्हणेल राहून ॥२॥
साध्वी तुमची गृहिणी, सद्भाग्यें लाधली तुम्हास भली।
शिणली न आतिथि पूजनिं द्रुपद सुतेचे परी मला गमली ॥३॥
नामें रूपें सुंदर तुमचा हा पुत्र दीर्घजीवि असो।
धन यश पांडित्यानें वैद्य समाजांत अग्रभागिं वसो ॥४॥

तात्पर्य, मुंबईच दिवस मोठ्या आनंदांत गेले. मुंबईची दिवाळी पाहून कोर्टाच्या सुट्या संपत आल्या म्हणून गोविंदराव सरळ काशीला निघून गेले; मीही तेथेंच कांहीं दिवस राहून कार्तिकी एकादशीकरितां पंढरपुरास गेलों. तेथें वासकरांचे फडांत ह. भ. प. विनायकबोवा साखरे यांचेकडे उतरलों. एकादशीस पंढरीनाथाचें दर्शन घेतलें व द्वादशीचे दिवशीं पारणे करून निघालों. काशींत असतांना नारायणमहाराजांनीं निमंत्रण केलें होतें म्हणून केडगांव स्टेशनवर उतरून त्यांच्या निवासस्थानीं गेलों. त्या वेळेस तें संस्थान नुकतेंच उदयास येत होतें. महाराजांचा एक लहानसा बंगला, दत्ताचें मंदिर, एक धर्मशाळा व थोड्या चाळी इतक्याच इमारती होत्या. मी महाराजांकडे जाऊन नमस्कार करतांच त्यांनीं मला ओळखिलें व आपल्याच बंगल्यांत ठेवून घेतलें. रात्रीं माझें ध्रुवचरित्रावर उत्तम रसभरीत प्रवचन झालें. तें ऐकून महाराजांना फारच आनंद झाला. पौर्णिमेच्या दिवशीं सत्यनारायण होता. म्हणून मला त्यांनीं ठेवून घेतलें. नंतर मी त्यांची आज्ञा घेऊन निघालों तों त्यांचे शिष्य चिंतोपंत जोगळेकर यांचेबरोबर पुण्यास येऊन त्यांचेच घरीं उतरलों.

पुण्याहून सज्जनगडावर श्रीसमर्थ दर्शनास जावें असें वाटलें; पण तेथें ओळखीचें कोणीच नव्हतें व चौंडे महाराजही त्या वेळीं वांईस होते. त्यांचे-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

बरोबर गडास जावें म्हणून पुण्याहून सरळ वांईला गेलों. मला पाहून चौंडे महाराजांना फार आनंद झाला. त्यांचे गोशाळेंत एक प्रवचन झालें. प्राज्ञ पाठशाळेंत जाऊन वे. शा. सं. नारायणशास्त्री मराठे यांना भेटलों. त्या वेळेस ती शाळा व स्वतः शास्त्रीबोवा यांना पाहून प्राचीन ऋष्याश्रमाची आठवण होऊन आनंद झाला. आतां तसें दृश्य राहिले नाहीं असें म्हणतात. दिवेकरशास्त्री त्या वेळेस तेथें विद्यार्थी होते. असो. चौंडे महाराजांना बरोबर घेऊन बैलगाडीनेंच मी साताऱ्यास गेलों. तेथें अण्णासाहेब अष्टपुत्रे वकील यांचे घरीं उतरलों. वकीलसाहेब सरळ स्वभावाचे व प्रेमळवृत्तीचे होते. त्यांची वकिलीही बरी चालत होती. ते महाराजांचे शिष्य असल्यानें महाराजां-प्रमाणें मलाही त्यांनीं आदरानें वागविलें. ते, मी व महाराज मिळून गडा-वर जाऊन श्रीसमर्थांचें दर्शन घेऊन परत साताऱ्यास आलों. दुसरें दिवशीं सकाळीं उठून पाहतों तों महाराज पहांटेसच उठून वांईस गेल्याचें वकील साहेबांनीं मला सांगितलें. “ मी ही जातों,” असें म्हणतांच “ तुमचे प्रवचन ऐकल्याशिवाय तुम्हाला मी जाऊं देंणार नाहीं.” असें मोठ्या निग्र-हानें वकीलसाहेब म्हणाले. “ मी प्रवचनकार आहे हें तुम्हाला कोणी सांगितलें?” असें मीही त्यांना दरडावून विचारलें. कारण त्या वेळेस माझा अस्सल पुणेरी गृहस्थी पोषाख असल्यामुळें मला सहसा कोणीच पुराणिक म्हणून ओळखत नसत, पुष्कळ वेळां मी कोणी तरी मामलेदार आहें अशीच कित्येकांची समजूत होत असे; व त्याचा फायदाही मला पुष्कळ वेळां प्रवा-सांत मिळत असे. आमच्या वकिलसाहेबांची ही समजूत तशीच झाली होती म्हणून त्यास मी तसें विचारलें. त्यावर त्यांनीं असें सांगितले कीं, पहांटे उठून जातांना महाराज मला सांगून गेले कीं, हे निजलेले गृहस्थ उत्तम प्रव-चनकार आहेत. तेव्हां प्रवचन ऐकल्याशिवाय यांना सोडू नको. म्हणूनच मी तुम्हांला तसें म्हटलें. मी हंसून प्रवचन सांगण्याचें कबूल केले. नंतर राममंदि-रांत हंसगीतेवर चार पांच दिवस प्रवचनें झालीं. तीं लोकांना फारच पसंत पडलीं गर्दी बरीच होत असे. जवळजवळ सगळा वकील—वर्ग (बाररूम) प्रवचनाला

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

येत असे. त्या वेळेस सातार्‍यास वकिलांची फारच उत्तम जूट असे. दादासाहेब करंदीकर, जोगळेकर, कवठेकर, कुबेर, नानासाहेब आगाशे वगैरे अनेक वकिलांनीं व श्रीमंतांनींही आपआपल्या घरीं माझीं प्रवचनें करविली. रा. ब. पारसनीस व रामचंद्र सदाशिव आठवले (हे त्या वेळीं तेथें प्रांत साहेब होते व पुढें सांगलीचे दिवाण झाले) हे दोघे तर प्रत्येक ठिकाणीं प्रवचनाला बिनचूक येत. त्यांना प्रवचनाचें वेडच लागलें होतें असें म्हटलें तरी चालेल. किती एक वेळां तर एकाच दिवशीं दोन दोन प्रवचनें करावीं लागत. त्या वेळेस सातारकरांनीं मजवर फारच लोभ केला. १५–२० दिवस तेथें मुक्काम होता. पुढें आठवलेसाहेब कर्‍हाडकडे फिरतीवर निघाले त्या वेळीं त्यांनीं बरोबर येण्याकरितां मला फारच आग्रह केला. इकडील प्रांत सहज दिसेल, या आशेवर मीही तें कबूल केलें व त्याप्रमाणें त्यांचेबरोबर कर्‍हाड, कोळे नरसिंगपूर, रेटरे, बाह्याचा मारुती, मालखेड वगैरे गांवें पाहून कर्‍हाडास परत आलों. नंतर ते कांहीं कामाकरितां सांगलीला गेले व मी पुनः कांग्रेस पाहण्याकरितां मुंबईस येऊन आप्पाशास्त्री साठे यांचेकडे राहिलों.

## नागपुरची मुहूर्तमेढ

काशींतील रामचंद्रबुवा चांदवडकरांचे धाकटे बंधु गोपाळबुवा हे मुंबईस रहात असत. त्यांना तेथें काशीकरबुवा म्हणत. त्यांचे शिष्य विनायकबुवा काळे, हेही उत्तम कीर्तनकार असून त्यांचेच जागेंत राहात असत. त्यांचा व माझा बराच परिचय होता. त्यांचे मित्र नागपुरचे प्रसिद्ध वैद्य भैय्याजी आचार्य हे त्या वेळेस तेथेंच होते. हे दोघेही नारायण महाराजांचे भक्त. मी सहज विनायकबोवांस भेटण्यास गेलों. तेथें भैय्याजींची गांठ पडली. नारायण महाराजांकडून माझें नांव त्यांचे कानावर गेलें होतें; म्हणून मला नागपूरास येण्याचा भैय्याजींनीं फार आग्रह केला. व मीही काशीला परत जातांना त्यांचेकडे जाण्याचें कबूल केलें. भैय्याजी नागपूरला निघून गेले. आणि नंतर मीही थोड्याच दिवसांनीं, भैय्यांना पूर्वी सूचनार्थ त्यांना तार करून मेलनें नागपूरास गेलों. स्टेशनावर भैय्याजी व कृष्णराव

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

नाईक हे मला उतरून घेण्यास आले होते. नाईकसाहेबांचे घरीं माझी राहण्याची व्यवस्था केली होती.

त्यांचे घरीं मी ७–८ दिवस होतों. त्या अवकाशांत निखालस मंदिरांत एक प्रवचन झालें. त्यावेळचे एक गृहस्थ सत्पुरुष मोतीबाबा जामदार यांचे समोर 'अध्यासभाष्यावर,' त्यांचे घरीं प्रवचन केलें. त्यांनीं फारच समाधान व्यक्त केलें. पुढें नागपुरांत बरींच वर्षें माझें राहणें होऊन जो उत्कर्ष झाला; त्याची ही मुहूर्तमेढच होती असें म्हटलें तरी वावगे होणार नाहीं. आणि त्या सर्वांचें यश मुहूर्तमेढ घालणाऱ्या भैय्याजी वैद्याशिवाय दुसऱ्या कोणाला कसें देतां येईल ? पुनः नागपुरांत येण्याकरितां भैय्याजी व नाईकसाहेब यांनीं मला फार आग्रह केला; व मीही येण्याचें कबूल केलें. नंतर नागपुरांतून निघून सुखरूप परत काशीला गेलों. घरीं सर्वांना आनंद झाला. आतां काशींतही मी पूर्वींपेक्षां जास्त लोकप्रिय होऊं लागलों. येथेंच माझा महाराष्ट्रांतील पहिला प्रवास संपला.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# माझा राजयोग

## नेपाळ यात्रा व आदिशंकराचार्यांचें प्रभुत्व

यावेळीं काशीचे स्टेशनमास्तर लक्ष्मणराव सोलापूरकर हे होते. ते नारायण महाराजांचे शिष्य असल्यामुळें आपल्या मुलीच्या लग्नाकरितां महाराजांना त्यांनीं बोलाविलें. अनायासें त्यावेळेस शिवरात्रही होती, म्हणून महाराज मुद्दाम आले. लग्न आटोपल्यावर काशींतच शिवरात्र करून नेपाळांत श्रीपशुपतिनाथांचे दर्शनाकरतां जावें असें महाराजांच्या मनांत आलें. महाशिवरात्रीशिवाय अन्य वेळेला नेपाळांत जाण्यास नेपाळ सरकारची परवानगी मिळत नाहीं. पण महाराजांकरतां म्हणून काशींतील नेपाळ दरबारच्या प्रतिनिधीकडून परवानगी मागवून तिकडे जाण्याचें निश्चित झालें. यावेळेस माझा व महाराजांचा चांगलाच परिचय झाला होता; म्हणून महाराजांनीं मलाही बरोबर घेतलें.

आम्ही जवळ जवळ २५-३० मंडळी होतों. काशींतील श्रीमंत काळेसाहेब, माधवराम संड, स्टेशन मास्तर सोलापूरकर, दक्षिणेतील माहीमच्चें बाजीराव दांडेकर, चाफेकर, गाडगीळ, चिंतोपंत जोगळेकर, अंजनाबाई वगैरे मंडळी बरोबर होती. त्यावेळेस बीरगंजापासून मोटार अगर रेलवे नसल्यानें आम्ही कांहीं वाट अश्ववाहन, तर कांहीं नरवाहन, मधून मधून स्वपाद वाहन, अशा रीतीनें मार्ग क्रमण करीत ५-६ दिवसांत नेपाळास पोहोंचलों. राजगुरु हेमराज पंडित यांच्या वाड्यांत आमची राहण्याची सोय सरकार कडूनच करण्यांत आली होती. आमची सर्व व्यवस्था दरबारकडूनच झाली होती. आम्ही श्रीपशुपातिनाथांचें दर्शन घेतलें. येथें एक विशेष सांगण्यासारखी गोष्ट म्हणजे त्यावेळेस राणा चंद्रसमशेर हे राजे होते. नारायण महाराजांनी श्रीपशुपति नाथांची पूजा स्वतः आपल्या हातांनी करण्याची इच्छा सरकारजवळ प्रकट केली. त्यावर सरकारांनी जें उत्तर दिलें तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. सरकार म्हणाले " महाराज! आपल्या इच्छेला माझी मुळींच हरकत नाहीं

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पण आपल्याच आदिशंकराचार्य महाराजांनीं असें आज्ञापत्र लिहून दिले आहे कीं, या मूर्तीला महाराष्ट्र ब्राह्मणाशिवाय कोणीही शिवूं नये. ती आज्ञा आम्ही राजे असतांना देखील पाळीत आलों आहों. पूर्वीच्या जंगबहादुर महाराजांनीं श्रीरामेश्वराला शिवून पूजा केली पण श्रीपशुपतिनाथांना ते शिवले नाहीं. अजून आम्ही कोणा नेपाळी ब्राह्मणाला देखील शिवूं दिलें नाहीं. श्रीपशुपतिनाथांच्या पूजेकरतां चार महाराष्ट्रीय ब्राह्मण व एक तैलंग ब्राह्मण असे पांच ब्राह्मण दक्षिण देशांतून आणावितों, व त्यांनाच शिवमंत्र देऊन पूजेकरितां ठेवितों. बाकी कोणालाच शिवूं देत नाहीं. " हें सरकारांचें बोलणें ऐकून श्री आचार्योबद्दल मला जें कांहीं वाटलें तें लिहितां येणें शक्यच नाहीं. असो. नारायण महाराजांनीही आचार्यांची आज्ञा शिरसामान्य करून स्वतः पूजा करण्याचा बेत रहित केला.

नेपाळ सरकारनें महाराजांची पादपूजा आपल्या राजवाड्यांत करून वस्त्रालंकारादि मिळून जवळ जवळ १५–२० हजारापर्यंत ऐवज दिला. बरोबरच्या सर्व मंडळींनाही शंभर शंभर रुपये दिले. अशा मोठ्या थाटानें पशुपतीची यात्रा करून आम्ही काशीला परत आलों. तेथून महाराज केडगांवीं गेले. या नेपाळ यात्रेमुळें तर मी महाराजांच्या प्रेमांतलाच झालों; तो इतका कीं, माझ्याशिवाय महाराजांना क्षणभरही चैन पडेना. पुढील चातुर्मास्याकरितां महाराजांनीं मला पत्र व माझ्याकरितां मनीआर्डर पाठवून केडगांवीं बोलाविलें; आणि मीही तावडतोब एकटाच तिकडे गेलों. तेव्हांपासून वर्षांतून महिना दोन महिने काशींत, बाकीचें माझे सर्व महिने महाराजांकडेच जात. अशा रीतीनें सन १९१६ पासून ते १९२४ पर्यंत म्हणजे सतत ९ वर्षें महाराजांच्या सहवासांत होतों. खरोखरीच हा काळ म्हणजे माझा शुद्ध राजयोगच होय. या काळांत अनेकानेक उत्तम गोष्टी घडल्या; पण त्या सर्व आठवणींत नसल्यानें त्यांपैकी ठळक ठळक गोष्टी जसजशा आठवतील तसतशा लिहिणार आहें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## मी केडगांवीं कां राहिलों

मी त्या वेळेला वेदांतशास्त्रज्ञ व उत्तम प्रवचनकार म्हणून दक्षिणेच्या प्रवासामुळें प्रसिद्ध झालों होतों. व तसेच आणखीही प्रवास केले असते तर पुष्कळच पैसा व स्वतंत्र मान मिळाला असता. पण तसें न करितां परतंत्र होऊन एकाच ठिकाणीं वर्षेंचीं वर्षें कां घालवितों, याचें माझ्या मित्रांना व सर्व सामान्य लोकांनाही आश्चर्य वाटे; व तसें ते मला विचारीतही. मीही मित्रांना नारायणमहाराजांकडे माझें राहण्याचें कारण सांगें; व त्यांचें त्यामुळें थोडेसें तरी समाधानही होई. पण सामान्य लोक आपल्या बुद्धीप्रमाणें कल्पना करीत. कोणी म्हणे महाराजांचे चमत्कार पाहून शिष्य झाला; तर कोणी म्हणत चैन करायला मिळते म्हणून शिष्य झाला. कोणी म्हणत महंताला एखादा शास्त्री आपल्या प्रतिष्ठेकरितां जवळ ठेवावा लागतोच, म्हणून महाराजानींच पुष्कळ पैसा देऊन यांना जवळ ठेवून घेतलें आहे. कोणी म्हणत हाच स्वार्थाकरतां त्यांना चिकटून राहिला आहे. वगैरे वगैरे अनेक कल्पना त्यांचे व माझे टीकाकार करीत. पण यांपैकीं एकही कारण खरें नव्हतें. याचें कारण असें कीं, मी काशींतच ' शाब्दे परेच निष्णात,' अशा गुरुचा शिष्य असून, वेदांतादि शास्त्रांचें उत्तम स्वध्ययन केलें होतें व प्रस्थान त्रयीचे पाठही सांगितले होते. सत्समागमही बराच झाला होता. यामुळें चमत्कार दिसले असते तरी मी भुलून शिष्य झालों नसतों. महाराजांचे प्रसिद्ध असलेले चमत्कारही पण मला ९ वर्षांत कधींच दिसले नाहींत. तत्त्वज्ञानाकरितां तर शिष्य होण्याचें कारणच नव्हतें. महाराज स्वतःच इतके भाग्यवान आहेत कीं, माझ्यामुळें त्यांची प्रतिष्ठा वाढणारी नाहीं. उलट त्यांचेमुळेंच माझी प्रतिष्ठा वाढे असें म्हटलें तरी चालेल. त्यांनीच मला दिलेला पोषाख अगदीं त्यांच्यासारखा जरी थाटामाटाचा होता तरी लोक कल्पना करीत इतका पैसा मात्र त्यांनीं मला दिला नाहीं. पहिल्या खेपेस त्यांनीं मला रु. ५०० दिले. नंतर प्रत्येक खेपेस काशीला जातांना १०० रुपये देत. उत्तम भोजन, उंची

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पोषाख, रेल्वेचा फर्स्ट क्लासचा प्रवास, वगैरे प्रकारचें सुख त्यांचे बरोबर भोगण्यास मिळालें, पण ती कांहीं घन प्राप्ति नव्हे. मी स्वतंत्र फिरलों असतों तर यापेक्षां जास्त धनप्राप्ति होण्याचा संभव होता. म्हणून स्वार्थाकरितांही त्यांना चिकटून राहण्याचें मला कारणच नव्हतें. मग तेथें कां राहिलों! त्याचें कारण असें कीं, मुळांतच माझा स्वभाव वडिलांप्रमाणें 'अकृत्वा परसंतापं अगत्वा खलमंदिरम्। अक्लेशयित्वा चात्मानं यदल्पमपि तद्बहु' या थाटाचा. आणि त्यांतल्या त्यांत अत्यंत मानी; कोणाचेंही हूं कीं चूं सहन व्हावयाचें नाहीं. कोणाजवळ कांहींही मागणें म्हणजे जिवावरचें संकटच वाटे. थाटमाटाची मनापासून हौस नसल्यानें त्याकरितां जरूरीपेक्षां जास्त पैसा मिळविण्यासाठीं दगदग करण्याची इच्छाच नव्हती. तीर्थयात्रा, देशपर्यटण वगैरे करण्याची इच्छा असे; पण त्याकरितां कष्ट सोसण्याइतकी ती तीव्र नव्हती. यासर्व स्वभावाला अनुसरूनच महाराजांचा सहवास असल्यानें तेथेंच रमलों.

महाराजांचा स्वभाव फारच प्रेमळ व उदार. स्नान, संध्या, सोवळें, ओवळें वगैरे नित्याचरण फारच कडकडीत. त्यांचा वैयक्तिक अनाचार किंवा दुराचार नऊ वर्षांत एकही दिवस माझ्या दृष्टीस पडला नाहीं. ते दत्ताचे अवतार आहेत, असें त्यांचे भक्त म्हणतात. परंतु ते अवतार नसले तरी ते जन्मांतरीचे पुण्यवान् व दत्तभक्त आहेत यांत मात्र संदेह नाहीं. वैदिककर्म, उत्सव, महोत्सव, ब्राह्मणभोजन यांची तर त्यांना भारीच हौस आहे. माझें पुराण ऐकतानां तर ते तद्रूपच होत. एकदां मी वाल्मीकि रामायण सांगत असतांना राम वनास गेले हा प्रसंग त्यांनीं ऐकला. त्या दिवशीं रात्रीं त्यांना जेवण जाईना व झोंपही येईना. एकसारखे डोळे भरून येत हें पाहून दुसरे दिवशीं मी तो भाग फार न लांबवितां "राम चित्रकूटावर जाऊन आनंदांत राहिले," असें सांगितलें; तेव्हां कोठें त्यांचें दुःख कमी झालें. माझ्या मनाच्या विरुद्ध तर ते एक दिवसही वागल्याचें मला आठवत नाहीं. जेवण-खाण, पोषाख, झोंप, भजन,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

फिरणें, खेळणें, देशाटन, तीर्थयात्रा वगैरे सर्व व्यवहारांत त्यांनीं मला आपल्या बरोबरीनेंच वागविलें. वय, उंची, चेहरेपट्टी, पोषाख वगैरे बाह्य-स्वरूपही जवळ जवळ त्यांच्या सारखेंच असल्यानें, प्रवासांत असतांना आम्हां दोघांपैकीं "महाराज" कोण असा लोकांना भ्रम होत असे.त्यांचे भक्त विनोदानें मला "डेप्युटी नारायण महाराज," म्हणत.या सर्व कारणांमुळें मीही आपले स्वतःचे शास्त्रीपण विसरून त्यांच्यांत विलीन झालों होतों. त्यामुळें श्रीमंत, संत, दत्तावतार, योगी वगैरे भावना न राहतां त्यांजविषयीं एक प्रेममय भावनाच मला उत्पन्न झाली. तूर्त मी योगायोगामुळें दूर असलों तरी त्यांना बरें नाहीं असें ऐकतांच पोटांत कळवळतें. त्यांचे जवळ असतांना रोज रात्रीं भारत, रामायण यांचें प्रवचन करीत असे.धारवाडचे कृष्णशास्त्री उपनबेटगिरी हे अतिशय विद्वान् व फारच प्रेमळ गृहस्थ होते. त्यांचा मुक्काम महाराजांकडे बराच होत असे. वाडीचे कवीश्वरशास्त्री तर साग्निसकुटुंब तेथेंच राहात. मी केव्हां केव्हां एकटा तर केव्हां केव्हां सकुटुंब सपरिवार तेथें राहात असें. तेथें असतांनाच आईला कोल्हापूर, वाडी वगैरे यात्रा करवून आणिल्या. श्रीमहाराजांमुळेंच फर्स्टक्लास मधून श्रीगोकर्ण महाबळेश्वर, श्रीत्र्यंबकेश्वर, श्रीघृष्णेश्वर, श्रीओंकारेश्वर, श्रीपशुपतीश्वर वगैरे अनेक यात्रा घडल्या. त्यांच्यामुळें अनेक श्रीमंत व अनेक राजेरजवाडे यांचाही माझा परिचय झाला.

त्याच काळांत मी काशींत असतांना माझें पहिले कुटुंब, ( सीता ) एक मुलगी होऊन (सन १९२१ जून) वटपौर्णिमेच्या आदल्या दिवशीं वारलें व नंतर मुलगीही वारली. सांगलीचे सदाशिवराव ओक हे नौकरीकरितां कलकत्त्यास रहात असत; त्यांची मुलगी इंदिरा इच्याशीं माझा दुसरा विवाह १९२२ मेमध्यें केडगांवीं झाला. आपल्या समोर लग्न व्हावें, या हौसेनें महाराजांनींच ओकांना रेल्वे खर्च दिला. याच वर्षी काशींत जाऊन हजार रुपये खर्च करून चि. रामचंद्र याची मुंज फाल्गुनमासीं केली. अशा रीतीनें हीं माझीं नऊ वर्षे अतिशय आनंदांत गेलीं. त्यांची गोड स्मृति मला अजूनही आनंद देते.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अलीकडे अलीकडे मात्र थोड्या चमत्कारीक गोष्टी घडूं लागल्या होत्या त्या भाविकालाच्या सूचक म्हणा किंवा पुढील अंकाची नांदी म्हणा; परंतु घडूं लागल्या हें मात्र खरें ! महाराजांच्या भोंवतालीं असलेल्या गंगाधरराव कामटीकर वगैरे श्रीमंत मंडळींना माझेवर असलेलें महाराजांचें प्रेम, त्यामुळें मला आलेलें महत्त्व, सहन होईनासें झालें. त्यामुळें ते कांहींना कांहीं तरी निमित्त करून माझा अपमान करण्याचा घाट घालीत; आणि वेळीं अवेळीं तसें करीतही. तरीसुद्धां महाराजांच्या प्रेमामुळें मी तिकडे लक्ष देत नसे. महाराज माझेवर प्रेम करतात पण माझा अपमान करणाऱ्या श्रीमंतांना कांहींच बोलत नाहींत, उलट त्याबद्दल उदासीन असतात, याचें मात्र मला वाईट वाटूं लागलें व मी ही उदास होऊं लागलों. "ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम् " असा माझा स्वभावच.

सन १९२४ च्या फेब्रुवारी महिन्यांत राजपुत्र श्रीमंत यशवंतराव होळकर यांचे लग्नाकरितां महाराजांबरोबर मीही इंदुरास गेलों. तेथें असतांना कांहीं दिवस राजवाड्यांत व कांहीं दिवस शंकरराव गांवढे यांच्या बंगल्यांत होतों. महाराजांमुळें राजकुटुंबाशींही माझा परिचय झाला होता. लग्न आटोपल्यावर महाराज मुंबईकडे गेले; व मी नेहमींप्रमाणें काशीस गेलों. पुढें नेहमींप्रमाणें केडगांवीं न जातां नागपुरासच गेलों व तेथेंच राहिलों.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

### अंक दुसरा

# नागपुरीं गमन व सुखदुःखांचा संमिश्र योग

## न जाने संसारः किममृतमयः किं विषमयः ।

नागपूरला जाण्याच्या अगोदर घरीं, आई, दादा, ताई, वहिनी, माझें नवीन कुटुंब, मुलगा चि. रामचंद्र, आणि माझे मामा माधवराव करमरकर यांचा मुलगा चि. कृष्णा व त्याची बायको इतकी मंडळी होती. कृष्णाची आई अगदींच लहानपणीं वारली व पुढें त्याचे वडीलही वारले. त्याचें संगोपन, विद्याभ्यास व लग्न, आमच्या घरींच झालें; व तें सर्व माझ्या ताई-नेंच अगदीं पोटच्या पोराप्रमाणें केलें. मी नुकताच काशींत आपल्या घरीं गेलों होतों, तरी महाराष्ट्रासारख्या नवीन चळवळ्या प्रांतांत, आणि त्यांतल्या-त्यांत " नित्यश्रीर्नित्यमंगलं " अशा श्रीनारायणमहाराजांच्या सहवासांत, बरींच वर्षें गेलीं असल्यामुळें, एक संस्कृत विद्या सोडून, बाकी सर्व नवीन बाबींत, मागें असलेल्या काशींत मला चैन पडे ना. स्नानसंध्या व पूर्वीप्रमाणें अध्यापन करीत बसावें, तर मन तसें करूं देई ना. पुनः केडगांवीं जावें तर महाराजांचे श्रीमंत शिष्य वेळोवेळीं माझा अपमान करतात, व महाराज तिकडे लक्ष देत नाहींत, म्हणून माझा मानी स्वभाव तिकडे जाऊं देई ना. अगदीं आरंभींच्या महाराष्ट्रांतील प्रवासाप्रमाणें पुनः प्रवास करावा, तर सतत नऊ वर्षें एका ठिकाणीं राहून भोगलेल्या सुखाची संवय, प्रवासाच्या आड येई. अशा परिस्थितींत काय करावें व कोठें जावें ! या विचारांत किती तरी दिवस घालविले. कांहींच ठरे ना व चैनही पडेना.

एक दिवस रात्रीं अशाच चिंतेंत झोंप लागली, व सकाळीं एक स्वप्न पडलें. भयंकर समुद्रांत मी पडलों आहें, त्याच्या त्या भयंकर लाटा सभों-वतीं उसळत आहेत. त्यामध्येंच मी पोहत आहें, तीर दिसत नसल्यानें घाबरून गेलों. तोंच त्या पाण्यांत मध्यंतरीं एक भव्य शुभ्र कांतिमान् पुरुष

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

उभा राहिलेला मला दिसला. त्याचेंपर्यंत मला जातां येई ना तेव्हां त्यानेंच आपला हात लांब करून, आपल्या जवळ मला ओढून उभें केलें. व "भिऊं नको येथें उभा रहा," असें सांगितलें आणि तो गुप्त झाला. नंतर मी जागा झालों तों उजाडलें होतें. स्वप्नाचा विचार करून "कोठें तरी माझी सोय देवानें केली आहे." असें वाटून समाधान वाटलें. "सूचकश्च हि" या ब्रह्मसूत्रांत, स्वप्नें हीं शुभाशुभांचीं सूचक असतात, असें वाचलें होतें. त्याचा प्रत्यय या स्वप्नानें आला. तेव्हांपासून कांहीं विशिष्ट स्वप्नांवर माझा विश्वास बसला. असो. परोक्ष-ज्ञान झालें तरी अनुभवाशिवाय तृप्ति नाहीं; ह्या न्यायानें स्वप्नानें थोडें समाधान वाटलें, तरी चैन पडे ना. नंतर थोड्याच दिवसांनीं नागपूरचे कृष्णराव नाईक काशीयात्रेकरितां आले. त्यांचेच घरीं १९१५ मध्यें मी उतरलों होतों. त्या परिचयामुळें ते मला भेटण्यास आले. कुशल-प्रश्नानंतर "आपण पूर्वीं कबूल केल्याप्रमाणें नागपूरला कधीं येणार? आणि केडगांवाप्रमाणें नागपुरलाही प्रवचनांचा लाभ कधीं देणार?" असें त्यांनीं विचारलें. "लौकरच येतों," असें मीही म्हटलें. ते गेल्यावर स्वप्नाचा उलगडा झाला व नागपूरलाच जाण्याचें मी ठरविलें. पहिल्या कुटुंबाप्रमाणें दुसरें कुटुंब सरळ स्वभावाचें नसल्यानें, माझे पश्चात् घरांत कुरु-पांडव संग्राम होण्याच्या भीतीनें तिला कलकत्त्यास तिच्या माहेरीं पोंचविलें. त्या वेळेस ती दोन महिन्यांची गरोदर होती. नंतर मी १०-१-१९२५ रोजीं नागपुरास जाऊन बुधवारींत नाईकसाहेबांचे घरीं उतरलों.

## चौदा वर्षांचें विहंगमावलोकन

१९२५ जानेवारीपासून १९३९ जानेवारीपर्यंतचा काळ म्हणजे बरोबर १४ वर्षें होतात; व मलाही पन्नास वर्षें पूर्ण होतात. हा चवदा वर्षांचा काळ मधून मधून बाहेर जात असला, तरी त्यांतील बराचसा काल नागपुरांतच गेलेला आहे. माझ्या आयुष्याचा हा काल, पूर्वींप्रमाणें एकरंगी नसून मानापमान, जन्ममरण, संपत्ति-विपत्ति, निंदास्तुति, लाभविनाश,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

LIBRARY
Jangamawadi Math, Varanasi
Acc. No. 3036



मानपत्रें व अपमानपत्रें इत्यादि सुखदुःखांच्या अनेक रंगांनीं रंगलेला आहे. या कालांत बऱ्याच घडामोडी झाल्या. सार्वजनिक कार्यांत माझा संबंध येऊन रागद्वेषांचे बरेच प्रसंग आले व गेले. जगाचा जसजसा अनुभव आला त्याप्रमाणें स्वभावपरिवर्तन किंवा स्वभावनिश्चिती होऊन जगाची पूर्ण ओळख झाली. ते प्रसंग असे:—

नागपुराहून निघून जाण्याबद्दल शिवीगाळीनें भरलेलीं अनेक निनांवी पत्रें मला आलीं. माझेविरुद्ध संघ स्थापन झाले. रस्त्यांतून जातांना माझी टवाळी होऊं लागली, माझेवर शक्यतों बहिष्कार घातला गेला. माझ्याविरुद्ध असलेलीं पत्रें "महाराष्ट्र" पत्रांत नेहमीं प्रसिद्ध होत. स्वतः उपसंपादक वर्गही माझेबद्दल उपहासात्मक मजकूर लिही. शेवटीं मला चांगलेंच ठोकावें; म्हणून सहीनिशीं आप-आपसांत पत्रव्यवहार झाला. परंतु कर्मधर्मसंयोगानें हा सर्व पत्रव्यवहार माझे हातीं लागला. त्यांत, प्रतिष्ठित म्हणविणारे, व माझेसमोर आल्यावर हात जोडून हसून नमस्कार करणारे, मित्राचें नातें जोडणारे, अशांचीं नांवें दिसलीं, तेव्हां तर मी थक्कच झालों. हा एवढा उपद्व्याप करण्याचें कारण काय? तर नागपुरांतील माझा उत्कर्ष! एक अत्यंत कठोर पण सत्य गोष्ट, मोठ्या जड हातानें व दुःखानें लिहाविशी वाटते. ती ही कीं, कर्णोपकर्णीच्या माहितीवरून, व माझ्या हातीं लागलेल्या पत्रांतील नांवें व सह्या, यांवरून हा सर्व उपद्व्याप करणारे ब्राह्मणच होते. त्यांमध्येंही विशेष भरणा शास्त्री, पुराणिक, हरदास कांहीं भिक्षुक व त्यांचे पृष्ठ-पोषक असे कांहीं सामान्य गृहस्थ, यांचा होता. बाकी माझे चाहते सर्व उच्च वर्गापासून तों अगदीं सामान्य वर्गापर्यंतचे सर्व लोकांत असल्यामुळेंच मी नागपुरांत टिकूं शकलों. या विरोधी कंपूंत, एकाही ब्राह्मणेतराचें नांव पाहण्यांत व ऐकण्यांतही आलेलें नाहीं. त्यांचा माझा मतभेद असूनही त्यांनीं केव्हांही माझा अपमान केला नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यांनीं माझा आदरच केला. याच कालांत माझ्या चाहत्यांकडून मला मानही मिळाला. कोणत्याही सभेंत गेलों तर मला पहिली खुर्ची मिळे. राज-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कीय, सामाजिक व धार्मिक लोकांनीं मतभेद असला तरी मला मानानेंच वागविलें. वस्त्रें बरींच मिळालीं; पैसाही माझ्या योग्यतेच्या बाहेर मिळाला. याच काळांत मुलगी जन्माला आली तर बायको व घरची कांहीं मंडळी दिवंगत झाली. कोणी निंदा केली तर कोणीं गोडवे गाइले. कोणी आदरानें घरांत राहण्यास बोलाविलें, तर कोणीं घर सोडून जाण्यास सांगितलें. कोणीं पैसे दिले तर कोणीं ते मध्येंच पचविले. चाहत्यांनीं वेदांत–वाचस्पति ही पदवी दिली तर विरोधकांनीं शिव्यांचीं निनांवी अपमानपत्रें व 'ज्ञानगर्दभ' ही पदवी अर्पण केली. सरकारनें महामहोपाध्याय पदवी दिली पण ती मीच सोडली. असे अनेक परस्पर विरोधी प्रसंग या चवदा वर्षांत आलें त्यांचे हें विहंगमावलोकन असें आहे.

अगदींच थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे माझे बाबतींत तर्कशास्त्रांतील त्रिविध हेतूंप्रमाणें नागपुरकरांचे केवलान्वयी, केवल व्यतिरेकी व अन्वय-व्यतिरेकी, असे तीन वर्ग पडतील. केवलान्वयी म्हणजे–माझा परिचय झाल्यापासून आजतागायत बऱ्या व वाईट सर्वच प्रसंगांत मला नेहमीं अनु-कूल असलेले लोक; त्यांत प्रामुख्यानें ह. भ. प. विश्वनाथबोवा ऊर्फ बाबुराव दक्षिणामूर्ति, हरीभाऊ ताम्हनकर, नानाजी बांडे, कृष्णराव साठे, माधवराव बांडे, चोरघडे मास्तर, गणपतराव ( न्हावी ), डॉ. हरदास, डॉ. परांजपे, चावजी तहसीलदार, गो. महेश्वपुरीजी, तेल्हारकर या व्यक्तींचा उल्लेख करणें भाग आहे. ही मंडळी नेहमींच घरीं येणारी असल्यामुळें, त्यांचीं नांवें चटकन लक्षांत आलीं; पण याव्यतिरिक्त आणखीही पुष्कळ लोक याच कोटींतले आहेत पण त्यांची नेहमीं गांठ पडत नसल्यामुळें, त्यांचीं नांवें सहज लक्षांत येत नाहींत. कांही लोक तर असे आहेत कीं त्यांनी माझें प्रवचन कधींच ऐकलेलें नाहीं; पण नेहमीं ते मला अनुकूलच असतात. उदा-हरणार्थ–लो. ना. बापूजी अणें. केवल व्यतिरेकी म्हणजे–परिचय झाल्यापासून आजतागायत, सर्वच प्रसंगांत नेहमीं प्रतिकूल असणारे लोक. असे लोक फारच थोडे. अन्वयव्यतिरेकी म्हणजे–समोर अनुकूल, तर मागें प्रतिकूल;

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

किंवा अगोदर अनुकूल पण मागाहून प्रतिकूल; आणि अगोदर प्रतिकूल पण नंतर अनुकूल,अशांचाच भरणा फार आहे. हें माझें लिहिणें, मजवर आलेल्या प्रसंगांचें तपशीलवार लिखाण वाचूनच पटणारें आहे.

## चौदा वर्षांचें सिंहावलोकन

माझ्या जाणत्या आयुष्यांत अनेक कामांनिमित्त अनेक प्रांतांत मी प्रवास केला. तेव्हां तेथील लोकांशीं परिचय होऊन जे अनेक अनुभव आले त्यांवरून हिंदुस्थान हा एक 'राष्ट्रपुरुष' आहे असें रूपक करून, महाराष्ट्र प्रांत हें त्याचें डोकें, मध्यप्रांत-वऱ्हाड हें हृदय व उत्तरहिंदुस्थान हे हातपाय असे अवयव कल्पिले तर तें कांहीं वावगें होणार नाहीं असें मला वाटतें. त्या त्या अवयवांचे विशिष्ट गुण, त्या त्या प्रांतांत ( प्रामुख्यानें ) आढळतात. बाकी एका प्रांताचे गुण दुसऱ्या प्रांतांत मुळीच आढळत नाहींत असें मात्र नाहीं. कमीअधिक प्रमाणांत सर्वच सर्व ठिकाणीं आढळतात. मी कादंबरीकार नसल्यानें यापेक्षां जास्त वर्णन करण्याचे भानगडींत पडत नाहीं. असो.

## नागपूर

महाराष्ट्र प्रांत राष्ट्रपुरुषाचें डोकें असलें तरी त्यांतील पुणेंशहर हा त्या राष्ट्रपुरुषाचा मेंदू आहे. त्याप्रमाणें मध्यप्रांतांतील नागपूर हें त्याच्या हृदयाचा मुख्य भाग आहे. पुणें ही जशी पेशव्यांची मुख्य राजधानी, तशीच नागपूर ही पूर्वी भोसल्यांची, तर आतां ती इंग्रजांची मध्यप्रांताची मुख्य राजधानी आहे. येथील लोकांची भाषा,अतिशय प्राचीन मराठी वळणाची व थोडी हिंदी मिश्रित आहे. तिची ठेवण मर्दपणाची किंवा थोडी उर्मटपणाची अशी आहे. त्यांच्या विद्येची किंवा धनाची परीक्षा, त्यांची राहणी किंवा आकार, यावरून कोणी करूं लागला, तर तो सपशेल फसणारच. नागपुरांतील लोक हृदयाचे कोमळ, संगतीला प्रेमळ, हाताचे सढळ, कामाला अढळ व बोलणारेही पण अघळपघळ असे आहेत. सर्वसाधारण लोक, बहुतकरून घरचे सुखवस्तु, धार्मिक व आचारसंपन्न आहेत. श्रवणाचे तर मोठेच शोकीन. कोणत्याही विषयांतील

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कां होईना, पण कोणी उत्तम गुणी दिसला कीं, त्याला उचलून धरून त्याचा मानसन्मान उत्तम रीतीनें करावयाचा, हें त्यांचें ब्रीदच. वाडीचे भारतीबुवा यांना रा. ब. कप्तानसाहेबांनीं घंगाळभर रुपये दिले असें ऐकिलें आहे. गुणी नसून नुसता कोणी थापेबाज किंवा ऐटबाज मनुष्य आला तर त्याची तितकीच दुर्दशा व्हावयाची. याचींही अनेक उदाहरणें ऐकिवांत आहेत. मोठमोठे विद्वान व दानशूर श्रीमंत लोक मी तेथें जाण्याचें अगोदरच परलोकवासी झाले होते. बाबासाहेब जामदार अगदींच आसन्नमरण होते. भाऊशास्त्री घुले हयात होते पण ते लौकरच वारले. कृष्णशास्त्री तैलंग यांचा मात्र थोडा सहवास घडला. त्यांचें तें भव्य व गोंडस शरीर, श्रीमंतीथाटाचा पोषाख व राहणी, गोड व श्लेषयुक्त शुद्ध मराठी भाषा, पुराण सांगण्याची सरस पद्धति या सर्वांची श्रोत्यांच्या मनावर चांगलीच छाप बसे. त्यांचा माझ्यावर बराच लोभ होता. पुढें लवकरच ते परलोकवासी झाले. या वेळेस पूर्वींपेक्षां सर्वच बाजूंनीं नागपूरला जरी उतरती कळा लागली होती, तरी पण " भिरी नासलें तरी जोंधळ्याच्या भावानें विकत नाहींत " या म्हणीप्रमाणें बाकीच्या देशांपेक्षां नागपूर सरसच होतें.

मी काशीहून आलों, तो बुधवारींत नाईकसाहेबांच्या घरीं उतरलों, हें पूर्वीं सांगितलेंच आहे.

## राजश्री कृष्णराव नाईक

रा. कृष्णराव नाईक हे नागपूरचे खानदानी श्रीमंत गृहस्थ. ते वर्णानें काळे, शरीरानें किडकिडीत, पोषाख अगदींच जुन्या चालीचा—बंदाचा काळसर लांब आंगरखा, नागपुरी पगडी, डावखोर उपरणें, अडकित्ता लोंबत असलेली भेणकापडाची हातांत चंची, कपाळावर दक्षिणेपासून उत्तरेपर्यंत लांबरुंद शोभणारें भव्य केशरी आडवें गंध. त्यांच्या दृष्टींत असा एक चमत्कार असे कीं ते पूर्वेकडे पाहात असले तर पश्चिमेकडे पाहात आहेत असा लोकांना भास होत असे. मनानें अत्यंत दयाळु, दातृत्वामुळें लोक त्यांच्याजवळ येत, तर लक्ष्मी त्यांच्यापासून दूर जात होती. ते कृष्णशास्त्री तैलंगांचे शिष्य असून

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

फारच कर्मठ असत, म्हणून त्यांना लोक थट्टेनें " भस्मासुर " म्हणत. ते राष्ट्रीय वृत्तीचे असून टिळकांचे भक्त होते. स्वभावाचे फारच भोळे असल्यानें कोणी आपली थट्टा करतो कीं स्तवन करतो हें त्यांना कळतच नसे. डॉ.मुंजे, अच्युतराव कोल्हटकर वगैरे मंडळींचें तें एक करमणुकीचें साधन असे. हरिदास पुराणिकांचे ते तर कल्पवृक्षच होते. त्यांचे घरीं मी आदरातिथ्य स्वीकारीत आनंदानें राहिलों.

ज्यांच्यामुळें मी पूर्वी नागपुरांत गेलों होतों ते भैय्याजी वैद्य मला येऊन भेटले. आजपर्यंत, जो माझा उत्कर्ष झाला, त्या सर्वांचें श्रेय भैय्याजींनाच आहे, इतकें सांगितलें म्हणजे माझ्यावर त्यांचें किती प्रेम आहे हें निराळें सांगावयासच नको. भैय्याजींमुळेंच, कृष्णशास्त्री तैलंग यांचेकडे माझें पहिलें प्रवचन झालें. तेथें " सत इदमुत्थितं " हा वेदस्तुतीचा श्लोक निर्गुण व सगुणपर सांगितला. ऐकण्यास महामहोपाध्याय ताह्मन, म. म. देहाडराय, गोपाळ आन्याजी, डॉ. नाखरे वगैरे रसिक व विद्वान मंडळी आली होती. प्रवचन ऐकून सर्वच प्रसन्न झाले. त्यांतल्यात्यांत " हरदासाप्रमाणें घोकीव पद्धतीचें हें प्रवचन आहे " असा म. म. देहाडरायांनीं टोमणा दिलाच. पण पुढें अनेक प्रवचनें ऐकून त्यांचा तो भ्रम दूर झाला व तेव्हांपासून ते माझे अनन्य श्रोते बनले. निखालस मंदिरांतही विराटपर्व सांगूं लागलों. या प्रवचनामुळें गांवांत थोडीथोडी कीर्ति पसरूं लागली.

## श्रीमंत जामदारांचे घरीं

### परसदननिविष्टः को लघुत्वं न याति ?

डॉ. नाखरे यांचेकडून माझें नांव ऐकून एक दिवस श्रीमंत यादवराव जामदार मजकडे आले. त्यांनीं तुलसीदास रामायणाचें मराठी भाषांतर पूर्वीच केलें होतें. पण त्यावर एखादें विवेचनात्मक पुस्तक लिहावें असें त्यांचे मनांत होतें. त्यांच्या माझ्या भेटींत, जीं अनेक संभाषणें झालीं, त्यावरून, आपला पुस्तक लिहिण्याचा उद्देश, माझ्यामुळें सफल होईल, असें वाटून त्यांनीं नाईकसाहेबांकडून परवानगी घेऊन मला आपल्या घरीं नेलें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

श्रीमंत जामदार हे नागपुरांतील एक खानदानी श्रीमंत आहेत. त्यांचें तालमीनें कसलेलें व गौरवर्ण कणखर शरीर, रुबाबदार चेहरा, मनानें मर्द व उदार, सखोल स्वभाव, काव्याचे रसिक, लेच्यापेच्या शास्त्र्याला सहसा दाद न देणारें त्यांचें शास्त्रीय ज्ञान, हंसून सहज लोकांची टर उडविणारी त्यांची भाषा, असें त्यांचें थोडक्यांत वर्णन करतां येईल. त्यांचे घरीं राहूनच मी एक पुस्तक लिहिलें. या पुस्तकाचें नांव, " मानसहंस ". त्यांतील विचारसरणी माझी व त्यांतील कांहीं भाग व भाषा त्यांची आहे.

हें पुस्तक लिहीत असतांनाच अनेक अडचणी आल्या. कलकत्त्यांत बाळंतपणाची सोय नाहीं, म्हणून श्वशुरांनीं कुटुंबास नागपुरास पाठविलें. मी त्या वेळेस एकटाच असल्यानें तेथेंही सोय होणें शक्य नव्हतें. म्हणून मुंबईस तिच्या बहिणीलाच लिहिलें. पण " माझा एकुलता एक मोठा मुलगा वारल्यानें माझें चित्त लागत नाहीं. इकडे पाठवूं नका," असें तिचें पत्र आलें. म्हणून पुनः कलकत्त्यास पत्र लिहिलें. त्याच वेळेस माझा पंचवीस वर्षांचा, नुकतेंच लग्न झालेला, शालक वारल्यानें, तिकडूनही नकारच आला. त्याच वेळीं, माझे घरींच लहानाचा मोठा झालेला, वीस वर्षांचा, व नुकतेंच लग्न झालेला, माझे मामांचा मुलगा कृष्णा वारल्याचें पत्र आलें. तो तर माझ्या मनाला जबरदस्तच धक्का बसला. त्यामुळें कुटुंबाला घरींही पाठवितां आलें नाहीं. झालें! सर्वच प्रकारें नाइलाज झाल्यामुळें शेवटीं पुनः नाईकसाहेबांकडेच १९२५ च्या जुलैमध्यें बाळंतपण होऊन मुलगी झाली. तिचें नांव सुशीला. या प्रसंगांत त्याच घरीं असलेल्या तापीबाई यांचें मला फारच साहाय्य झालें.

पुस्तक लिहिण्याचें काम थोडें शिल्लक असल्यामुळें, पुनः मी यादवराव जामदार यांचे घरीं राहण्यास आलों. या खेपेस मात्र, त्यांचे कुटुंबांत मिसळून न राहतां त्यांचे देवळांत स्वतंत्र बिऱ्हाड करून राहिलों. जागेला भाडें नव्हतें. हा काळ थोडाच कां होईना पण सुखाचा गेला. इतवारींत डोकीबुवांचे मठांत सकाळच्या वेळीं माझीं उपनिषदांचीं प्रवचनें सुरू झालीं. यापूर्वीं सकाळीं प्रवचनें सांगण्याची चाल तेथें नव्हती, तरी पण श्रोतृ-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

समाज मोठाच जमूं लागला. लांबून लांबून स्त्रीपुरुषांचे थवेच्या थवे येऊं लागले. पोटापुरतें धान्य व पैसा मिळूं लागला. रात्रींही निखालसमंदिरांत भागवत दशम स्कंधावर प्रवचन चालू झालें. तेथेंही भयंकर गर्दी जमूं लागली. घरींही दिवसभर विद्यार्थ्यांना शिकवीत असें. शिंदीचे अलोणी व विनायक पेणके हे दोन विद्यार्थी मजकडे शिकण्यास येऊन राहिले. पेणक्याला मी बरेच श्रम घेऊन शिकविलें. त्याला बसवून दिलेलीं पुराणेंही तो थोडीं थोडीं सांगूं लागला. याशिवाय बाबुराव दक्षिणामूर्ति, अग्निहोत्री बंधु, नानाजी धामणकर वगैरे मंडळी शारीरकभाष्य शिकण्यास येऊं लागली. आणखीही कांहीं कॉलेज विद्यार्थी शाकुंतल वगैरे नाटकें शिकण्यास येत. तेथेंच देवघरचे रामभाऊ सालपेकर यांचा व माझा परिचय झाला. ते स्वतःच्या महंतीमुळें शेती किंवा विशिष्ट संबंधीमंडळी यांचेशिवाय कोणाकडेही जात नसत. यामुळें त्यांच्याच विनंतीवरून ऐन दुपारच्या वेळेस त्यांचे घरीं जाऊन वेदांतसार, शारीरकभाष्य वगैरे ग्रंथ त्यांस मोठ्या प्रेमानें शिकवीत असें. मधूनमधून यादवरावांशीं रामायणचर्चा चालूच असे. मानसहंसाचें लेखन जवळजवळ संपल्यासारखेंच झालें होतें. रा. दप्तरी वकीलही मीमांसापरिभाषा, मजजवळ वाचीत असत. काशीहून आई व चि. रामचंद्र ही मंडळी ह्यावेळीं येथें राहण्यास आली होती. मोठमोठी मंडळी भेटण्यास येत असत. रा. बाबाजी लांडगे, को. व्यांकेचे अ. मॅनेजर, रा. तात्याजी बझलवार, अण्णाजी बोबडे वकील वगैरे मंडळी चांगलीच परिचित झाल्यामुळें त्यांच्या मंडळींतही मी केव्हां केव्हां जात असें. तात्पर्य तो काळ बराच सुखांत गेला. अशा रीतीनें सुखाचा अरुणोदय होतो न होतो तोंच पुनः आपत्तींचे ढग जमूं लागले.

## आपत्तींचे ढग.

या वेळेस बायकोला थोडथोडा क्षयाचा ताप येऊं लागला. तिला दप्तरींचें औषध चालू होतें. त्यांतच श्रीमंत जामदारसाहेबांनीं मला घरांतून जाण्यास सांगितलें. त्याचें कारण असें—

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

" विलायतशा," नांवाचे एक मुसलमान गृहस्थ यादवराव जामदारांचे गुरु होते. त्यांना सांईबाबा म्हणत. त्यांना ते देवाप्रमाणें प्रत्यक्ष घरांतसुद्धां मान देत, एवढें त्यांचें वर्णन केलें म्हणजे पुरे. मी त्यांना कधींच भेटलों नाहीं. यादवरावांनींही माझें मत ओळखून पुस्तक लिहिण्याचें काम थोडें शिल्लक असल्यानें, त्यांचा व माझा सामना होण्याचा प्रसंगही येऊं दिला नाहीं. माझी जेवणाखाण्याची व राहण्याची व्यवस्था स्वतंत्रच केली होती. पण सांईबद्दलचें माझें तुटकपणाचें वर्तन त्यांना पसंत नव्हतें असें मागाहून माझे लक्षांत आलें. एक दिवस यादवरावांचे मित्र गोविंदराव इंदूरकर व डॉ. नाखरे यांनीं माझेजवळ सांईची बरीच निंदा केली व मीही त्यांत बराच भाग घेतला. "मी सांईची निंदा करतों," असे नेमकें माझेंच नांव इंदूरकरांनीं यादवरावांना सांगितलें. पुस्तकही लिहून पुरें झालेंच होतें. झालें ! लगेच यादवरावांनीं माझ्याशीं बोलणें बंद करून द्वेषाला आरंभ केला. तेव्हां-पासून नागपुरांत हेंच माझा द्वेष करणारांचें केंद्रस्थान बनलें.

एक दिवस डॉ. नाखरे एकशेंपन्नास रुपये घेऊन मजकडे आले, व म्हणाले कीं, " जामदारसाहेबांनीं तुम्हाला पुस्तक लिहिण्याचे कामीं कबूल केल्याप्रमाणें, हे एकशेंपन्नास रुपये दिले आहेत, ते घ्या." हें ऐकून मला आश्चर्य वाटलें. कारण मी पुस्तकाकरितां मोबदला घेण्याचें केव्हांच कबूल केलेलें नव्हतें. फक्त स्नेहभावानेंच तें पुस्तक लिहून दिलें होतें. पण पुस्तक लिहिण्याचे अगोदर, जामदारसाहेब मला असें म्हणत असल्याचें मागाहून स्मरलें कीं, " या पुस्तकाबद्दल दीडशें रुपये तुम्हाला देण्याचें मी ठरविलें आहे." त्यावर " जामदारसाहेब ! मी या पुस्तकाबद्दल मोब-दला घेणार नाहीं. पण मी येथें तुमच्या आश्रयाला असल्यामुळें दीडशें काय पण जास्तीही रुपये वेळप्रसंग पडल्यास आपल्याकडून घेईन." असें मी म्हटलेलें मला नीट आठवतें. असो, " जामदारसाहेब माझ्याशीं बोलत नाहींत. तेव्हां हे रुपये मला नकोत," असें म्हणून मी ते रुपये परत केले. पुढें जामदारांनीं डॉ. नाखरे यांचे मार्फत साम, दान, भेद

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

व दंडभीति, या सर्व उपायांनीं रुपये घेण्याबद्दल पुष्कळ खटपट करून पाहिली, पण ती सर्व व्यर्थ गेली. त्याच संधानांत डोकीबुवांचे मठांत माझ्या प्रवचनांची समाप्ति झाली. त्या दिवशीं इंदुरकरांनीं शंभर व एका वांकड्या मानेच्या गृहस्थानें ( त्याचें नांव मला माहीत नाहीं) पन्नास, असे एकशेंपन्नास रुपये पोथीसमोर आणून ठेविले. "हे जामदारांनीं पाठविलेले रुपये आहेत तेव्हां परत घेऊन जा" असें भर समाजांत सांगतांच त्यांनीं ते परत नेले. झालें, मग काय विचारतां ! जामदारसाहेबांचा क्रोधाग्नि फारच भडकला. दुसरे दिवशीं सकाळीं, मी संध्या करीत असतां, सूर्याला एक अर्घ्य देऊन दुसऱ्या अर्घ्याचें पाणी हातांत घेतलें होतें, तोंच त्यांचा एक म्हातारा दिवाणजी येऊन म्हणाला कीं, " पहिल्या तारखेला आमचें घर खालीं करा, असें तुम्हांला मालकांनीं सांगितलें आहे." "पहिली तारीख कशाला पाहिजे, मी आतांच जातों. याच शब्दांची वाट पहात होतों," असें म्हणून हातांतील अर्घ्य, दिवाणजीच्या तोंडालाच देऊन ताडकन बाहेर येऊन उभा राहिलों. समोर एक रेंगी ( बैलगाडी ) दिसतांच तिच्यांत सर्व सामान—म्हातारी आई, आजारी बायको व सहा महिन्यांची मुलगी घालून सहस्रचंडीच्या देवळासमोर कल्याणी मास्तरांचे घरांत जाऊन, राहिलेलें अर्घ्य दिलें. जामदारांनीं अबोला केल्यापासून हें घर सोडावें लागणार, म्हणून अनेक घरें पाहतांना, हें रिकामें घर लक्षांत होतें. पण त्यांनीं जा म्हणेपर्यंत, घर सोडावयाचें नाहीं, असें मी पक्केंच ठरविलें होतें. असो. आतां मी जामदारांनीं अर्धचंद्र दिल्यामुळें, कल्याणी मास्तरांचे घरीं राहण्यास आलों. तेव्हांपासून श्रीमंतांच्या प्रेमावरचा माझा विश्वास उडाला. पुढें अनेक श्रीमंतांशीं माझा स्नेह झाला तरी पण त्यांच्याशीं जपूनच वागूं लागलों.

अजूनही माझें दुर्दैव संपलें नव्हतें. तेथें तर बायकोचा आजार फारच वाढून ती बिछान्याला खिळली. जामदारांचे रुपये न घेतल्यानें तें शल्य त्यांच्या हृदयाला टोंचतच होतें. बायकोची प्रकृति जास्तच बिघडत चालल्या-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मुळें "केडगांवीं महाराजांकडे गेलें तर मी बरी होईन" असें तिला वाटून तिकडे जाण्याबद्दल तिनें माझेमागें टुमणें लाविलें. त्या वेळेस जुन्या दत्त-मंदिरांत कठोपनिषदावरील प्रवचनही रंगांत चालू होतें. केडगांवीं जाण्याचा माझा बेत जवळ जवळ निश्चित झाल्यामुळें आई व चि. रामचंद्र यांना काशीस पाठवून दिलें. त्यामुळें मी अगदींच एकटा झालों. अशा परिस्थितींत एक दिवस रात्रीं नागपुर-अनाथविद्यार्थिगृहाचे चालक गोविंदराव चोळकर हे मजकडे आले. त्यावेळेस त्यांचा व माझा मुळींच परिचय नव्हता. मी त्यांना पाहिलेंदेखील नव्हतें. त्यांची ती भव्य गौरवर्ण मूर्ति माझे समोर येऊन बसली. कोण, कोठले वगैरे विचारल्यावर "तुमच्या नांवानें श्रीमंत यादवराव जामदारांनी एकशें पन्नास रुपये माझ्या संस्थेला दिले आहेत. त्याची ही पावती घ्या," असें म्हणून पावती फाडून देऊं लागले. "घर सोडलें तरी अजून जामदारांचा छळवाद संपत नाहीं," असें वाटून फारच क्लेश झाले, व कोठून यांची संगती केली असें वाटलें. मी गोविंदरावांना पूर्वीपासूनचा सर्व इतिहास समजावून सांगितला. तरी पण ते कांहींच ऐकेनात. "तुमचें कांहीं असो, माझ्या संस्थेला रुपये मिळत आहेत. म्हणून तुमच्या नांवेंच पावती फाडून देतों," असें राणा भीमदेवी आवेशानें ओरडून त्यांनीं पावती फाडलीच. त्यांचें ओरडणें ऐकून आजारी बायको घाबरली. "माझ्या नवऱ्याला हा मारणार," या भीतीनें ताडकन उठून येऊन त्यांचे पाय धरूं लागली. यमाच्या तडाक्यातून सत्यवानाला सोडविण्याकरितां यमाची प्रार्थना करणाऱ्या सावित्रीसारखी तिची मुद्रा पाहून मला हंसूं आलें व रागही आला. पावती टाकून चोळकर जाऊं लागले. त्या वेळेस मी त्यांना बजावून सांगितलें कीं "या वेळेस मी परतंत्र असहाय्य असल्यानें कांहींच करूं शकत नाहीं. पण हे रुपये माझे नांवें जर तुमच्या रिपोर्टांत दिसले, तर त्या दिवसापासून तुम्ही जबरदस्तीनें माझेकडून रुपये घेतले असा मी जन्मभर जागोजागीं प्रचार करीन." ह्या माझ्या बोलण्याकडे लक्ष न देतां चोळकर निघून गेले. पुढें डॉ. परांजपे, रा. नवाथे

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वगैरे मंडळींनीं चोळकरांना कांहीं सांगितलें असें ऐकतों. कारण, पुढें मी पुण्याहून नागपुरास येऊन संस्थेच्या वार्षिकोत्सवाला मुद्दाम जाऊन रिपोर्ट पाहिला, तों त्यांत रुपये १५० जामदार यांचेच नांवावर जमा झालेले होते. तें पाहून मला आनंद झाला. चोळकरांना भेटून त्यांना शाबासकी दिली. तेव्हांपासून गोविंदरावांचा व माझा स्नेह झाला. बायकोला हवा-पालट करण्याकरितां तें घर कायमचें सोडून अलोणी व पेणके या विद्यार्थ्यांना बरोबर घेऊन, मनांत नसतांनादेखील बायकोची इच्छा म्हणून मी केडगांवीं नारायणमहाराजांकडे गेलों.

## केडगांवीं

## कठिण समय येतां कोण कामास येतो?

केडगांवीं जवळ जवळ एक महिना मुक्काम झाला. तेथें औषधोपचार झाले. अंगाराधुपारा झाला, पण बरें वाटलेंच नाहीं. बरोबरचे विद्यार्थी मला सोडून नागपुरला निघून गेले. त्यांचें जाण्याचें कारण अजूनही मला समजलें नाहीं, पण ते नागपुरांत जाऊन माझ्या शत्रुपक्षाला मिळून माझ्या-विरुद्ध प्रचार करूं लागले. असो.

आतां तर केडगांवीं मी एकटाच राहिलों. बायको अत्यंत थकलेली. मुलगी अगदींच लहान व मलाही मूळव्याधीचा भयंकर त्रास. कोणी विचार-पूस करी ना. पण जवळच्याच खोलींत राहिलेल्या उमरावतीच्या श्री. वारूताई कागलकर, ना. बाबासाहेब खापर्डे यांचें कुटुंब सौ. मनुताई आणि सप-त्नीक गोपाळराव पेंडसे यांनीं मात्र शक्य तितकी आमची काळजी घेतली. त्यांचे ते उपकार केव्हांही विसरणें शक्य नाहीं. सर्वांत मोठ्या आश्चर्याची व माझ्या दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, महाराजांचा व माझा पूर्वीचा नऊ वर्षांचा संबंध लक्षांत घेतां, त्यांनीं जितकी काळजी घ्यावयास पाहिजे होती तितकी मुळींच घेतली नाहीं. उलट माझेकडे त्यांनीं अगदींच दुर्लक्ष केलें. त्यामुळें त्यांचा शिष्यवर्गही विचारीनासा झाला. "कठिण समय येतां

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कोण कामास येतो " हेंच खरें ! तेव्हांपासून अर्वाचीन संत व त्यांचा परमार्थ यांचें स्वरूप माझ्या पूर्ण लक्षांत आलें. असो.

## पुणें १९२६ जुलै

"वळ उठला पण संशय फिटला," या म्हणीप्रमाणें, बायकोला, केडगांवीं हालअपेष्टा सोसाव्या लागल्या खऱ्या, पण बरें होण्याचा तिचा संशय फिटला. म्हणून पुनः औषधोपचारासाठीं आम्ही पुण्यास आलों. आपत्तींत आप्तांच्या आश्रयास रहावें, म्हणून बायकोची सख्खी आत्या, (वासुदेवराव फडके यांचें कुटुंब ) त्यांचेकडे जाऊन, त्यांच्या प्रशस्त वाड्यांत, एकदोन खोल्या देण्याबद्दल मी पुष्कळच याचना केली. पण त्यांनीं धुडकावून लाविलें. स्वजनांची ही कथा तर बाकीच्या लोकांबद्दल बोलावयालाच नको. नंतर सदाशिव पेठेंत ब्रह्मे वकील यांचे वाड्यांत भाड्यानें जागा घेऊन राहिलों. त्या वेळेस केडगांवचे नाना बेलसरे व पेणचे नेने यांनीं आम्हाला बरीच मदत केली. तेथेंही डॉ. लोहकरे, डॉ. जोगळेकर, डॉ. जेजुरीकर यांचीं औषधें घेतलीं. त्यांनींही पूर्वीच्या ओळखीमुळें प्रेमानें औषधोपचार केले, पण गुण आला नाहीं. म्हणून पुनः नागपुरीं जाऊन निखालसमंदिरा-समोर भाऊजी मुंजे यांचे घरीं राहिलों.

काशीचे दत्तोपंत जोशी ( काका ) वाईकर, हे मुलाच्या नोकरीनिमित्त नागपुरांत जाऊन राहिले होते. त्यांचें कुटुंब माई, मुलगा शंभूराव, त्याची बायको इंदिरा व एक विधवा मुलगी सईताई, असें हें कुटुंब होतें. श्री. जोशी हे वॉकर रोडवर फडणीस पुऱ्यांत राहात होते. या कुटुंबाचा काशींतच आमच्या कुटुंबाशीं फारच घरोबा होता. मी नागपुरांत आल्यावर थोड्याच दिवसांनीं माईंची रस्त्यांत गांठ पडल्यावर त्या बायकोच्या समा-चाराकरितां घरीं आल्या. मी एकटा पाहून त्यांनीं बायकोला आपल्या घरीं नेऊन तिची उत्तम शुश्रूषा केली. सुशीचेंही संगोपन आपल्या मुलीप्रमाणें केलें. मीही त्यांचेजवळच वैद्य वऱ्हाडपांडे यांचे घरीं नऊ रुपये भाड्यानें जागा घेऊन राहण्यास गेलों.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वैद्य दामोदर गोविंद वऱ्हाडपांडे (दादाजी) हे शरीरानें धिप्पाड, सतेज, अत्यंत स्नानसंध्याशील, स्वभावानें उदार, अत्यंत प्रेमळ व भोळे, विद्याव्यासंगी व उत्तमोत्तम वैद्य होते. त्यांनींही अनेक औषधोपचार केले. पण बायकोची तब्येत दिवसेंदिवस थकतच चालली, म्हणून काशीहून आईला; व कलकत्त्याहून सासूबाईंना बोलाविलें. त्याप्रमाणें त्या दोघींही आल्या. माझ्या सासुबाई स्वतःलाच उत्तम वैद्य समजत असल्यानें, त्यांनीही बरेच उपाय केले, पण बरें म्हणून वाटलें नाहींच.

त्या वेळेस माझी स्थिति जाळ्यांत फसलेल्या वाघाप्रमाणें झाली होती. प्रवासांत बराच पैसा खर्च झाल्यामुळें पैशाची टंचाई; बायको बिछान्याला अगदींच खिळून राहिलेली; माझी प्रकृति प्रवासाच्या दगदगीमुळें व मूळव्याधीमुळें थकलेली. सासु व आई ह्या दोघीही विहिणी विहिणी माझ्या लहानशा जागेंत एकाच ठिकाणीं रहात असल्यानें, एका खोलींत कोंडलेल्या दोन मांजरीप्रमाणें त्यांची नेहमीं धुसफुस चाले. आईला वाटे माझ्या भाऊला शक्य तितके कमी श्रम पडावें. सासूला वाटे, आम्हां मायलेकींकरितां जांवयांनी शक्य तितके जास्त श्रम करावे व पैसा खर्चावा, असा तो लढा होता. मी उभयान्वयी असल्यानें माझी फारच कुचंबणा होत असे. एक माझी आई, तर एक बायकोची आई, आणि त्या दोघीही माझेकरितांच माझ्या घरीं आल्या असल्यामुळें मला घर सोडून पळूनही जातां येईना. ही झाली घरांतली परिस्थिति.

"घर फिरलें म्हणजे घराचे वांसेही फिरतात," या म्हणीप्रमाणें बाहेरची परिस्थितीही अशीच विसकटलेली होती. केडगांवाहून मध्येंच नागपुरांत परत आलेल्या माझ्या दोन विद्यार्थ्यांपैकीं विनायक पेणके यानीं, बाबुराव दक्षिणामूर्ति यांना माझेबद्दल, कांहीं तरी वेडेंवांकडें सांगून, त्यांचें मन माझ्याविषयीं दूषित केलें होतें. त्यामुळें पुण्याहून येऊन त्यांना भेटावयास गेलों; त्या वेळेस ते नीटसें बोलतच ना. त्याचें तर मला फारच वाईट वाटलें. "असें कां करतात," ह्याचें कारणही लक्षांत येईना. पुढें त्यांचें व माझें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

बोलणें झाल्यावर, त्यांचा गैरसमज दूर झाला व पूर्वींप्रमाणेंच ते प्रेम करूं लागले. पेणक्यानीं केळीबागेंत पुराण सुरू केलें. तो माझ्या शत्रुपक्षाला जाऊन मिळाला असल्यामुळें त्या सर्वांनीं त्याला उचलून धरलें. पूर्वींचे परस्पर विरोधी असले तरी, भिन्न भिन्न कारणामुळें माझे विरोधी बनलेले अनेक लोक, "तुल्यारिमित्रसंधी" या न्यायानें एकवटले. त्यांचें केंद्रस्थान जामदारांचें घर असलें तरी लहान लहान गट करून ते माझ्याविरुद्ध प्रचार व निनांवी पत्रव्यवहार करूं लागले.

माझ्याविरुद्ध पेणके हा पुराणिक म्हणून जसा पुढें केला, त्याप्रमाणें वेदांतप्रवचनांतही मला शह देण्याकरितां सहस्रचंडीच्या देवळांत, संध्याकाळीं श्रीनिवासशास्त्री हरदास यांचेकडून योगवासिष्ठ आरंभविलें. हा प्रवचनाचा उद्देश श्रीनिवासशास्त्री यांना खरोखरीच माहीत नव्हता. नाहीं तर त्यांनीं आरंभच केला नसता, असें मला माझ्या अत्यंत विश्वसनीय बातमीदारानें सांगितलें, आणि तें खरेंही वाटलें. कारण शास्त्रीबुवा विद्वान्, सुशील व गुणग्राही आहेत. पूर्वींपासून आजपर्यंत त्यांनीं माझी निंदा कधीं केलेली माझ्या तरी ऐकिवांत नाहीं. सहसा कोणाचीही ते निंदा करीत नाहींत. माझेवर तर ते फारच लोभ करतात व आदरही ठेवतात, असा अनुभव आहे. तात्पर्य, अशी बाह्य परिस्थिति होती. मला सुखासमाधानाची जागा एकच होती, ती म्हणजे माझें प्रवचन. त्या वेळीं पुनः मी डोकेबुवांचे मठांत गीताप्रवचन सुरू केलें, व तें रंगांत चालू झालें. मंडळी फारच जमूं लागली. मी पुण्याहून आल्यावर या सर्व आंतर्बाह्य विकट परिस्थितींत चांगलाच सांपडलों, पण डगमगलों मात्र नाहीं ही देवाची कृपा म्हणा किंवा प्रारब्धयोग म्हणा. या परिस्थितींतच "भाजलेल्यावर डागण्या," या म्हणीप्रमाणें आणखीही एका गोष्टीची भर पडून परीस्थिति फारच विकट झाली. ती गोष्ट अशी कीं मी एक दिवस रात्रीं सहज दक्षिणामूर्ति मंदिरांत बाबूरावांकडे गेलों.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# ह. भ. प. बाबूराव दक्षिणामूर्ति

बाबूराव दक्षिणामूर्ति हे आपल्या वडिलांबरोबर सन १९२३ च्या मार्गशीर्षांत काशींत आले होते, त्या वेळेसच त्यांचा व माझा साधारण परिचय झाला होता. नागपुरमध्यें बाबुरावांचे पितामह नानाजीमहाराज यांनीं श्रीदक्षिणामूर्तीचें एक सुंदर देवालय सन १८९९ त बांधलें. त्या गादीवर, ( नानाजी महाराज व त्यांचे चिरंजीव ह. भ. प. व्यंकोबा हरदास हे स्वर्गस्थ झाल्यावर ) बाबूराव बसले. दक्षिणामूर्ति संस्थानचे ते अधिपति असल्यानें, दक्षिणामूर्ति हें त्यांचें आडनांवच पडलें आहे.

बाबुरावांचें नांव विश्वनाथबोवा हरदास. ते जातीनें तैलंग असून स्वभावानें फारच प्रेमळ व निष्कपट आहेत. त्यांनीं अग्निहोत्र घेऊन चातुर्मास्यादि अनेक याग केले. ते उत्तम हरिदास असून प्रवचनकारही आहेत. देवळांत उत्सवमहोत्सव, ब्राह्मणभोजन, कथाकीर्तनें, प्रवचनें वगैरे अनेक कार्यक्रम नेहमीं चालतच असतात. बाबूराव म्हणजे कर्म, उपासना व ज्ञान यांचा गोड त्रिवेणीसंगमच आहे असें म्हटलें तरी चालेल. माझें प्रवचनही नेहमीं तेथेंच चालू असे. त्यांचा व माझा परिचय झाल्यापासून आजपावेतों माझेवरील त्यांचें प्रेम अव्याहत चालू आहे. माझ्या सुखदुःखांचे ते भागीदार असल्यामुळें मी नेहमीं त्यांचेकडे जातयेत असें. त्याप्रमाणें आजही गेलों अनेक गोष्टी करतां करतां, बाबुराव म्हणाले कीं, "गंगाधरबुवा काशीकर व विनायकबुवा काळे, तुम्हांला मागण्याकरितां येथें येणार होते," हें ऐकतांच मी हंसून म्हणालों कीं " छेः, असें होणें कधींच शक्य नाहीं. कांहीं तरी गप्पा मारतां. कारण मी महाराजांची निंदा कधीच केली नाहीं, व ते दोघेही माझे लहानपणापासूनचे मित्र आहेत." त्यावर बाबूराव म्हणाले, " विनायकबोवांचे हातचीं भैय्याजी वैद्य व कृष्णराव नाईक यांना आलेलीं पत्रें मी स्वतः पाहिलीं आहेत." हें ऐकून तर मी थक्कच होऊन आश्चर्यांत पडलों. कारण बाबूरावांवर विश्वास व गंगाधरबुवा व विनायकबुवा या दोघां

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

बुवांवरही मित्रत्वाचा पूर्ण विश्वास ! " ठीक आहे " असें म्हणून घरीं आलों पण चैन पडेना; म्हणून तेव्हांपासून त्या पत्रांच्या तपासाला लागलों.

परोक्षे कार्यहंतारं प्रत्यक्षे प्रियवादिनम् ।
त्यजेदेतादृशं मित्रं विषकुंभं पयोमुखम् ॥

आमचे नाईकसाहेब अर्धवटच असल्यामुळें तीं पत्रें घेऊन ते दुकानो-दुकानीं दाखवूं लागले. माझ्यापेक्षां त्यांचा ओढा विनाकबोवांकडेच जास्त होता. कारण ते नारायणमहाराजांचे शिष्य नसले तरी त्यांचे भक्त होते. म्हणून त्यांना माझा राग येऊन त्या पत्रांचा प्रचार त्यांनीं फारच नेटानें चालविला. त्यामुळें महाराजांची गृहस्थ शिष्यमंडळी माझे विरुद्धपक्षांत सामील झाली. मग काय विचारता " पूर्वं प्रधूमितो राज्ञां हृदयेऽग्निरिवोत्थितः" या श्लोका-प्रमाणें विरोधी पक्षाला जोर येऊन नागपूरचें वातावरण माझेविरुद्ध फारच संतत झालेलें मला आढळून आलें. मी पत्रांचा शोध करूं लागलों. सदर्हू पत्रांपैकीं एक पत्र एका दुकानावर नाईकसाहेब विसरले होते. तें माझ्या एका चाहत्यानें उचलून घेऊन आपलेजवळ ठेविलें होतें. त्याचा पत्ता मला लागल्या-वर मी तें त्याजपाशीं मागितल्यावरून पोलिसकडे न देण्याच्या अटीवर त्यांनीं तें मला दिलें. नागपूरचा हा थोडासा मध्यमवर्ग खेरीज करून बाकी सर्वच लोक माझे चहाते व प्रेमी होते. त्यामुळें सर्व पत्रव्यवहार व माझ्याबद्दलचीं गुप्त खलबतें मला कळत. व त्याचप्रमाणें निनांवी पत्रांचे लेखक, त्यांचें स्थळ, काळ वगैरे सर्व कांहीं मला सहज कळे. ही देवाची मर्जी ! असो. त्या पत्रांतील त्यांचा खासगी मजकूर गाळून माझ्याबद्दलचा मजकूर जशाचा तसाच येथें देतों. कारण तें पत्र दिलें नाहीं तर अजूनही या गोष्टीवर कोणी विश्वास ठेवणार नाहीं. तें पत्र असें:—

" मी मध्यंतरीं नागपुरास येणार होतों. तें कारण म्हणजे शास्त्रीबुवांची विशेष विद्वत्ता, वेदांतवाक्पटुता, विद्वत्तेमुळें नागपूरचें आक्रमण करून सर्वस्वी झालेली विद्वद्गुरुता ही इतक्या शिखरावर पोंचली की पुण्यास सदाशिव पंठेंत

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अहो यांचे वाड्यांतील विन्हाड सोडून नागपुरास येतांना रा.रा. नाना बेलसरे यांचेजवळ केलेली ती समर्थांची निंदा ती इतकी कीं, त्या शब्दांचा पुनरुच्चार करणाराही महापापी होय. तात्पर्य, अशा निमकहराम अधमाची मैत्री सर्वस्वी त्याज्य इतकेंच नव्हे तर त्याचा प्रत्यक्ष सक्रिय साक्षात्कार देण्याकरितां प्रियबंधु गंगाधरबुवा व मी तेथें येऊन आपल्या सर्व श्रीनारायणभक्तांच्या साहाय्यानें आमच्या प्रक्षुब्ध मनाची शांती करणार होतों व त्यासाठींच येथून श्रीमंत प्रियबंधु गंगाधररावजी ( कामटीकर ) नीं श्री. रा. रा. भाऊसाहेब भिडे यांना सर्व हकीगतीचें पत्र धाडून योग्य प्रायश्चित्त वेळींच देऊन श्रीसद्गुरुनिंदा-श्रवण-पातकांतून मुक्त व्हावे. इतका द्राविडी प्राणायाम व आपणां सर्वांस तसदी देण्याचें कारण इतकेंच कीं निंदक येथें न येतांच परस्पर पुण्याहून नागपुरास गेला म्हणून. जर इकडे मोर्चा फिरता अगर पुण्यासच ३–४ दिवस राहता तर योग्य सत्कार स्वीकारूनच तिकडे येता व मग आपल्यास सत्कार निराळा करावा लागला नसता; पण ( जें होणार चुकेच ना, विधिवळें, बेटा रडो ना रडो ) असो. सर्व मजकुरावरून विचार करून प्रियबंधु भाऊसाहेब भिडे यांना हें पत्र दाखवून त्यांच्या सहाय्यानें चिरस्मरणीय, सनिंदक सत्काररूप प्रायश्चित्त देऊन आम्हांस कळवावें म्हणजे आम्ही पुनीत होऊं. चातुर्मास्यामुळें श्रीसेवा सोडून मला येतां येत नाहीं. नाइलाज आहे. मात्र हें पत्र पोंचल्याचें उत्तर धाडावें. भाद्रपदासाठीं वैद्यराज (भैय्याजी) व मास्तरसाहेब (मेहेंदळे बुकिंग क्लार्क) दोघांनींही अवश्य यावें म्हणजे प्रत्यक्ष भेटीअंतीं सर्व पोट मोकळें होऊन मला आनंद होईल. विशेष कांहीं लिहीत नाहीं. मात्र हें पत्र व्यवस्थितपणें विचारपूर्वक वाचून शिल्लक ठेवूं नये. श्रीनाईकसाहेब, भाऊसाहेब भिडे यांनाही पत्रें धाडलीं आहेत. कळावें लोभ असावा ही विनंति.

आपला

( सही ) विनायक गजानन काळे, हरिदास.

पो. बेट नारायणमहाराज जि. पुणें ता. ८।८।१९२६.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

साधारण मंदबुद्धींच्या नारायणभक्तांना राग येण्यासारखाच या पत्रांतील मजकूर आहे यांत संशय नाहीं. हें पत्र अजून मीं ठेविलें आहे. हें पत्र प्रत्यक्ष वाचून तर मी थक्कच झालों. तेव्हांपासून " खरें मित्रत्व या जगांत नसून, चालू असलेलें मित्रत्व म्हणजे नुसतें थोतांड आहे " अशी मनाची दृढ समजूत झाली व ती अजूनही तशीच कायम आहे.

हें पत्र तर स्वतः हरदासबुवांचेंच असल्यामुळें, हरदासी गोष्टीप्रमाणें असंबद्ध, उथळ, फारकट, विचारशून्य लिखाणाचा तो एक नमुनाच आहे, असें म्हटलें तरी चालेल. कारण विनायकबोवा हे लहानपणापासूनचे माझे मित्र होते. गंगाधरबोवांशीं स्वभाव न जुळल्यामुळें कधीं कधीं भांडणें होत. पण विनायकबोवांशीं नुसता वाददेखील झालेला मला आठवत नाहीं. ते स्वभावानें गरीब, शांत, समंजस व प्रेमळ असे आहेत. मग त्यानींच आपल्या सहीनें असें पत्र कां लिहावें! याचेंच मला राहून राहून आश्चर्य वाटलें. गुरुनिंदा सहन न झाल्यामुळें माफी मागण्याचा त्यांनीं प्रयत्न केला म्हणावें, तर त्यांच्या गुरूची म्हणजे नारायणमहाराजांची धडधडीत खरीखोटी निंदा करणारे लोक, पुण्यांतच नव्हे, तर सर्वत्रच भरले आहेत. हें त्यांना माहीत असतांना, त्यांचेकडे मोर्चा न फिरवितां एक गरीब ब्राह्मण व त्यांचा जिवलग मित्र, याच्याकडेच तो कसा फिरला! याचेंही नवल वाटलें. त्यांतूनही नुसतें शिव्यांचें पत्र नसून धडधडीत माफी मागण्याचा मजकूर असलेलें पत्र आपल्या सहीनिशीं पाठविणें व त्यांत इतरांचींही नांवें गुंतवून, कायद्याच्या कक्षेंत जाऊन, " स्वयं नष्टः परान्नाशयति " ही आत्मपर-घातकी बुद्धि, त्यांना कशी सुचली? " गुरुनिंदाश्रवणजन्य " पातकापेक्षां मित्रहत्या व ब्रह्महत्या यांचें पातक कमी आहे असें त्यांनीं कोठें वाचलें आहे कीं काय! बेलसरे यांच्यावर विश्वास ठेवून खरोखरच मी निंदा केली, असें त्यांना वाटलें होतें, तर मित्र या नात्यानें त्याबद्दल त्यांनीं मजजवळ तपास करावयास पाहिजे होता. तो त्यांनीं कां केला नाहीं! नागपूरचे सर्वच लोक नारायणमहाराजांचे भक्त नाहीत. मूठभर भक्त, अफाट जन-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

समुदायाच्या वक्त्याच्या कसे मारूं शकतील ! ही कल्पना त्यांना कशी शिवली नाहीं ! पत्रांत ज्याचीं नावें त्यानीं लिहिलीं आहेत, त्यांचें वजन नागपुरांत किती आहे, हें त्यांना कसें कळलें नाहीं ! स्वतः ( विनायकबोवा ) देखील नागपुरांत येऊन तंबोरा वाजविण्यापलीकडे काय करणार होते ? वगैरे वगैरे अनेक गोष्टी या पत्रावरून विचार करून सुचण्यासारख्या आहेत. तात्पर्य, हा सर्वच व्यवहार "जय जय रामकृष्ण हरि" या थाटाचाच झाला, एवढाच त्यावरून सारांश निघतो. असो.

पत्रांत "न ऐकण्यासारखी निंदा केली," एवढेंच लिहिलें पण काय निंदा केली हें लिहिलें नाहीं. मीही विचार करूं लागलों कीं, मी निंदा तरी काय केली; पण तें कांहींच लक्षांत येई ना. शेवटीं विचार करतां करतां ब्रह्मे यांचे वाड्यांतील बेलसरे यांच्याशीं जें माझें बोलणें झालें होतें तें आठवलें. त्याचा केडगांवच्या भगवद्भक्त मंडळींनीं द्वेषानें पराचा कावळा कसा केला हें लक्षांत येऊन रागाबरोबर हसूंही आलें. तेव्हांपासून **मनुष्य हा संसारांत नसून अग्निकुंडांत बसला आहे,** असें वाटूं लागलें. बेलसरे यांच्याशीं बोलणें झालें तें असें.

मी पुण्याहून निघताना बेलसरे मला म्हणाले कीं, मी तुम्हांला माझे हितकर्ते समजून, मी एक विचार केला आहे तो तुमच्या कानावर घालतों. योग्य तो सल्ला तुम्ही द्यावा. मी आपली सबंध शेती श्री. नारायणमहाराजांना देण्याचा विचार केला आहे, त्याबद्दल तुमचें मत काय ? त्यावर मी म्हणालों कीं, "माझें मत जर विचाराल तर तें असें आहे कीं, सबंध शेती देऊन टाकण्याचे ऐवजीं त्याचें उत्पन्न द्यावें; पण जमीन देऊं नये. तेथें संस्थानचा कारभार असल्यामुळें आपल्या मुलाबाळांना कांहींच शिल्लक राहणार नाहीं. महाराज औदुंबराच्या खोडांतून निघाले, हा दत्ताचा अवतार आहे वगैरे गोष्टींबद्दल तुमची श्रद्धा असली, तरी तशी सर्वांचीच नाहीं. महाराजांच्या आशीर्वादानें सर्व गोष्टी घडतात, ही केवळ श्रद्धा आहे. खरें म्हटलं, तर प्रारब्धानेंच सर्व गोष्टी घडत असतात. आशीर्वादहि पण प्रार-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्यांमुळेंच फलद्रूप होतात. तसें नसतें तर माझी बायको दोन महिने तेथें होती, व तिला रोज अनेक आशीर्वादही मिळत असत, मग ती कां बरी झाली नाहीं ?" इतकेंच बोलल्याचें पूर्णपणें मला आठवतें. यापेक्षां जास्त कांहींही बोललों नव्हतों. वेलसरे यांनीं जाऊन इतकेंच सांगितलें कीं, कांहीं जास्त सांगितलें हें मला माहीत नाहीं; व पत्रांतही विनायकबोवांनीं कांहीं आणखी उल्लेख केलेला नाहीं. कांहींही असो; एवढें निमित्त करून पूर्वींच माझ्या मानसन्मानामुळें प्रच्छन्न द्वेष करीत असलेल्या गंगाधरराव कामटीकर, भिड्यांच्या माई वगैरे मंडळींनीं हें प्रकरण विकोपास नेलें. आणि विनायकबोवांना मात्र चांगलेंच तोंडघशीं पाडलें. या प्रकरणाकरितां विनायकबुवांचे " प्रियबंधु श्रीमंत गंगाधरराव कामटीकर, " यांनीं जरूर तर ५,००० रुपयांपर्यंत खर्च करण्याचेंही ठरविलें होतें असें तेथीलच माझ्या एका स्नेहानें मला मागाहून काशींत भेट झाल्यावर सांगितलें. खरेंखोटें दत्ताला माहीत ! सारांश, पहिल्या आपत्तींत ही दुसऱ्या आपत्तीची भर पडली. पण या पत्रांचा कांहींएक उपयोग झाला नाहीं, ही गोष्ट निराळी. पुढें ईश्वराच्या कृपेनेंच सर्व वातावरण आपोआप शांत झालें. हें पत्र माझेजवळ आहे असें विनायकबोवा वगैरे सर्व नारायणभक्तांना समजल्यामुळें, सर्व मंडळी आपल्या ठिकाणींच गारेगार झाली. तें पत्र माझेपासून घेण्याकरितां, विनायकबोवांच्या चाहत्यांनीं अनेक प्रयत्न केले; पण तें मी त्यांस साधूं दिलें नाहीं. त्या पत्रामुळें नागपुरांत माझें तर कांहींच वावगें झालें नाहीं; पण विनायकबोवांचें नागपुरांत येणें मात्र आजतागाईत घडून आलें नाहीं. त्यानंतर लवकरच गंगाधरराव कामटीकर अपमृत्यूनें केडगांवींच वारले. असलीं कृष्णकारस्थानें साधुसंतांचें पवित्र स्थान म्हणून गणल्या गेलेल्या केडगांव बेटांत व्हावींत हें पाहून

> " सांगावें, कवण्या ठाया जावें । कवणातें स्मरावें ।
> कैसें काय करावें । कवण्या परि मी रहावें । "

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

हें पद आठविल्याशिवाय रहात नाहीं. पुढें मी सहस्र सत्यनारायणाचे वेळीं ( १९३६ ) केडगांवीं गेलों होतों. बरोबर पत्रही होतें. त्या वेळेस विनायकबोवांनीं पत्राबद्दल दिलगिरी प्रदर्शित केली असती, तर तें पत्र तेथेंच मी फाडून टाकलें असतें; व हें कठोर प्रकरण लिहिण्याचा प्रसंग मजवर आला नसता. पण " जें होणार चुकेंच ना, विधिबळें, बेटा रडो ना रडो " असें विनायकबुवांचेच शब्दांत मलाही म्हणण्याची पाळी आली.

## आपत्तींचे ढग वितळूं लागले.

या पत्रामुळें नागपुरचे माझे चाहते गरम झाल्यामुळें नागपूरचे विरोधक थोडे थंडावले. बायकोला बरें वाटेना म्हणून, तिच्या आईनें मुलीसह तिला कलकत्त्यास नेलें, बायकोला वाईट वाटूं नये म्हणून तिचे सर्व दागिने तिच्याबरोबरच मी दिले. सोनें, चांदी, वस्त्रें मिळून जवळ जवळ दोन हजारांचा ऐवज होता. कलकत्त्यास गेल्यावर दुखणें विकोपास गेलें, म्हणून मुलीला ( सुशीलेला ) परस्पर काशीस सासूबाईनीं पोंचतें केलें. नंतर चैत्र शुद्ध ५ तारीख ४–६–१९२७ रोजीं कुटुंबानें इहलोकची यात्रा संपविली. तिच्या मृत्युनंतर कांहीं तरी निमित्त सांगून दोन हजारांचा ऐवज श्वशुरांनीं ठेवून घेतला. नागपूर येथील माझे वकीलमित्र कै. अण्णाजी बोबडे यांनीं कोर्टामार्फत इलाज करून दागिने परत घेण्याकरितां, मला पुष्कळ आग्रह केला. पुरावाही भरभक्कम होताच. पण " पैशाकरितां कोर्टासमोर उभें राहण्याची माझी इच्छा नाहीं, " असें मी स्पष्टपणें सांगितलें. दोन वर्षें सतत आजारी असलेल्या बायकोच्या सेवेनें इतका त्रस्त झालों होतों कीं, **"बायको म्हणजे दुखणें,"** असेंच समीकरण झालें होतें. आणि त्यामुळें पुनः लग्न करण्याकडे माझें मनच वळलें नाहीं.

आजपर्यंत माझ्या व बायकोच्या आपत्तीचा बोजा माझ्या एकट्यावरच पडत असे. पण आतां तो बोजा कमी होऊन, माझाच बोजा माझेवर राहिला. "म्हशीचीं शिंगें म्हशीला जड नाहींत," या म्हणीप्रमाणें माझ्या आप्तांचें मला

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कांहींच संकट वाटेना. आतां कोणताही प्रसंग आला तरी माझ्या मरणानें सर्वस्वी नाश पावणारी व्यक्ति नाहींशी झाल्यामुळें अगदीं निष्काळजी झालों, व आनंदानें राहूं लागलों. आतां पूर्वीचे आपत्तीचे सर्व ढग वितळून थोडे थोडे सुखसमाधानाचे वारे वाहूं लागले. तरी पण मधून मधून थोडे थोडे दुःखाचे चटके लागत होतेच. बायकोच्या मरणानंतर दुसऱ्या वर्षींच वडील बंधु वारले. त्यानंतर दोन वर्षांनीं आई व तिच्या दुसऱ्या वर्षींच सून म्हणजे चि. रामचंद्राचें पहिलें कुटुंब वारलें. या वेळेस तर स्वजनांच्या मरणानें पाठच पुरवली होती, असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यामुळें वरचेवर काशीस जावें लागत असे.

## सुखाचे वारे वाहूं लागले

नागपुरचे घरमालक दादाजी वऱ्हाडपांडे हे स्वतः विद्याव्यासंगी असल्यामुळें घरीं शारीरभाष्य, न्याय, मीमांसा, पंचदशी वगैरे ग्रंथाचे पाठ मी सांगूं लागलों. पाठाला बरीच मोठी मोठी मंडळी येऊं लागली. त्याचवेळीं सर माधवराव देशपांडे, चावजी तहसीलदार, डॉ. हरदास, श्री. बुटीसाहेब, सरदार गुजरसाहेब वगैरे बड्या बड्या मंडळींशीं माझा चांगलाच परिचय झाला. त्यांच्या बैठकींत मी करमणुकीकारितां बसूं लागलों. डोकीबुवांचे मठांत प्रवचन चालू होतेंच. तेथें डॉ. परांजपे, डॉ. चोळकर, डॉ. दळवी, म. म. बापूजी ताम्हनकर, म. म. रा. ब. देशाडराय वगैरे मोठी मोठी मंडळी नियमानें येत असत. रात्रीं घनतोलीजवळ संगमावरील मुरलीधराचे देवळांत रामायण सुरू केलें, नंतर भागवतही सांगितलें. तिकडील सर्वच नव-शिक्षित वर्ग, विद्यार्थीवर्ग व अधिकारीवर्ग श्रवणास येत होता. लाला मोहनलाल तर प्रवचनाला मोहूनच गेले होते. सुशिक्षित व अशिक्षित स्त्रीवर्गही फार मोठ्या प्रमाणांत येत असे. त्यावेळेस कॅांग्रेसचें टकलीयुग सुरू होतें. प्रवचनांत टकल्या चालवावयाच्या नाहींत, असें मी म्हणताच, काही उपद्यापी कॅांग्रेस वाल्यांनीं सत्याग्रह करण्याचें ठरविलें, पण कांहीं हट्टास पेटून

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

टकली बंद करविलीच. घनतोलीवर मारुतीचे मंदिरांतही, पुष्कळ दिवस प्रवचन चालू होतें. बुधवारींत श्रीमंत बोरीकरांचे घरीं भागवत चाले. सर्व कोष्टी समाज प्रवचनास लोटत असे. दक्षिणामूर्तिमंदिरांत रामायण व भारत सांगितलें. मंदिरांतील जागा पुरे ना, मारामारी होऊं लागली, म्हणून दक्षिणामूर्ति चौकांत, प्रशस्त सडकेवर, कर्णपर्वापासून, पांडवराज्याभिषेका-पर्यंत भारत सांगितलें. तेथें तर तीनचार हजारांपर्यंत सर्व तऱ्हेचा समाज जमत असे. राजे रघुजी व राजे लक्ष्मणरावही मधून मधून श्रवणास येत. असें प्रवचन तर तेथ पुनः कधींच झालें नाहीं. गो महेशपुरीजीनीही आपले देवळांत भागवताचें प्रवचन करविलें. ते रोज येत असत. माझे प्रवचनांत टकली, वाती, निवडण वगैरे गोष्टी (पुराणांतील बायकी ठराविक कार्यक्रम) केव्हांच होत नसत. पण कांहीं कांहीं निद्राबहादुरांच्या झोंपेला मात्र मला आळा घालतां आला नाहीं. ही माझी कमजोरीच मी समजतों. सर्व जातीचे, सर्व धंद्यांचे व सर्व तऱ्हेचे लोक माझे श्रोते झाले. धनधान्य, वस्त्रप्रावरणें, चांदीचीं भांडीं, पैसा वगैरे नागपूरकरांनीं माझ्या योग्यतेच्या बाहेर मला दिलें आणि त्यापेक्षांही मोठ्या किंमतीची देणगी म्हणजे माझेवर नागपूरकरांनीं केलेले निष्कपट प्रेम ही होय. मीही प्रवचनरूपानें नागपूरकरांची सेवा इमानेइतबारें केली. माझ्या प्रवचनसेवेची परीक्षा मजवर कांहीं प्रसंग आणून ईश्वरानेंच पाहिली. ते प्रसंग असे; आजारी बायको ज्या गाडीनें माहेरीं जावयाची, त्या कलकत्ता मेलची व प्रवचनाची वेळ एकच होती. सासूबाईची व बायकोचीही इच्छा मी स्टेशनवर त्यांना पोहोंचविण्यास यावें अशी होती, व ती योग्यही होती. पण सर्व मायाममता तोडून त्यांना पोंचविण्यास स्टेशनवर न जातां प्रवचनच सांगण्यास गेलों. ह्या रागावरच बायकोचे दोन हजारांचे दागिने श्वशुरांनीं परत केले नाहींत. दुसरा प्रसंग असा कीं, पदवीदान-समारंभाकरितां गव्हर्मेंट हौसमध्यें येण्याविषयीं गव्हर्नरसाहेबाचें निमंत्रण आलें तेव्हा तीच वेळ नेमकी प्रवचनाची होती. "ही माझी प्रवचनाची वेळ असल्यामुळें मी येणें शक्य नाहीं, क्षमा असावी," असें उत्तर लिहून

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ठेविलें तोंच घोडेस्वारानें "उद्याचा श्वेत रहित आहे" अशा मजकुराचें सरकारी पत्र आणून मला दिलें.

हिंदु मुलींची शाळा, गोखले व्यायामशाळा, टिळक पुतळा, मुंजे पर्स, मंदिरप्रवेशनिषेधाची चळवळ, वगैरे कार्यांकरितां मीही यथाशक्ति देणग्या दिल्या. हिंदुमुसलमानदंग्यांत काठी घेऊन रात्रभर आपल्या आळीमधून पहारा देत होतों व त्यांत मेलेल्या लोकांकरितां प्रवचनाची समाप्ती जाहीर करून मिळालेले तीनशें रुपये दिले. मी नागपुरांत केव्हां केव्हां एकटाही राहत असें. पण मी एकटा आहें, असें नागपूरकरांनी मला कधींच भासूं दिलें नाहीं. डॉ. परांजपे यांनीं आपल्या दवाखान्यांत माझ्या मूळव्याधीचें ऑपरेशन उत्तम रीतीनें व अगदींच निरपेक्ष बुद्धीनें केलें. मी पैशाचें नांव काढतांच मला होणाऱ्या ऑपरेशनच्या वेदना, त्यांना होऊं लागल्या. ऑपरेशनच्या वेळेस मी नागपुरांत एकटाच होतों. पण स्वत: डॉक्टरसाहेब व त्यांच्या घरची मंडळी यांनीं पोटच्या पोराप्रमाणें माझी काळजी घेतली. गांवांतील स्त्रीपुरुषांनीं तर त्यांचा दवाखाना रात्रंदिवस गजबजलेला असे. त्यावेळेस पांडुरंग सोनार, गणपतराव,(न्हावी) चोरघडे मास्तर, वर्वे, हरीभाऊ ताम्हनकर, वगैरे मंडळींनी माझेकरितां रात्रंदिवस श्रम घेतले. नानाजी बांडे तहसीलदार यांनी तर आपल्या पोटच्या पोराचीही काळजी घेतली नसेल इतकी माझी काळजी घेतली व अजूनही ते घेतात. कांहीं मंडळी तर सहकुटुंब सहपरिवार माझी काळजी घेत. राजाचीही व्यवस्था होणार नाहीं इतकी माझी व्यवस्था सर्वांनीं ठेविली. नागपुरकरांचे हे उपकार मी कधींही विसरणार नाहीं. माझेबद्दल व माझ्या प्रवचनाबद्दल नागपुरकर विद्वानांचें मत कळण्याकरितां म्हणून नागपुरच्या मानपत्रांतील थोडासा उतारा येथें देतों.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## नागपुरचीं मानपत्रें

काशीभूषणबोधराशिविदुषामन्ते वसन्नादरात् ।
पाराशर्यगिरां कुशाग्रधिषणो यः सारमासादयत् ॥
सोऽयं वक्तुमुपैति तापशमनीं विद्यामिहास्मान् वझे ।
पूर्वोपार्जितमन्तरेण सुकृतं संगः सतां दुर्लभः ॥१॥
गंभीरो गरिमा क्व वेदवचसामज्ञः क्व चायं जनो ।
वेदान्तश्रवणे कुतूहलि मनः प्रायः पुनः प्राणिनाम् ॥
या गूढार्थनिरूपणे निरुपमा चेतोहरा चातुरी ।
सा यस्मिन्विलसत्यसौ विजयते वेदान्तवक्ता वझे ॥२॥
बालं पाययते गुडेन सुभिषक् रुग्णं यथा भेषजं ।
मायामोहयुतं प्रपञ्चपतितं लोकं कथाभिस्तथा ॥
दृष्टान्तैश्च मनोहरैरुपदिशत्यध्यात्मतत्त्वं तु यः ॥
भाऊनामजुषे सदर्थविदुषे तस्मै प्रणामोऽस्तु नः ॥३॥
वेदार्थो विशदीकृतः खलु मया धृत्वा वपुः शाङ्करम् ॥
भाष्यार्थाकलनाय मन्दमतयो नालं तथाऽप्यञ्जसा ॥
इत्यालोच्य दयापरः श्रुतिशिरःसारं प्रवक्तुं स्वयं ॥
विश्वेशोऽयमुपागतः किमु वझे वेदान्तवाचस्पतिः ॥४॥

(म. म. ताह्मन.)

---

किं व्यासः श्रुतिसारविद्धरिकथाव्याख्यापटुर्वा शुकः ।
नाट्याचार्यवरो मुनिः स भरतः किं वाऽवतीर्णोऽवनिम् ॥
यस्याकर्ण्य गिरं निमज्जति जनश्चेत्थं भ्रमांभोनिधौ ।
श्रीमान् वाग्मिमतल्लिका विजयतेऽसौ भाउशास्त्री वझे ॥१॥

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

गंगौघापरि निर्मल प्रवचनीं गंभीर ज्याची गिरा ॥
भासे हा विबुधर्षि कीं शुक्र मुनी किंवा स्वयें अंगिरा ॥
भाऊशास्त्रि वझे, जयासि म्हणती वेदांतवाचस्पती ।
आला नागपुरीं जणूं विधिवळें, प्रत्यक्ष काशीपती ॥१॥

(श्री. गणपतराव मास्तर.)

---

भगवद्गीताशालीन् श्रीशङ्करसूपकारवरपक्वान् ॥
परिवेषयत्यनन्ते शोच्याः कर्णोदरेष्वकुर्वाणाः ॥१॥
प्रोक्ता वक्तृवरेण साधु भवता गीता गभीराऽऽशया ।
श्रीमच्छंकरपूज्यपादवचसां व्यक्तीकृता चातुरी ॥
यत्तेनाभिहितं हितं भगवता दिष्टं, सुवर्त्मा स्फुटम् ॥
जानीमोऽस्य न निष्क्रयं नतिमृतेऽनन्तोपकारस्य ते ॥२॥
सार्थं भारतभूभुजार्पितमुरु प्रज्ञावता बीरुदम् ॥
सर्पेण त्वगिवाशु, येन विधुतं धर्मानुरागादहो ॥
शास्त्रोदाहृतवृत्तशासनविधौ जागर्ति योऽहर्निशम् ।
तस्मै वर्षशतं प्रयच्छतु वयोऽनन्ताय मृत्युञ्जयः ॥३॥

---

## पदवी प्राप्ति.

समाजांतील सामान्य माणसापासून तों बड्या बड्या सरकारी अधिकाऱ्यांपर्यंत, माझे श्रोते व चहाते असल्यामुळें त्यांच्याच सहानुभूतीनें, मध्यप्रांत सरकारच्या शिफारशीवरून हिंदुस्थान सरकारनें, मला "महामहोपाध्याय" ही बहुमानाची पदवी १-३-१९२९ रोजीं बहाल केली. त्यां वेळेस बटलरसाहेब गव्हर्नर होते. ते स्वभावानें मोठे मानी पण विनोदी होते. पदवीदानसमारंभाचे दिवशीं, राजवाड्यांत त्यांची व माझी मुलाखत

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri



पं. भाऊशास्त्री वझे

रायफल क्लबचे पोषाखांत १९२०

ब्लॉक व छपाई—कलागृह प्रेस पुणें



पं. भाऊशास्त्री वझे

'महामहोपाध्याय' पदवीचे पोषाखांत १९२९

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कै. सौ. सीताबाई वझे



प्रथम पत्नि

कै. सौ. कमलाबाई वझे



द्वितीय पत्नि

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

झाली. माझ्या डोक्यावर त्यांनीं पगडी ठेवली, ती बरोबर बसलेली पाहून ते मला विनोदानें म्हणाले कीं, "तुम्हीं डोक्याचें माप दिलें होतें काय?" "मी नव्हतें दिलें, माझ्या डोक्यांतील नशिबानें तें दिलें असावें," असें मी म्हटलें. त्यावर साहेब हंसले "तुम्ही कोणत्या प्रांताचे?" असें त्यांनीं विचारतांच "आम्हां विद्वानांचा एका विशिष्ट प्रांतांत संसार नसून तो सर्व जगभर आहे. कारण आमचें शेत (विद्या) सर्वच ठिकाणीं पिकते." असें मी उत्तर दिलें. उत्तर ऐकून साहेब मोठे प्रसन्न झालेले दिसले. मी हस्तांदोलन करून परतलों. आश्चर्याची गोष्ट अशी कीं, त्याच वेळीं, पदवी सोडावी असें माझ्या मनांत आलें. त्याला कारण असें घडलें कीं, गव्हर्नरसाहेब येण्याचे पूर्वीं, त्यांच्यासमोर, चोरासारखें म्हणा, किंवा शिपायासारखें म्हणा, उभें राहण्याची तालीम एक अधिकारी आम्हाला देत होता; त्याची तालीम देण्याची पद्धति पाहून पदवीधरांचा रुबाब सामान्य लोकांवर असला तरी गव्हर्मेंट हौसमध्यें त्यांची कशी दशा होते ह्याची पूर्ण जाणीव त्यावेळेस मला झाली. आणि उभ्या उभ्याच मनांत आलें कीं, रावबहादूर, रावसाहेब यांचें ठीक आहे. कारण, ते जाणूनबुजूनच सरकारचे मिंधे तरी असतात. पण मी नोकर नाहीं. श्रीमंत नसल्यामुळें मिंधाही पण नाहीं. मी जातीनें ब्राह्मण, वेदांतशास्त्राचा अभ्यास केलेला, सार्वभौम राजानेंही तासचे तास झोपडीच्या बाहेर उभें राहून ज्यांच्या दर्शनाची मार्गप्रतीक्षा करावी, त्या ऋषींचा मी वंशज आहें. अशानें दासाप्रमाणें तिष्ठत उभें राहून एका यवन-राज प्रतिनिधीची मार्गप्रतीक्षा करावी; आणि त्याकरितां एका सामान्य माणसानें माझ्यावर हुकमत गाजवावी ह्याच मला फारच वाईट वाटलें. एक पदवी व तिच्याबरोबर मिळणारे सालीना शंभर रुपये, यांच्या लोभानें हें सर्व निमूटपणें सहन करावें लागत आहे. तेव्हां "न रहे बास न बाजे बासरी," या म्हणिप्रमाणें एखादा योग्य प्रसंग पाहून पदवी सोडून द्यावी असें तेव्हांच मनानें ठरविलें होतें.

पदवी मिळाल्यामुळें तर आगीत तेल ओतल्याप्रमाणें माझ्या विरोधी मड-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ळींच्या द्वेषांत अधिकच भर पडली. काशींत व नागपुरांत बरीच खळबळ उडाली. कांहीं थोडे मित्र वजा करून पूर्वी माझेबद्दल उदासीन असलेले लोकही आतां माझा मत्सर करूं लागले. आपण वर्षानुवर्ष खटपट करीत असूनही आपणास अजून पदवी मिळत नाहीं आणि या परप्रांतीयाला एकदम थोड्याच दिवसांत पदवी मिळाली; ह्याचें त्यांना आश्चर्य वाटून, ते अनेक तर्कवितर्क करूं लागले. कोणी म्हणे, पदवीकरितां बरेचसे पैसे यानें खर्च केले. कोणी म्हणे, अधिकारी वर्गाची खुषमस्करी हा करतो म्हणून पदवी मिळाली. कांहींतर पदवी देऊन सरकारनें याला आपला हस्तक बनविलें असेंही म्हणूं लागले. विद्वान् व समंजस लोक गुणावर पदवी मिळाली असें म्हणाले, तर स्वार्थी लोक आमच्या खटपटीनें पदवी मिळाली असें म्हणूं लागले. मी म्हणतों कीं, यांपैकीं एकही कारण खरें नसून माझ्या प्रारब्धानेंच ती मला मिळाली. त्याचें कारण असें कीं, पदवी मिळाल्यानंतर शिष्टाचाराप्रमाणें मी त्या वेळचे होम मेंबर तांबेसाहेब यांचे आभार मानण्याकरितां त्यांचे बंगल्यावर गेलों. "आपण माझी शिफारस केली याबद्दल मी आपला आभारी आहें," असें म्हणतांच ते म्हणाले "शास्त्रीबोवा ! मी शिफारस केली हें खरेंच, पण खरें म्हटलें तर, ती तुमच्याच प्रारब्धानें मिळाली. कारण कोणत्याही पदवीकरितां प्रत्येक वर्षी शिफारस करीत असूनही ती मिळण्यास अनेक वर्षे लागतात, असा आजपर्यंतचा अनुभव आहे. तुमचे बाबतींत मात्र निराळेंच झालें. मी गव्हर्नरसाहेबांकडे शिफारस केली. त्यांनीं लगेच व्हाईसरॉयसाहेबांना लिहिलें, त्यांची उलट टपालीं संमति आली; वेळ मुळींच लागला नाहीं. हा प्रारब्धयोगच नाहीं तर काय?" असो.

पदवी मिळाल्यावर फारच थोडीं अभिनंदनपर पत्रें आलीं. तीं माझेवर निष्कपट प्रेम करणारांचीं होतीं. माझे गुरुजी गु. लक्ष्मणशास्त्री यांची मात्र तावडतोब तारच आली. काशींत गेल्यावर एक शालही त्यांनीं मला दिली. आतां तर मी राजकीय पंडित होऊन, कागदोपत्रीं "नागपुरचे महामहो-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पाध्याय" म्हणून परप्रांतींही प्रसिद्ध झालों. तें तर नागपुरकरशास्त्रीमंडळींना फ़ारच झोंबलें, पण करतात काय ?

## पदवी त्याग.

पुढें लौकरच असेंब्लीमध्यें शारदा बिल आलें. त्यावेळेस माझ्या गुरुजींनी कलकत्त्याच्या नोकरीला लाथ मारून गांधींच्या अधार्मिक चळवळीविरुद्ध प्रचार करण्याकरितां आपलें उर्वरित आयुष्य वेचण्याचा विडाच उचलला होता. "ब्राह्मणसंमेलन," नांवाची अखिल भारतवर्षीय सभा त्यांनीं भरविली. त्या सभेस सर्व पीठगुरु व अनेक राजेही आले होते. स्वमतप्रचारार्थ "पंडित पत्र" नांवाचें साप्ताहिक हिंदी भाषेंत त्यांनीं सुरू केलें. त्या वेळेस तर श्रीयुत गांधींचा चहूंकडे बोलबाला चालू होता.

## गांधीयुग

पातःपूष्णो भवति महते नोपतापाय यस्मात्
कालेनांतं क इह न ययुर्यांति यास्यंति वा के ॥
एतावत्तु व्यथयतितरां लोकबाह्यैस्तमोभिः
तस्मिन्नेव प्रकृतिमहति व्योम्नि लब्धोऽवकाशः ॥

सन १९२० सालींच टिळकांसारखा सतेज सूर्यग्रह अस्ताला गेला. आणि गांधी महाग्रह चमकूं लागला. त्याचे भोंवताली निस्तेज झालेल्या उपग्रहांप्रमाणें दासबाबू वगैरे विद्वान मंडळी भ्रमण करूं लागली. इंग्रजसरकार निर्धास्त झालें. बोका उंदराला खेळवितो, त्याचे लहान लहान बोचकारे सहन करतो, त्याला थोडें मोकळेंही सोडतो व नंतर मारतो, त्याप्रमाणें इंग्रजसरकार वागूं लागलें. अगोदरपासूनच हिंदुस्थानाला लागलेल्या कलिमहादशेंतील ही अंतर्दशा होती. या कालांत हिंदुस्थानची फारच दुर्दशा झाली. हिंदुस्थानांत तर आरंभीं आरंभीं हा देशोद्धारार्थ झालेला ईश्वराचा अकरावा अवतारच आहे, अशी गांधींबद्दल लोकांची समजूत होती. देव-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

घरांत त्यांचे फोटो लागले. कांहीं भाविक लोक तर सत्यनारायणाप्रमाणें 'दरिद्रि-नारायण' नांवाचें, त्यांचें नवीन व्रत करून, शेवटीं शेळीच्या दुधाचा नैवेद्य व "सत्याचे प्रयोग," ही पोथी वाचीत असत. त्यांना "महात्मा," ही पदवी प्रथम चंपारण्यांतच मिळाली. हें कलियुगांतर्गत गांधीयुग सुरू होतांच सामाजिक बंधनें तडातड् त्यांच्या भक्तांनीं तोडून टाकलीं. स्वेच्छाचार बोकाळला. येतां. जातां, उठतां, बसतां, तरुण तरुणींच्या हातांत दर्शनी टकल्या दिसूं लागल्या व तोंडाची टकळी सुरू झाली. खादीसाडी नेसलेल्या व पाठीवर शेपटा लोंबत असलेल्या असंख्य तरुणी, घरेंदारें सोडून शुभ्र वेषधारी सर्व जातींच्या तरुणांबरोबर निर्भयपणें हिंडूं लागल्या. गरीब व सुशील नवरे आपली बायको आपल्या इच्छेविरुद्ध पिकेटिंगकरितां किंवा मिरवणुकीकरितां, कॉंग्रेस स्वयंसेवक नेतात, असें वाटून "बायको माझी कीं कॉंग्रेसची?" या संभ्रमांत पडले. या गांधींच्या आंधीनें मोठमोठ्या विद्वानांच्याही डोळ्यांत धूळ फेंकली गेली. गांधी-विरोधकांना तर गिरिकंदरांत बसल्याप्रमाणें आपापलीं दारें व तोंडें बंद करून घरीं स्वस्थ बसण्याची पाळी आली लोकांच्या डाकगवर, त्यांच्या पूर्वीच्या पगड्या, टोप्या, फेटे जाऊन, गांधींनी दिलेली पांढरी टोपी झळकूं लागली. त्यावेळेस मार खाणाराच पराक्रमी व मर्द ठरला. मार देणें व हातांत शस्त्र घेणें हें हलकटपणाचें व भित्रेपणाचें लक्षण झालें. थोडक्यांत सांगावयाचें तर या गांधीयुगांत दैवी संपत्तीचे स्थान, तिच्या बुरख्याखालीं आसुरी संपत्तीनें, हिंदुस्थानचें स्थान पाकस्थान कल्पनेनें, अकराही महिन्यांचें स्थान, फाल्गुन मासानें, वर्णाश्रमीय आचाराचें स्थान सामुदायिक व दांभिक कोरड्या ईश्वरप्रार्थनेनें, धर्माचें स्थान अधर्मानें, गाईचें स्थान शेळ्यांनीं, ब्राह्म-णांचें स्थान अस्पृश्यांनीं, पुरुषांचे स्थान बायकांनीं, शास्त्रांचें स्थान गांधींच्या आंतल्या आवाजानें, पाद्यांचें स्थान सामान्य शास्त्र्यांनीं, विद्वानांचें स्थान गुंडांनीं, सभेचें स्थान संग्रामभूमीने, विचारसरणीचें स्थान अपशब्दांनीं, बेकारांचें स्थान सुशिक्षितांनी, श्रीमंतींचें स्थान दारिद्र्यानें, विनयाचें स्थान

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

औद्धत्यानें, बापाचें स्थान मुलानें, प्रतिष्ठित वेषाचें स्थान मुतकी वेषानें, भराभर काबीज केलें.

या श्रीयुत गांधींच्या उत्कर्षाच्या काळांत, त्यांच्या विरुद्ध ब्र काढण्याचें कोणाचेंही सामर्थ्य नव्हतें. अशा वेळीं गु. लक्ष्मणशास्त्री यांनींच त्यांचे विरुद्ध पहिला आवाज काढला. एका काळीं सर्व हिंदुस्थान बौद्धमय झाला होता. त्या वेळेस कुमारिल भट्टांनींच अगदीं प्रथम बौद्धांच्या विरुद्ध आवाज काढला; तसेंच या वेळींही झालें. या विरोधाबद्दल त्यांना फारच कष्ट सोसावे लागले. त्यांना रस्त्यावरून हिंडणेंदेखील कठीण झालें. काशीकर शास्त्रीपंडितदेखील सर्वच त्यांच्या विरुद्ध गेले. त्यांचेवर बहिष्कार पडला. "हे देशद्रोही आहेत," असें लोक घडघडीत त्यांचे तोंडावर बोलूं लागले. वेळ प्रसंगीं अंधारांत त्यांना मारही बसला, असें तें सांगत होते. पण लेशमात्रही न डगमगतां मोठ्या उत्साहानें त्यांनीं चळवळ चालू ठेवली. त्यानीं होममेंबर क्रेरार यांचेकडे डेप्युटेशन नेऊन "सनातन्यांचा शारदा बिलाला विरोध आहे," असें स्पष्टपणें सांगितलें. त्यावर क्रेरार म्हणाले कीं "गांधीनाच आम्ही सर्व हिंदूंचे प्रतिनिधि समजतों. त्यांची या बिलाला पूर्ण संमति आहे. मग हे सनातनी कोण?" त्यावर शास्त्रीबुवांनीं गांधी व सनातनी हिंदु यांचें स्वरूप नीट समजावून सांगितलें; व गांधी-हिंदूपेक्षां सनातनी हिंदूच फार मोठ्या प्रमाणांत आहेत, व त्यांचा या बिलाला विरोध आहे" असें सांगितलें. "सनातनी समाज कितीही मोठा असला, तरी संस्थेच्या रूपानें संघटित होऊन सरकारच्या समोर आल्याशिवाय, त्यांचा विचार सरकार करणार नाहीं. तेव्हां सनातन्यांनीं एक संस्था काढावी," असें क्रेरार म्हणाले. म्हणूनच पुढें शास्त्रीबुवांनीं प्रथम दिल्लींत **वर्णाश्रम स्वराज्य संघ** नांवाची संस्था काढली.

मीही नागपुरांत शारदा बिलाविरुद्ध चळवळ सुरू केली. "महाराष्ट्रांत," लेख लिहिला, हँडबिलें काढलीं, प्रवचनांत व घरोघरीं जाऊन विरोधकांच्या सह्या घेतल्या. हिंदु मुलींच्या शाळेंत सभा भरविली. स्त्रीसमुदाय फारच मोठा जमला होता. सर्वांनुमतें बिलाचा निषेध करणारा ठराव पसार

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

झाला. लोकांकडून पत्रें व तारा यांचा भडिमार सरकारवर करण्यांत आला. मी स्वतः महामहोपाध्याय म्हणून व्हाइसरॉयसाहेबांना तार केली; पण हे सर्व श्रम व्यर्थ जाऊन, शेवटीं असेंब्लींत शारदाबिल पास झालें. तेव्हां मी मध्यप्रांत गव्हर्नरांना पत्र लिहून पदवी सोडल्याचें कळविलें. तें पत्र असें:—

"सनातनमतवादी हिंदु समाजाच्या वतीनें मी नुकतेंच व्हाइसरॉयांस कळविलें होतें कीं, शारदाबिल तुम्ही पास करूं नका. कारण तें हिंदुधर्मशास्त्राच्या विरुद्ध आहे. अशा प्रकारचे निषेध व्हाइसरॉयांकडे ठिकठिकाणाहून आले असतांही सरकारनें बिलास पाठिंबा देऊन शास्त्राचा उपमर्द केला आहे. सरकारच्या ह्या कृत्याविरुद्ध माझा निषेध व्यक्त करण्यासाठीं, केलेल्या अल्प जन-सेवेबद्दल मला यंदाच दिलेल्या "महामहोपाध्याय," पदवीचा त्याग करण्याचें ठरविलें आहे. ज्या सरकारनें आमच्या सनातन धर्मशास्त्राच्या बाबतींत इतकें बेपर्वाईचें वर्तन केलें, त्या सरकारकडून मिळालेली पदवी जर मी इतःपर धारण करून समाजांत मिरवूं लागलों, तर मी तो शास्त्राचा अपमान केला असें होईल. या महामहोपाध्याय पदवीचीं जीं चिन्हें मला मिळालीं आहेत तीं आपण कळवाल त्याप्रमाणें डि. कमिशनरकडे अगर दुसऱ्या कोणाही कामदाराकडे मी परत करीन. माझा हा निषेध व्हाइसरॉयसाहेबांच्या निदर्शनास येईल अशी तजवीज करण्यांत यावी."

महामहोपाध्याय ही पदवी १-३-२९ ला मला मिळाली व ती २७-९-२९ ला मी सोडली. सात महिने तिचा व माझा सहवास होता. त्याच वेळेस गु. लक्ष्मणशास्त्री, पं. पंचानन तर्करत्न व पं. विद्याविनोद या पंडितांनींही आपआपल्या पदव्या सोडल्या. मी पदवी सोडली हें कळतांच अभिनंदनाची पहिली तार गुरुजींकडूनच आली. नंतर पुष्कळच अभिनंदनपर पत्रें आलीं. त्यांत मित्रांचीं तर होतींच, पण माझ्या पदवीप्राप्तीमुळें ज्यांना वाईट वाटत होतें, त्यांचींही पत्रें आलीं. कारण "आतां हा फिरून आपल्या जोडीला

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

आला ", असें त्यांना वाटलें असावें. पण त्यांना हें कळलें नाहीं कीं, मी आतां महामहोपाध्यायापेक्षांही मोठा झालों. पैसे देऊन पदवी मिळविली असें म्हणणारांना व इतरही आरोप करणारांना हें तर चोखच उत्तर मिळालें. सरकारी पदवी सोडल्यामुळें काशीहून भारतधर्ममहामंडळाकडून "महा-महाध्यापक," गीर्वाणवाक्वर्धिनी सभेकडून "विद्वन्मान्य," कांची येथील कामकोटी पीठाकडून "धर्मधीरोपाध्याय," अशा पदव्या मजकडे आल्या. या सर्व पदव्यांचा अर्थ, मी केलेल्या पदवीत्यागास लोकांची सहानुभूति आहे, इतकाच मी समजतों. मी धर्माकरितां पदवी सोडली म्हणून कॉंग्रेस-वाल्यांनीं मात्र मुळींच माझी प्रशंसा केली नाहीं. उलट उपहासच केला. पुढें मी गुरुजींच्या पत्रावरून काशींत गेलों. तेथें राहून वर्णाश्रम-स्वराज्य-संघाची नियमावली आम्ही गुरुशिष्यांनीं मिळून तयार केली. नंतर संघाचे मार्फतच सर्व चळवळ चालू झाली. संघाच्या ध्वजावरील शेषशायी चित्राची कल्पना माझीच आहे. नागपुरांतही प्रो. ह. भा. मुंजे यांनीं संघाची एक शाखा स्थापन केली. पुढें माझ्या अध्यक्षतेखालीं नागपुरांत प्रांतिक संघाची स्थापना झाली. त्यांत येण्याबद्दल रा. नवाथे व रा. ब. परांडे, माजी डि. से. जज्ज. यांना मी विनंति केली. त्याप्रमाणें संघाचा सर्व भार त्यांनीं उचलला. रा. ब. परांडे यांच्यामुळेंच आज संघाचें अस्तित्व टिकून राहिलें आहे, असें म्हटलें तर अतिशयोक्ति होणार नाहीं. हल्लीं ते अखिल भारतीय व. स्व. संघाचे प्रधानमंत्री आहेत. संघाच्या सर्व अधिवेशनांना मी स्वतःच्या खर्चानेंच जात असें. तेव्हांपासून सरकारलाही सनातनी समाजाची माहिती झाली. आतां सरकार संघाचेंही मत विचारांत घेत असतें. मंदिर-प्रवेश-बिलाचे वेळीं आम्ही दिल्लीस संघामार्फत डेप्युटेशन घेऊन गेलों होतों. आमचें बोलणें सरकारनें शांतपणें ऐकून घेतलें. मंदिरप्रवेश बिलहीं अखेरीस फेटाळलें गेलें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## लाहोर कॉंग्रेस

आकेशग्रहणान्मित्रमकार्यात्संनिवर्तयन् ।
अवाच्यः कस्यचित् भवति कृतयत्नो यथाबलम् ॥

लाहोरास रावी नदीचे तीरावर कॉंग्रेस भरावयाची होती. तिचे अध्यक्ष जवाहरलाल नेहरू हे होते. त्या वेळेस हिंदी "पंडित" पत्रांत, गु. लक्ष्मण-शास्त्री यांनीं कॉंग्रेसवर एक लेख लिहिला. त्याचा मथळा "कॉंग्रेस रावीके तटपर जाते जाते, खराबीके तटपर जा रही है," असा होता. त्यामध्यें वर्तविलेलें कॉंग्रेसबद्दलचें भविष्य आज तंतोतंत खरें ठरत आहे. तें पाहाण्यास गु. शास्त्रीबोवा हयात नाहींत याबद्दल वाईट वाटतें. योगायोग !

कॉंग्रेसमध्यें जाऊन पुढाऱ्यांशीं विचारविनिमय करून कॉंग्रेस कार्यक्रमांतून अस्पृश्यतानिवारणासारख्या धार्मिक बाबी काढून टाकून तिचें शुद्ध राजकीय स्वरूप कायम ठेवा असें त्यांस आमचें म्हणणें सांगावें, त्यांनी ऐकिलें तर त्यांचेबरोबर देशकार्य करावें, नाहीं ऐकिलें तर काळीं निशाणें दाखवून विरोध प्रदर्शित करावा, म्हणून मुद्दाम आम्ही दोनतीनशें लोक घेऊन लाहोरास गेलों होतों. त्यांत आमचे गुरुजी, म. म. वामाचरण भट्टाचार्य, पं. हाराणचंद्र भट्टाचार्य, पं. गौतमजी ज्योतिषी, श्रीराजेश्वरशास्त्री, पं. देवनायकाचार्य, पं. महेशचंद्र ॲडव्होकेट, संघाणीजी, पं. सीतारामशास्त्री केळकर वगैरे वृद्ध व विद्वान बडी बडी मंडळी होती. प्रथम आम्ही धर्मशाळेंत उतरलों. आम्हांला योग्य अशी जागाही मिळाली. नंतर आम्ही गांधीविरोधी आहों असें कळतांच, धर्मशाळेच्या मालकानें आम्हांला जागा सोडण्यास सांगितलें. आमचीं हँडबिलें कोणताही प्रेस छापून देई ना. रस्त्यांतून जातांना लोक थट्टा करूं लागले. कोठें अध्यक्षाप्रमाणें भर तारुण्यांत असलेली कॉंग्रेस व कोठें वृद्ध व शास्त्रीपंडित तिचे विरोधक, असें म्हणून आमचा फारच उपहास होऊं लागला. कोणी कोणी तर एकांतांत येऊन विरोध न करण्याबद्दल उपदेश करूं लागले. राहण्यास जागा नाहीं; दुकानदार सामानही देई ना. कॉंग्रेसचा केवढा हा

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

प्रभाव. शेवटीं तेथील प्रसिद्ध डॉक्टर कौल यांनी आपल्या बंगल्यांत आम्हांला आश्रय दिला.

डॉ. कौल हे लाहोरचे प्रसिद्ध डॉक्टर होते. त्यांचे बहुतेक रोगी युरोपिअन्सच असत. पण ते स्वतः व घरांत आयुर्वेदीय औषधोपचार करीत. ते शरीरानें भव्य, गौर वर्ण व उंच होते. ते पूर्वीं विझांटबाईचे भक्त पण पुढें तिला सोडून कट्टर सनातनी बनलेले होते. काशींतील म. म. सुब्रह्मण्यशास्त्री व आमचे गुरुजी यांचेकडे त्यांनीं वेदांताचें अध्ययन केलें होतें. ते पंडित मोतीलालजींचे संबंधी होते. त्यांचेकडे आमची चांगलीच सोय झाली. आम्ही तेथूनच पं. मोतीलालजींना भेटण्याकरितां अनेक तारा केल्या. पण ते उत्तरच देईनात. शेवटीं पं. मोतीलालजींची भेट घेऊन त्यांच्याशीं बोलणें झाल्याशिवाय भोजनच करणार नाहीं, असा राजेश्वरशास्त्रींनीं निर्धार केल्यामुळें कोणीच भोजन करी ना. तें पाहून डॉक्टरसाहेबांना वाईट वाटलें. त्यांनीं टेलिफोननें पं. मोतीलालजींना हा सर्व प्रकार कळविला व आपण जर भेटणार नाहीं तर मीही उपास करीन, असेंही निक्षून सांगितलें. तेव्हां कोठें पं. मोतीलालजींनीं आपल्या तंबूंत आम्हांला बोलाविलें. आम्ही तेथें गेल्यावर मोठ्या आदरानें त्यांनीं आमचें स्वागत केलें. आम्हीं आपलें म्हणणें त्यांना कळविल्यावर ते म्हणाले "अस्पृश्यतानिवारण वगैरे धार्मिक गोष्टींबद्दल मला कांहींच कळत नाहीं व तिकडे माझें लक्षही नाहीं. मी फक्त राजकीय विषय जाणतों. धार्मिक गोष्टींबद्दल महात्माजींशींच बोलावें." असें म्हणून त्यांनीं आम्हांला निरोप दिला. श्री. गांधींचा पुष्कळ शोध केला. पण लोकांनीं आम्हांला त्यांचा पत्ताच लागूं दिला नाहीं. शेवटीं घोड्यावरून पं. नेहरूंची मिरवणूक निघाली, त्या वेळेस त्यांना आम्ही काळीं निशाणें दाखविलीं. 'दरियामें खसखस,' या म्हणीप्रमाणें आमची मंडळी त्या मिरवणुकींत दिसत होती. काळीं निशाणें दृष्टीस पडतांच नेहरूंचे डोळे लाल झाले. त्यांच्या भक्तगणांनीं आमच्या स्वयंसेवकांना बुटांनीं तुडविलें, व निशाणें फाडून टाकलीं. ज्याप्रमाणें कॉंग्रेस स्वयंसेवकांशीं पोलिस वागत असत, त्याप्रमाणेंच कॉंग्रेसचे लोक सनातन्यांशीं

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वागले व अजूनही वागतात. ही आमची लाहोरची चळवळ म्हणजे डोंगर कोरून उंदीरही न निघाल्यासारखी झाली असें लोकांना वाटलें. तरी पण तेव्हांपासूनच हळुहळू कॉंग्रेसला उतरती कळा लागली यांत संशयच नाहीं.

## रायफल क्लब

### पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः ।

मागील जन्मांतील अनेक भिन्न भिन्न क्रियांचे जे संस्कार बुद्धीवर झालेले असतात ते पुढच्या जन्मांत कमीअधिक प्रमाणांत व्यक्त होऊन, आपापलीं कार्यें करतात. प्रबल संस्कार झपाट्यानें पुढें येऊन बुद्धि, मन व देह यांचे-कडून आपलें कार्य प्रथम करवून घेतात. इतर संस्कार दुर्बल असले, तरी मुळांतच नसतात असें मात्र नाहीं. तेही पण सांपडेल तेव्हां आपलें डोकें वर काढतात, व थोडेंबहुत आपलेंही कार्य साधून घेतात. म्हणून एकच क्रिया अखंड चालत असतांनाही मनुष्याचें आचरण कमीअधिक प्रमाणांत आपल्या स्वभावाच्या अगदी विरुद्ध दिशेनें होत असतें. एखाद्या रणकर्कशालाही, मधून मधून नेपोलियनसारखी ललित शृंगाराची गोडी वाटते; स्वराज्य स्थापनेसारखें धकाधकीचें कार्य करीत असतांनाही, शिवाजीमहाराजांना तुकारामबोवांचें कीर्तन ऐकून, एकांतवास करावा असें वाटलें; कृतकार्य व आत्मनिष्ठ असूनही श्रीसमर्थांना देशी चळवळ करावीशी वाटली; योगिनी, ज्ञानसंपन्न व वृद्धा असूनसुद्धां सुलभेला जनकाशीं विवाह करावा असें वाटलें; राजा जनक राज्य करीत असतांही वेदान्तश्रवणांत गर्क होऊन जाई; राजकीय चळवळ करीत असतांना लो. टिळकांनी ओरायन व गीतारहस्य लिहिलें; अशीं किती तरी उदाहरणें देतां येतील.

तात्पर्य, हा सर्व जन्मांतरांतील संस्कारांचा परिणाम आहे, हें न समजल्यामुळें "हे ज्ञानी असून असे कां वागतात," ह्याचें लोकांना आश्चर्य वाटतें. "मी हें असें कां करतों," हें स्वतःलाही कळत नाहीं.

मी शास्त्र्यांच्या कुळांत जन्माला आलों; शास्त्रांचेंच अध्ययन केलें, व

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

जीविकाही त्यावरच. असें असूनही मधून मधून लष्करी शिक्षणाकडे माझें मन धांव घेई.

अग्रतश्चतुरो वेदाः पृष्ठतः सशरं धनुः।
इदं ब्राह्ममिदं क्षात्रं शापादपि शरादपि ॥

या श्लोकांत जसें द्रोणाचार्यांचें वर्णन केलें आहे त्याप्रमाणें आपणही त्यांच्यासारखें व्हावें असें नेहमीं मनांत येई. पण ही गोष्ट बोलून दाखविली तर लोक माझा उपहास करतील म्हणून लाजेनें मी ती गोष्ट कोणापाशीं बोलत नसें. असा हा लहानपणापासूनच सुप्त असलेला संस्कार, योग्य संधि मिळतांच नागपुरांत प्रकट झाला आणि तेव्हांपासून निशाणबाजीचा अभ्यास करूं लागलों.

आरंभीं आरंभीं मी, रा. नवाथे, डॉ. परांजपे, डॉ. चोळकर व डॉ. मुंजे गोरावाड्याच्या जंगलांत जाऊन आपल्या मनानेंच अभ्यास करूं लागलों; परंतु तें जुळेना. त्याचें शास्त्र माहित नव्हतें, व कोणी गुरुही नव्हता, ह्यामुळें नेम चुकून, गोळ्या फुकट जात, व त्यामुळें खर्चही फार येई. डॉ. मुंजे, हे त्या वेळीं असेम्ब्ली मेंबर होते. त्यांनीं हत्यारांच्या कायद्याच्या पोट कलमाचा फायदा घेऊन, मध्यप्रांत सरकारच्या संमतीनें नागपुरांत १९३० सालीं रायफल क्लब काढला. त्यांत नांवें नोंदवून आम्ही शास्त्रोक्त पद्धतीनें निशाणबाजी शिकूं लागलों. या ठिकाणीं लक्ष्यवेध, शिकार, थोडें युद्धशास्त्र यांचें तीन वर्षेंपर्यंत मीं पद्धतशीर शिक्षण घेतलें.

## नाशिक

मी प्रत्येक उन्हाळ्यांत बहुतकरून नाशिकला जात असें. अगदीं पहिल्या खेपेस गेलों तेव्हां कोणाचीच ओळख नसल्यामुळें एकदोन दिवस तेथें राहून पुण्यास गेलों. त्यावेळीं नागपुरचे माझे स्नेही रा. ब. माधवराव देशपांडे हे उन्हाळ्याकरितां तेथें जाऊन राहिले होते, त्यांचेच घरीं मी उतरलों. त्याच वेळीं राजपुत्राच्या हस्तें झालेला, शिवाजीमहाराजांच्या पुतळ्याचा उद्घा-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

टनसमारंभ पाहण्यास सांपडला. रा.ब. माधवरावांबरोबरच वाई महाबळेश्वराकडे जाऊन आलों. ते दिवस फारच आनंदांत गेले. दुसऱ्या वेळीं रा. सा. बापुसाहेब खंडकर यांचा परिचय झाला असल्यामुळें त्यांचेच घरीं उतरलों.

रा. सा. बापुसाहेब हे सरकारी पेन्शनर असून स्वभावानें तर इतके सज्जन आहेत कीं या काळांत त्यांच्यासारखे लोक फारच दुर्मिळ. त्यांना वेदांताचा अतिशय नाद असून ते त्या विषयाचे जिज्ञासु व अभ्यासी आहेत. नाशकांत अजून माझ्या प्रवचनास सुरुवात झाली नव्हती. प्रथमच जवळच्या मुरलीधराचे देवळांत दर्शनास गेलों. तेव्हां देवळांत वसंतोत्सव चालू होता. डॉ. काळे हे उत्सवाचे चालक असून ते देवासमोर भजन करीत उभे होते. स्त्रीपुरुषांची फारच गर्दी झालेली होती. मला उभें राहण्याससुद्धां जागा नव्हती. ज्या बाजूला जावें, त्या बाजूचे लोक धुडधूड करीत. शेवटीं, एका बाजूलाच जाऊन उभा राहिलों. त्याच देवळांत वरच्या मजल्यावर उमरावतीच्या श्रीमती बारुताई राहात होत्या.

श्री. ह. भ. प. बारुताई ह्या उमरावतीच्या रहिवासी आहेत. त्या उत्तम कीर्तन व प्रवचन करतात. त्यांनीं उमरावतींत एक सुंदर कृष्णमंदिर बांधलें आहे. तेथें बराच स्त्रीसमुदाय जमतो. व तेथें बरींच कीर्तनें आणि प्रवचनें होतात. बाई स्वभावानें फारच गंभीर व प्रेमळ आहेत. त्यांचा वेदांत विचाराचाही व्यासंग उत्तम असून त्यांची शिष्यशाखाही बरीच मोठी आहे. त्या नेहमीं काशींत व नागपुरांत येत असल्यामुळें त्यांचा व माझा परिचय झालेला होता. तेव्हांपासून त्या माझेवर भावाप्रमाणें प्रेम करूं लागल्या होत्या, आणि म्हणून मीही त्यांना ताई म्हणूं लागलों. असो; लोकांनीं धुडधुड केल्यामुळें मी बाजूला जाऊन उभा राहिलों, हें पाहून ताईंना फार वाईट वाटलें. भजन आटोपल्यावर मला व डॉ. काळ्यांना त्यांनीं वर बोलावून त्यांस माझा परिचय करून दिला. " येथें यांचे प्रवचन करा " असें डॉ. काळ्यांना त्यांनीं सांगितलें. डॉ. काळ्यांनीं नाहींच म्हटलें. नंतर ताईंनीं पुन्हां जोरानें सांगितल्यामुळें त्यांना कबूल करावें लागलें. नंतर

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

माझें एक प्रवचन तेथें झालें. प्रवचन ऐकल्यानंतर आपल्या पूर्ववर्तनाचा डॉक्टरसाहेबांना फारच पश्चात्ताप झालेला दिसला. "ओळख नसली म्हणजे असें होतच असतें. त्यांत काय मोठें!" असें मी हंसून म्हटलें. वास्तविक उत्सवाचा तो शेवटला दिवस होता, तरी पण माझे प्रवचनाकरितां पंधरा दिवस उत्सव लांबवून तेथेंच माझीं प्रवचनें झालीं. 'भागवतांतील उद्धवागमन' हा प्रवचनाचा विषय होता. प्रवचनाला फारच गर्दी होत असे. ह. भ. प. पांगारकरही येत असत. तेव्हांपासून पांगारकरांशीं माझी ओळख होऊन स्नेह झाला.

केशवदत्तमहाराजही प्रवचनाला येत असत; त्यामुळें त्यांचाही परिचय झाला. तीं सर्व प्रवचनें डॉ. काळ्यांनीं जशींच्या तशीं उतरून घेतलीं आहेत. त्यांना ती कला फारच उत्तम अवगत आहे. तेव्हांपासून मंदिराचे मालक ह. भ. प. हरीभाऊ हे मला देवाजवळ नेऊन बसवूं लागले. रा. हरीभाऊ व त्यांचे वडील या दोघांनीं मजवर फार लोभ केला.

तिसऱ्या वेळेस तर मी, ताई (बहीण) व मुलें यांना घेऊन नाशीकला गेलों. दिल्लीदरवाजावर रा. रा. वेलदे यांचे घरीं भाड्यानें जागा घेऊन स्वतंत्र बिऱ्हाड करून राहिलों. यावेळीं मात्र फारच उत्तम दिवस गेले. सर्व मंडळींशीं पूर्वींचा परिचय होताच. सकाळीं पंचरत्नेश्वर मठांत केनोपनिषदावर प्रवचन चाले. दुपारीं वेदांतपरिभाषा वगैरे पाठ विद्यार्थ्यांना घरीं सांगत असें. रात्रीं पंचवटींत गोरे राममंदिरांत प्रवचन होई. केव्हां केव्हां रात्रीं घरीं ह. भ. प. पांगारकर, ब्रह्मानंदमाई, श्रीराम गोसावी वगैरे मंडळी जमून वेदांत आणि भक्ति या विषयांची चर्चा करीत. भक्तिप्रेमानंदांत वेळ केव्हां, कसा व कोणीकडे जाई हें कळतही नसे. केव्हां केव्हां अकोल्याचे रा. बापुसाहेब फडके यांचे घरीं ह. भ. प. पांगारकर पत्ते खेळत बसत, तेथें ते मलाही बरोबर नेत. पण बावन पत्त्यांच्या पाकिटांत त्रेपन्नावा एक निरर्थक पत्ता असतो त्याप्रमाणें मी त्यांचेजवळ बसत असें. कारण मला पत्त्यांचा खेळ येत नाहीं व त्याची आवडही नाहीं. बापुसाहेबांशीं बोलण्यांत मात्र आनंद वाटे. रा. बापुसाहेब

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

फडके हे स्वभावानें फारच गंभीर व प्रेमळ असून काव्याचेही ते फार रसिक व भोक्ते आहेत. त्यांचीं वैयक्तिक मतें, स्नेहाच्या आड ते केव्हांही येऊं देत नाहींत. असा तो मुक्काम फारच आनंदांत गेला. पण चांगल्या गोष्टीला दृष्ट लागावी म्हणूनच कीं काय, गु. लक्ष्मणशास्त्री यांची निधनवार्ता तेथेंच कळून मला अतिशय दुःख झालें. त्यांच्या निधनानिमित्त ह. भ. प. पांगारकर यांचे अध्यक्षतेखालीं यशवंतराव महाराजांच्या पटांगणावर दुखवट्याच्या सभेंत माझें व्याख्यान झालें. या मुक्कामांत ब्रह्मानंदमाई या सच्छील व वेदांतनिष्ठ माउलीचें मला फारच साहाय्य झालें. नाशकांतच माधवनाथ महाराज यांचें दर्शन झालें. त्यांचेकडे जाऊन तीन तास बसलों होतों. पण शास्त्राध्ययनानें कठोर झालेलें माझें चित्त तेथें द्रवलें नाहीं, हें माझें दुर्दैवच. ह्या मुक्कामांत हैद्राबादचे रा. बाबासाहेब दातार, रा. वामनराव नाईक, उमरावतीचे रा. बाबासाहेब पाळेकर व त्यांचे बंधु रा. विष्णुपंत ( अप्रबुद्ध ) यांचा व माझा चांगलाच परिचय झाला. उभयतां बंधु, महर्षि अण्णासाहेब पटवर्धन यांचे शिष्य असून फार योग्य आहेत.

रा. विष्णुपंत पाळेकर (अप्रबुद्ध) यांचा व माझा परिचय पूर्वी नागपुरांतच झाला होता. आतां तर त्याचें रूपांतर स्नेहांतच झालें. नागपुरांत त्यांच्याकडेच संध्याकाळीं माझी बैठक असे. ते बालब्रह्मचारी असून उत्तम अभ्यासी आहेत. ते स्वभावानें प्रेमळ, निष्कपट व सत्यप्रिय आहेत. त्यांनी अनेक ग्रंथ व लेख लिहिले आहेत. त्यांची लिहिण्याची शैली फारच साधी, आकर्षक व स्पष्ट असते. ऋक्वेदाचा संदेश हें त्यांचें पुस्तक वाचनीय झालें आहे. जुन्या तत्त्वांना नवीन कोंदणांत बसविण्याची कला त्यांना अतिशयच उत्तम साधली आहे.

अशा रीतीनें नाशकांत आनंदानें उन्हाळा घालवून पुनः नागपुरास आलों.

अकोला व उमरावती या दोन ठिकाणीं दहा दहा दिवस मोठ्याच प्रमाणावर प्रवचनें झालीं. अनेक ठिकाणचीं प्रवचनाकरितां कितीतरी

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

बोलावणीं येत असत. पण नागपुरकरांच्या भावबंधनानें जखडल्यामुळें कोठेंच जाऊं शकलों नाहीं.

## घाटे प्रकरण

काकः कृष्णः पिकः कृष्णः को भेदः पिककाकयोः
वसंतसमये प्राप्ते काकः काकः पिकः पिकः ॥

दक्षिणामूर्तिमंदिरांत नागपुरचे सुप्रसिद्ध पंडित म. म. भटजीशास्त्री घाटे यांचे चिरंजीव पंढरीनाथशास्त्री घाटे यांचें "गीतेचें तात्पर्य" या विषयावर प्रवचन झालें. त्याला कृष्णशास्त्री घुले, दादाशास्त्री कायरकर वगैरे बरीच मंडळी जमली होती. तासभराचे प्रवचनांत त्यांनीं काय सांगितलें हें मला तरी कळलें नाहीं. एकच गोष्ट कळली, ती ही कीं, ते म्हणाले "गीतेच्या खऱ्या अर्थाला शंकराचार्यांनीं चाट दिली व टिळकांनीं बगल दिली. मी अर्थ करतों तोच फक्त खरा." प्रवचन आटोपल्यावर मीं त्यांचे आभार मानिले, व "दोघांनीं चाट व बगल कशी दिली व आपला अर्थ कोणता हें आपण कांहींच सांगितलें नाहीं, तें आपण छापून प्रसिद्ध करावें, म्हणजे आम्ही त्याचा विचार करूं," असें म्हटलें. त्यावर "मी 'क्षात्रगीता,' या नांवाचें गीतेवर एक पुस्तक लिहिलें आहे व तें लौकरच प्रसिद्ध करणार आहें," असें शास्त्रीबोवांनीं उत्तर दिलें. आणि तसें "महाराष्ट्र," पत्रांत प्रसिद्धही केलें. पण तें पुस्तक मात्र अजून कोणालाही दिसलें अगर मिळालें नाहीं. आतां तर शास्त्रीबोवांनीं परलोकाचीच सफर केली. एवढाच काय तो मूळ विषय; पण याचेबद्दल नागपूरकर विरोधकांनीं मोठेंच अकांडतांडव केलें.

आजपर्यंत माझा सार्वजानिक रीतीनें विरोध करण्याकरितां सबळ असें कांहीं कारणच त्यांना मिळालें नव्हतें. माझा उत्कर्ष हें एकच वैयक्तिक कारण होतें. परंतु त्यामुळें वर्तमानपत्रांतून त्यांना माझी बदनामी करतां येत नव्हती. आतां तर त्यांना मोठेंच घबाड सांपडल्यासारखें झालें. "वझेशास्त्री यांचें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अनौचित्य," या मथळ्याखालीं "महाराष्ट्रांत," एक श्रोता या सहीनें एक लेख आला. मी सनातनी मताचा असल्यामुळें 'महाराष्ट्र ऑफिस' माझ्या विरुद्ध होतेंच. ही संधि साधून, पंढरीनाथशास्त्री ह्यांची विद्वत्ता संपादक चांगलीच ओळखीत असूनही, त्यांनीं ह्या लेखाला 'महाराष्ट्रांत' जागा दिली. त्या लेखाचा उद्देश असा कीं, मी पंढरीनाथशास्त्री ह्यांचा अपमान केला आहे. त्यामुळें भटजी शास्त्री ह्यांचे म. म. बापुजी ताम्हनासारखे बडे बडे शिष्य व स्वतः पंढरीनाथशास्त्री व त्यांचें आणखी कांहीं शास्त्री, हरिदास, पुराणीक, नट, तालिमबाज शिष्य व इतर त्यांचे स्नेही माझेवर रुष्ट होतील व मला नागपुरांतून हाकलून देतील. परंतु हा विरोधकांचा अंदाज सपशेल चुकला. कारण सर्व लोक पंढरीनाथशास्त्री ह्यांना चांगलेंच ओळखीत होते.

तो लेख जेव्हां माझ्या वाचनांत आला तेव्हां मला त्याचें मोठें नवल वाटलें. आणि हा लेख कोणी लिहिला याचा तपास करूं लागलो. बाळा वझलवार नांवाच्या एका सामान्य माणसाच्या नांवानें तो लेख ऑफिसमध्यें पाठविला गेला होता. व त्याच्या मागें अमुक अमुक गृहस्थ आहेत वगैरे खित्तंबातमी मला नेहमींप्रमाणें लागली. तेव्हां तर मला कांहींच नवल वाटलें नाहीं. पण सार्वजनिक विरोधाला सार्वजनिक उत्तर द्यावें, म्हणून पंढरीनाथशास्त्रींच्या प्रवचनाला हजर असलेल्या तटस्थ विद्वानांकडून या सर्व गोष्टींचा खुलासा वर्तमानपत्रांतून करवावा या उद्देशानें विद्याभूषण कृष्णशास्त्री घुले ह्यांचेकडे मी गेलों. त्यांनीं "पंढरीनाथशास्त्री यांचे बंधु माझे मित्र असल्यामुळें मी ह्याबद्दल कांहींच लिहूं शकत नाहीं," असें कानावर हात ठेवून मला सांगितलें. तें ऐकून वाईट वाटलें. तेथून कीर्तनभूषण दादाशास्त्री कायरकर ह्यांचेकडे गेलों; त्यांनाही ह्या बाबतींत लिहिण्याबद्दल विनंती केली. त्यांनीं तर नारदाप्रमाणें मला अत्यंत धीरगंभीर उपदेश करून हिताचा सल्ला दिला; तो असा कीं, "तुम्हीं उत्तर देण्याच्या भानगडींत न पडतां, हें बावटळ शांत होईपर्यंत कांहीं महिन्यांकरितां नागपुरांतून बाहेर जावें,"

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

हा उपदेश ध्रुवाप्रमाणें मलाहि पटला नाहीं. पण " वसंतसमये प्राप्ते काकः काकः पिकः पिकः, " हा श्लोक मात्र मला आठवला, व निराश होऊन घराकडे परतलों "खरा वृत्तांत प्रसिद्ध केल्यानें पंढरीनाथशास्त्रींचें स्वरूप बाहेर पडेल व ते तर आपल्या नागपूरचे होत," असें वाटून कोणीच आपल्या सहीनें लेख लिहून खुलासा प्रसिद्ध करण्यास तयार होईनात. कांहीं लोक लिहिण्यास तयार होते, पण ते शास्त्री नसल्यानें मीच त्यांना आवरून धरिलें. कांहीं विद्वानही लिहिण्यास तयार झाले पण ते प्रवचनालाच हजर नसल्यामुळें त्यांनाही मी लिहूं दिलें नाहीं. शेवटीं मीच सविस्तर हकीकत लिहून " महाराष्ट्राकडे," पाठविली. ही बातमी कायरकरांना कळतांच लगेच ते माझे घरीं आले. स्वागतसमारंभानंतर " तुम्हीं महाराष्ट्रांत प्रसिद्धीसाठीं एखादा लेख पाठविला आहे काय ? " असें त्यांनीं हळूच गंभीर मुद्रेने मला विचारलें. मी "होय" म्हटल्यावर ते म्हणाले कीं, "हें काय केलेंत. तो लेख जर प्रसिद्ध झाला तर गांवांत फारच क्षोभ होईल. त्यांची शिष्यशाखा क्रुद्ध झाल्यानें तुम्हांला रस्त्यांतून जाणेंदेखील जड जाईल. तूर्त गांवांत समाज तुमच्याबद्दल फारच खवळलेला आहे. तेव्हां तो लेख परत घ्या. नाहींतर कृष्णशास्त्री घुले, मी व बाबुराव दक्षिणामूर्ति आम्हीं तिघेही तुम्हाला सोडून देऊं; शिवाय तुम्ही दिलेला समग्र लेख संपादक जशाचातसाच छापील असेंही नाहीं. त्याला त्यांत कमीजास्त करण्याचा अधिकारही आहे. तुम्हाला लेख परत मागविण्याचें जड जात असेल तर मीच जाऊन तो घेऊन येतों." हें त्यांचें बोलणें मला सर्वस्वीं पटलें नाहीं. पण संपादकाबद्दलचें विधान मात्र पूर्ण पटलें, व " तुम्हींच तो लेख परत आणा," असें मी म्हटल्यावर त्यांनींच जाऊन तो लेख परत आणून मला दिला.

माझे विरुद्ध उठलेलें काहूर ऐकून श्रीमंत गांडलीसाहेब मला येऊन समक्ष भेटले, तेव्हां झालेला सर्व प्रकार त्यांना मीं सांगितला. त्यांनीं पंढरीनाथशास्त्री ह्यांजकडे जाऊन त्यांस चार गोष्टी सांगितल्या आणि शेवटीं असें बजावलें कीं, "धीर राखा, वझेशास्त्री ह्यांच्या [illegible] आम्हीं लागूं

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

देणार नाहीं." झालें, ताबडतोब जिकडेतिकडे पसरलेले द्वेषाचें वातावरण थंडावलें किंवा दबून राहिलें. त्यानंतर थोड्याच दिवसांनीं मी काशींत जाऊन ब्रह्मघाटीं एक उत्तम घर २५-१-३५ रोजीं विकत घेतलें. फडणीसवाडा सोडून तेथें राहण्यास आलों. तारीख ९–२–३५ रोजीं चिरंजीव रामचंद्राचें दुसरें लग्न काशींतील वे. शा. सं. माधवशास्त्री दातार यांच्या मुलीशीं केलें. नंतर मी पुन्हा नागपुरास आलों. ह्या वेळीं वैद्य वऱ्हाडपांडे वारल्यामुळें त्यांचें घर सोडून सर देशपांडे यांच्या घरासमोर मास्टे यांचे घरीं मी राहण्यास आलों.

## सालपेकर प्रकरण

घाटे प्रकरणाचे शेवटीं दबून राहिलेल्या द्वेषानें पुनः उचल खाल्ली. त्या वेळीं या द्वेषाच्या बुडाशीं एक शास्त्री होता तर ह्यावेळीं याच्या बुडाशीं एक स्थानिक महंत होता. तें प्रकरण असें.

"देवघरचे रामभाऊ सालपेकर," हे खासगी संस्थानी महंत आहेत. ते माझे पूर्वींचे स्नेही, व त्यांना मीं थोडेंफार शिकविलेलेंही होतें. म्हणून त्यांचेकडे मी केव्हां केव्हां जातही असें. अलीकडे त्यांचे सभोंवार, माझा विरोधी गट राहूं लागल्यामुळें मी त्यांचेकडे जाणें बंद केलें होतें. त्याचे पुष्कळ निरोप येत पण मी जात नसें; व न येण्याचें कारणही सांगत नसें. एक दिवस रात्रीं गोवर्धनोत्सवाचे दिवशीं दक्षिणामूर्तिमंदिरांत त्यांची व माझी गांठ पडली. तेव्हां तो विषय त्यांनीं आपण होऊनच छेडला. मी त्यांना स्पष्टच सांगितलें कीं, "माझ्या विरोधी पक्षाला तुम्ही जवळ केलें म्हणून मी तुमच्याकडे येत नाहीं. माझ्याशीं व माझ्या कट्टर विरोधकांशीं समान रूपानें तुम्ही राहतां; मित्र किंवा शिष्य ह्यानें अशा रीतीनें वागणें योग्य नव्हे. तुमचें वागणें उदासीनपणाचें लक्षण आहे. 'उदासीनोऽरिवत् वर्ज्यः' या न्यायानें उदासीनाशीं संबंध ठेवूं नये. एक वेळ प्रत्यक्ष शत्रु पतकरला, पण उदासीनाशीं संबंध ठेवणें धोक्याचें असतें, म्हणून मी येत नाहीं. मी तुमचेकडे आलों नाहीं तर तुम्हाला माझकडे यावयास पाहिजे होतें. कारण तुम्ही माझे स्नेही

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

म्हणवीत असून शिष्यही पण आहांत. मी डॉ. परांजपे यांचे दवाखान्यांत भयंकर आजारी पडलों होतों. तरी पण तुम्ही समाचारालादेखील मजकडे आलां नाहीं. मग मी तरी तुमच्याकडे कां यावें ?" हें ऐकतांच त्यांचा चेहरा लाल झाला; व ते ताडकन् उठून गेले. त्या वेळेस बाबूराव दक्षिणामूर्ति हेही तेथेंच होते.

माझ्या बोलण्यांतील "उदासीन मनुष्य शत्रु असतो व तुम्ही शिष्य आहां," हीं दोन वाक्यें या महंताला फारच झोंबलीं असें पुढें त्यांच्या व त्यांच्या भक्तांच्या तोंडूनच मला कळलें. रामभाऊ सालपेकर स्वतःच्याच घरीं सकाळीं पुराण सांगतात. त्यावेळीं पुराण संपतांच मुद्दाम हा विषय काढून "भाऊशास्त्री यांनीं काल माझी चांगलीच हजामत केली. ते हजाम आहेत." असें सर्व श्रोत्यांसमोर त्यांनीं सांगितलें. मग काय विचारतां पुनः माझा विरोध करणारांना ऊत आला. माझ्या पूर्वद्वेष्ट्यांना तर चांगलेंच फावलें. त्यांच्यांत सालपेकरभक्त मिळाले आणि रस्तोरस्तीं माझी निंदा करूं लागले. "वझेशास्त्र्यांनीं आपल्या येथील एका मोठ्या महंताचा अपमान केला, त्यांना ठोकलेंच पाहिजे. ह्याला कोठेंही खावयास मिळत नाहीं म्हणून हा नागपुरांत राहिला आहे," वगैरे, वगैरे, अनेक प्रकारें डॉ. दशपुत्रे यांचे दवाखान्यांत बसून ते बडबडूं लागले. त्यांत टामणे नांवाच्या रघुजीराजांच्या एका खुषमस्कऱ्या पुराणिकानें तर शिव्यांचा कहरच उडविला. ही गोष्ट बऱ्याच दिवसांनीं माझ्या कानावर आली. लोक त्यांना परस्पर उत्तर देऊन गप्प बसवितील या आशेनें मी कांहीं काळ स्वस्थ राहिलों; पण "सालपेकर आपल्या नागपूरचें महंत होत," असें म्हणून लोक कांहींच बोलेनात. शिव्या तर वाढतच चालल्या. बाबूराव दक्षिणामूर्ति हे माझा पक्ष घेतात म्हणून त्यांनाही माझ्या संगतीनें विरोधी लोक शिव्या देऊं लागले. आणि ते स्थानिक असतांनाही त्यांचा द्वेष करूं लागले. "हा कुत्रा तुम्ही पाळला आहे, त्याला तुम्ही मदत करतां, त्याला हाकलून द्या." अशीं निनांवी पत्रें त्यांना येऊं लागलीं. पण बाबुरावजींनीं माझ्याकरितां अनेक शिव्या व कष्ट सोसले पण मला मात्र

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

सोडलें नाहीं. उलट त्यांनीं जास्तच प्रेम केलें. बाकीचे लोक त्याबद्दल कांहीं बोलेनात; हें लोकांचें औदासीन्य पाहून मलाही राग आला व मी या निमित्तानें प्रवचन बंद केलें. तेव्हां लोक खडबडून जागे झाले. घरीं येऊन प्रवचन सुरू करण्याकरितां लोकांनीं मला फार विनविलें. "तिकडे लक्ष देऊं नका; कुत्रीं भोंकतच असतात, गजराज आपली चाल सोडीतच नाहीं, तो मनुष्यच तसा आहे," असें मला म्हणत. पण त्यांच्या तोंडावर कांहींच बोलत नसत, म्हणून मला जास्तच राग येई. आणि ह्या कारणास्तव मी प्रवचन सुरू केलें नाहींच. त्यामुळें रामभाऊ सालपेकरांच्या विरुद्धही बरीच खळबळ उडाली. हें पाहून " मी हजाम म्हटलेंच नाहीं." असें रामभाऊ उलट बोलूं लागले. त्यामुळें तर प्रकरण जास्तच चिडलें.

नंतर एक दिवस डॉ. परांजपे मजकडे आले आणि सर्व हकिकत ऐकून घेऊन म्हणाले कीं, " त्यांनीं तुमची माफी मागावी अशी तुमची इच्छा आहे काय?" त्यावर मी म्हटलें कीं, "छेः, तशी माझी मुळींच इच्छा नाहीं. माफीही नको व ह्यापुढें त्यांच्या संगतीची इच्छा नसल्यामुळें समेटही नको. फक्त ' मी खरेंच हजाम म्हटलें ' एवढेंच त्यांनीं कबूल करावें म्हणजे झालें! मग मी प्रवचन सुरू करतों." डॉ. परांजपे एक दिवस साठ सत्तर मंडळी बरोबर घेऊन सालपेकरांच्या घरीं गेले. डॉक्टर येणार ही बातमी त्यांना अगोदरच लागल्यामुळें त्यांनींही जामदार, बझलवार, पेणके वगैरे त्यांचे स्नेही व माझे कट्टे द्वेष्टे अगोदरच बोलावून ठेवले होते. दोनतीन तास बराच वादविवाद झाल्यावर शेवटीं " मी हजाम म्हटलें," असें त्यांनीं आढेवेढे घेऊन कबूल केल्यावर त्यांचा धिक्कार करून मंडळी तेथून निघून आली; मी दुसरेच दिवशीं दक्षिणामूर्तिमंदिरांत माझें प्रवचन सुरू केलें. नागपुरांतील माझें राहणें म्हणजे ज्वालामुखी पर्वतावर शिल्पशास्त्राच्या जोरावर सुंदर बंगला बांधून त्यांत राहण्यासारखेंच आहे, असें मला भासूं लागलें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# केडगांव

इ. स. १९३६च्या मार्चमध्यें केडगांवीं श्रीनारायणमहाराज यांनीं सहस्र सत्यनारायण केले, आणि त्याबरोबरच वेद, शास्त्रें, पुराणें यांचीं पारायणें, चातुर्मास्य-यज्ञ, अनेक देवांचे व ग्रहांचे याग, कीर्तनें, भजनें वगैरे अनेक कार्यक्रम केले. हा अपूर्व समारंभ पाहण्यासारखाच होता. अशा प्रकारचा समारंभ पूर्वीं झाला नाहीं व पुढेंही बहुतकरून होणार नाहीं. त्याकरितां श्रीनारायणमहाराजांनीं मला आग्रहाचें बोलावणें पाठविल्यामुळें मी केडगांवीं गेलों होतों. मध्यंतरीं १० वर्षें मी तिकडे गेलों नव्हतों, त्यामुळें मला पाहून महाराजांना फार आनंद झाला. "आमची जुनी मंडळी आली," असें म्हणून त्यांनीं मला बंगल्यांत नेलें. अगदीं पूर्वींप्रमाणेंच आम्हीं बसलों, हंसलों व खेळलों.

त्या उत्सवाकरितां संकेश्वर शंकराचार्य उभयतां गुरु आणि शिष्य, पुष्कळच साधुसंत, महंत, श्रीमंत, शास्त्री, पुराणिक, हरिदास वगैरे मंडळी आली होती. शेवटले दिवशीं वैद्यपंचानन कवडेशास्त्री वगैरे पुणेंकर मंडळींनीं "अखिल भारतवर्षीय सनातनधर्म परिषद" भरवून तिचें अध्यक्षस्थान मला दिलें होतें. सभेला जवळ जवळ तीन चार हजार लोकांचा समुदाय जमला होता. सभेंत अनेक ठराव पास झाले. पण विशेष गोष्ट म्हणजे, डॉ. कुर्तकोटी यांच्या निषेधाचा ठराव रा. भाऊसाहेब लवाटे यांनीं मांडला व तो टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटांत सर्वानुमतें पसार झाला. ही सभेची बातमी केसरीनें छापलीच नाहीं. उत्सव समाप्त झाल्यावर श्री. नारायणमहाराजांची आज्ञा घेऊन पुण्यावरून नागपुरास जावें म्हणून पुण्यास आलों.

# पुणें.

या खेपेस पुण्यांत आल्यानंतर मला रा. चिंतोपंत जोगळेकर यांचे घरीं उतरावयाचें होतें. पण पहिले दोनतीन दिवस चिंतोपंतांना महाराजांनी मुद्दामच केडगांवीं ठेवून घेतल्यामुळें रा. [illegible] डॉक्टर

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

यांचे घरीं रहावें लागलें. पुणेंकरांचा व माझा परिचय नसल्यामुळें मी एकटयानेंच सर्व शहर पाहिलें. मागच्या खेपेस १९१५ मध्यें मी पुणें पाहिलें होतें, परंतु तेंच आतां कितीतरी पटीनें मोठें दिसूं लागलें होतें. केडगांवीं श्री. रा. गो. भिडे या सभ्य गृहस्थांशीं माझा परिचय झाला होता. त्यामुळें, त्यानीं केसरी ऑफिस दाखवून तेथील मंडळींचा परिचय करून देण्याकरितां तेथेंच असलेल्या फुटाणे क्लबांत त्यांनी मला नेलें. त्या वेळीं तेथें रा. रा. ज. स. करंदीकर मुख्य संपादक केसरी, गीतावाचस्पति भिडेशास्त्री, प्रो. माटे, रा. धोंडूमामा साठे, विद्यानिधि चित्रावशास्त्री वगैरे मंडळी जमलेली होती. मंडळी पाहून मलाही आनंद झाला. विचार-विनिमय करून वर्णाश्रम स्वराज्यसंघ व हिंदुमहासभा यांचें सामान्य भूमिकेवर येऊन जुळलें तर बघावें असें वाटलें. पण माझे अध्यक्षतेखालीं झालेला कुर्तकोटींचा निषेध केसरी मंडळाला सहन न झाल्यामुळें माझेवर त्यांचा रोष झाला होता; हें मात्र तेथें जाण्यापूर्वी माझ्या लक्षांत आलें नव्हतें. म्हणून मी केवळ स्नेहभावानेंच बोलूं लागलों. पण पुढं जीं प्रश्नोत्तरें झालीं त्यावरून त्यांचा मजवर झालेला रोष चटकन माझ्या ध्यानांत आला. त्यांच्याशीं झालेलीं प्रश्नोत्तरें जशींच्या तशींच घरीं येऊन मी टिपून ठेवलेलीं आहेत. तींच येथें देतों म्हणजे झालें. मीं त्यांना प्रथमच सांगितलें कीं, मी वादाकरितां आलेलों नाहीं. केसरी ऑफिस पहावें व जुळल्यास येथील मंडळींशीं खासगी स्वरूपाची चर्चा करावी अशी माझी इच्छा आहे. ही चर्चा आपण केसरींत प्रसिद्ध करूं नये. रा. करंदीकरानीं ही गोष्ट कबूल केली. नंतर मी विचारलें कीं, केडगांवीं झालेल्या सनातनधर्मपरिषदेची बातमी केसरींत कां दिली नाहीं? ते म्हणाले, आमची इच्छा. नंतर रा. करंदीकरांनीं मला विचारलें कीं, काशींतील विश्वेश्वराच्या जागीं बांधलेली मशीद काशीकरांना कशी पाहववितें! मी म्हटलें, ज्याप्रमाणें शनवारवाड्यासमोरील मोटारस्टँड व पूर्वी त्या वाड्यांत असलेलीं सरकारी ऑफिसें पुणेंकरांना पाहववतात त्याचप्रमाणें. मुसलमानांना भिऊन विश्वेश्वर कसे पळाले! एका

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

व्याधाच्या हातून सहजगत्या शंकराच्या पिंडीवर बेल पडल्यामुळें त्याला मुक्ति मिळाली, तर मग अस्पृश्यांनीं देवळांत कां जाऊं नये ? व त्यांना मुक्ति कां मिळूं नये ? वगैरे वगैरे अनेक प्रश्न त्यांनीं मला केले. व मीही 'यादृशो यक्षः तादृशो बलिः,' या न्यायानें वरील नमुन्याप्रमाणेंच उत्तरें दिलीं. प्रो. माटे यांनी विचारलें कीं, म. म. पाठकशास्त्री पूर्वी अस्पृश्यतावादी होते. ते आतां अस्पृश्यतानिवारणवादी झाले. हें काय ? खरें काय समजावें ? मी म्हटलें हा प्रश्न त्यांनाच विचारा, व यावरूनच अस्पृश्यतानिवारणाला अनुकूल होणाऱ्या शास्त्री मंडळींना ओळखा.

एकानें विचारलें कीं, चऱ्हाटें महारच वळतात. तीं चऱ्हाटें देवाच्या रथाला चालतात तर मग महारांनीं रथ कां ओढूं नये ?

भिडेशास्त्रीबोवांनीं तर कमालच केली. ते म्हणाले, 'मूर्तिस्थापनेचा विधि तुम्हांला येतो का ?' मी म्हटलें नाहीं. त्यावर ते म्हणाले कीं, जर तुम्हांला मूर्तिस्थापनेचा विधि येत नाहीं तर अस्पृश्यांनीं देवळांत जाऊं नये असें म्हणण्याचा तुम्हाला काय अधिकार आहे ? हें ऐकून तर मला आश्चर्य वाटलें, हंसूं आलें व त्याबरोबर रागही पण आला. "तुम्ही लहानपणापासूनच अंध असल्यामुळें तुम्ही देऊळच पाहिलेलें नाहीं, तर अस्पृश्यांना देवळांत जाऊं द्या, असें म्हणण्याचा तुम्हांला तरी काय अधिकार ?" असें उत्तर देणार होतों; पण वृद्धांचा अपमान आपल्या हातून होऊं नये म्हणून मी कांहींच बोललों नाहीं. पण असले कोटिक्रम मलाही करतां येतील इतकें मात्र बोललों. असले प्रश्न विद्वान म्हणविले जाणाऱ्यांचे, तर मग बाकीच्या लोकांनीं कसे प्रश्न केले असतील याची कल्पनाच करावी. हा आमचा संवाद कोणाला खराही वाटणार नाहीं; पण ही सत्यकथा मी लिहिली आहे. या बैठकींत चित्रावशास्त्री होते, पण ते मात्र शेवटपर्यंत एक अक्षरही बोलले नाहींत.

असले प्रश्न व त्यांची ती आपणापेक्षां इतरांस कमी लेखण्याची वागणूक पाहून पूर्वी याच ठिकाणीं लो. टिळकांची वागणूक व त्यांच्याशीं

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

१९१५ मध्यें झालेला माझा संवाद यांची आठवण होऊन ह्या मंडळी-

बद्दल आश्चर्य वाटलें. "हे टिळकांचे अनुयायी व हें केसरी ऑफिसच आहे का ?" असा संशय येऊन "दूरस्थाः पर्वता रम्याः" दुरून डोंगर साजरे हेंच खरें असें वाटूं लागलें. माझेबरोबर असलेले रा. भिडे, रा. भाऊराव आठवले व रा. चिंतोपंत जोगळेकर यांनाही हा प्रकार पाहून खेद झाला.

श्रीमती रमाबाईसाहेब आपटे, कै. वा. हरि नारायण आपटे कादंबरीकार ह्यांचें कुटुंब, या नागपुरांतील डॉ. चोळकर यांच्या आत्याबाई असल्यामुळें नागपुरांत आल्यावर डॉक्टरसाहेबांबरोबर त्या प्रवचनास येत असत. त्यामुळें त्यांचा व माझा परिचय झालेला होता. म्हणून त्यांना भेटण्याकरितां मी मुद्दाम आनंदाश्रमांत गेलों. त्यावेळेस त्यांनीं आपल्या येथें ( आनंदाश्रमांत ) प्रवचन करण्याबद्दल मला फारच आग्रह केला. त्यांचेकरितां म्हणून आठ दिवस प्रवचन सांगण्याचें मी कबूल केलें, नंतर प्रवचन सुरू झालें. पंचदशी समोर होती, पण माझ्या नेहमीच्या स्वभावाप्रमाणें अनेक विषयांवर अस्ताव्यस्त प्रवचन जवळ जवळ दोन महिने चालू होतें. गर्दी इतकी होऊं लागली कीं, शेवटीं आनंदाश्रम अपुरा पडूं लागला. काशीहून घरची सर्व मंडळी पुण्यास आल्यामुळें भाड्यानें स्वतंत्र जागा घेऊन तेथें बिऱ्हाड करून राहिला. सर्व जातींचे, सर्व मतांचे स्त्रीपुरुष प्रवचनास येऊं लागले. कॉंग्रसमतानुयायी, हिंदुमहासभावाले, मध्व, लिंगाईत, वारकरी, सनातनी, वकील, मामलेदार, डॉक्टर, सरकारी पेन्शनर्स वगैरे लोक मोठ्या प्रेमानें यत असत. सकाळची सात वाजण्याची वेळ अतिशय गैरसोयीची असली तरी बायकांची फारच गर्दी होत असे. लोकांच्या आग्रहास्तव रात्रीं तुळशीबागेमध्यें आठ दिवस कृष्णशिष्टाईवर प्रवचन केलें. याशिवाय त्यावेळेस श्रीशंकराचार्यजयंत्युत्सव असल्यामुळें अनेक ठिकाणीं किरकोळ प्रवचनेंही झालीं. समाप्तीचे दिवशीं प्रो. चापेकर यांचें फारच सरस व्याख्यान होऊन "सनातन धर्मादर्श," व "वक्तृत्वकलावतंस," ह्या दोन पदव्या व मानपत्र पुणेंकरांनीं मला दिलें. रोख रुपयेही देशकालवर्तमान व माझी योग्यता

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ANA SIMHASAN JNANAMANDIR
LIBRARY
Jangamawadi Math, Varanasi
Acc. No. 3036



यापेक्षां पुष्कळच जास्त मिळाले. खडीवाले वैद्य यांनींही माझेकरितां फारच श्रम घेतले. आजपर्यंत पुष्कळ मानपत्रें मिळालीं, पण तीं सर्व संस्कृतश्लोकात्मक असून त्यांत नुसतें माझेंच अतिशयोक्तिपूर्ण वर्णन आहे. म्हणून तीं मीं सर्व दिलीं नाहींत. पण पुण्याचें मानपत्र मराठींत असून माझ्या प्रवचनांची व मतांची रूपरेषा दाखविणारें आहे आणि त्याबरोबरच पुणेंकरांची मार्मिक गुणग्राहकताही त्यामध्यें झळकत आहे म्हणून तें मी मुद्दाम येथें देतों.

## मानपत्र

ॐ नमो भगवते वासुदेवाय

### प्रशस्तिपत्र

### वे. शा. सं. भाऊशास्त्री वझे काशीकर यांचे चरणीं अर्पण

### श्लोक

काशीक्षेत्रस्थ विद्वन्मुकुटमणि वझे भाउशास्त्री पदातें ।
सद्भावें जोडुनीयां करयुगुल मुदें वंदितों मी तयातें ॥
झाला जो लाभ आम्हां अखिल जनगणां आज सद्दर्शनाचा ।
तेणें संतृप्त झालों निरसुनि अवघा ताप अस्मन्मनाचा ॥

वे. शा. सं. भाऊशास्त्री वझे हे मूळचे श्रीक्षेत्र काशी येथील राहणारे असून त्यांचें वास्तव्य, सहजासहजीं आपणां सर्वांच्या महद्भाग्यानें महाराष्ट्राचें केंद्र व सर्वतोपरी प्रसिद्धी पावलेलें जें पुण्यपत्तन येथें आज सुमारें दोन महिने झालें आहे.

शास्त्रीबुवांची यथासांग माहिती जरी आज कालाभावानें मिळवितां आली नाहीं तरी त्यांचें शिक्षण, अध्ययन, अध्यापन कसें व किती झालें असेल याची थोडी अंधुक कल्पना त्यांच्या प्रवचन सांगण्याच्या धर्तीवरून आपणां सर्वांस सहजच होईल. यांचा हा विद्याव्यासंग किती तरी दिवसांचा मुरलेला आहे. याची जाणीवही आपणांस होईल. यांनीं मोठमोठ्या

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

LIBRARY



गांवीं प्रवास करून आपल्या ज्ञानाचा लाभ अज्ञ जनांस करून दिला आहे, हल्लीं देत आहेत व पुढेंही देतील.

आज सतत दोन महिने प्रवचनें अखंड व निर्विघ्नपणें चालू आहेत. ही ईश्वरी कृपा तर खरीच; पण त्यांतले त्यांतही श्रोत्यावक्त्यांची फार थोर पुण्याई समजल्यास फारशी अतिशयोक्ति होणार नाहीं.

प्रवचनास लागणारीं जीं साधनें म्हणजे विद्वत्ता, भाषाशैली, उदात्त विचार, वाङ्मयात्मक नाना विषयांची यथास्थित माहिती, दृष्टांतदार्ष्टांत, तसेंच वेदांतासंबंधीं सिद्धांत, ठरीव प्रमेयें वगैरे सर्व मुख्य अंगें व उपांगें यांची सर्वांगसुंदर व निर्दोष माहिती शास्त्रीबुवांनीं करतलामलकवत् करून ठेवून तिचा उपयोग प्रसंगानुसार श्रोत्यांच्या चित्तावर ठसेल असाच केला आहे. शास्त्रीबुवांचें संस्कृतज्ञान किती अगाध आहे व त्यांचें शास्त्रीय विषयांवर किती प्रभुत्व आहे, याचें अनुमान आपण सर्वांनीं केलेंच असेल. यांची श्रोत्यांचे मनावर विषय ठसवून देण्याची पद्धति फारच उत्तम प्रकारची आहे. अवघड श्लोक सुलभपणें सांगत असतांना श्रोत्यांना आपण एखाद्या प्रसिद्ध विश्वविद्यालयांतील शास्त्र्यांच्या ( प्रोफेसरांच्या ) तोंडूनच व्याख्यान ऐकत आहोंत असें वाटतें. यांचें वाचन एकदेशी नसून सांप्रतच्या कालांत तें नव्याजुन्या मतांच्या लोकांस सारखेंच मान्य होईल असें, निर्भीडपणाचें असल्यानें आणि विशेषतः प्रवचनपद्धतीचा झोंक शास्त्रशुद्ध असल्यामुळें उभय मतांच्या श्रोत्यांस ते अत्यंत प्रिय झाले आहेत. यांचा नव्या मताशीं अगर सुधारणेशीं विरोध नसून सांप्रतच्या परिस्थितीचा सारासार विचार करून मग ग्राह्याग्राह्य मत ते प्रदर्शित करतात. तें करतांना राजकीय पक्षाची मर्यादा उल्लंघन न करतां तिचे कक्षेच्या आंत जेवढें म्हणून यथाशास्त्र, व नीतिला धरून व परिस्थितीस अनुरूप जें प्रसिद्धपणें सांगतां येईल तें सांगण्याचा प्रसंग ते सहसा वायां दवडीत नाहींत.

प्रवचनप्रसंगीं आपल्या म्हणण्याच्या पुष्टीकरणार्थ ते श्रुति, स्मृति, उपनिषदें, इतिहास, पुराणें, भारत, रामायण, भागवत इ. सर्वमान्य ग्रंथ, एकनाथ,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

श्रीज्ञानेश्वर, श्रीसमर्थ, श्रीमत् आचार्य, श्रीतुकाराम, नामदेव, कबीर इ. संतमहंतांच्या वचनांचा ते आधार देतात. तसेंच पूर्वीच्या काळीं आदर्शभूत झालेल्या सती अहिल्या, द्रौपदी इ. सन्मान्य स्त्रिया, अर्वाचीन मुक्ताबाई, मिराबाई इ. च्या वचनांचाही ते परामर्ष घेतल्याशिवाय राहात नाहींत. विशेष प्रसंगीं पाश्चात्य तत्त्ववेत्त्यांच्या तत्त्वांचा अनुवाद करण्यास ते चुकत नाहींत.

यांच्या अंगच्या सर्वोत्तम गुणांत श्रेष्ठपणानें शोभणारे गुण म्हणजे नियमितपणा व शांतपणा हे होत. यांच्या निरपेक्षतेची साक्ष कालच त्यांनीं केलेल्या भाषणावरून पटेल. तथापि ' न मागे तयाची रमा होय दासी ' या वचनाप्रमाणें त्यांचा आदर जनता शक्त्यनुसार आपण होऊन करते असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. यांनीं आपली प्रवचनाची ठरीव वेळ सहसा चुकविली नाहीं. त्यांचा नित्यक्रमही अगदीं नियमित चालत असून लोकांस आदर्शभूत होईल असा आहे. ते रिकामे असे बसलेले कधींच दिसत नाहींत. कोणाही जिज्ञासूची शंकानिवृत्ती ते प्रेमळ मनानें व गोड शब्दानें करतात. विषय कसाही विकट असो, पण तो श्रोत्यांच्या मनावर उत्तम रीतीनें ठसवावयाची हातोटी त्यांना अत्युत्तम साधली आहे. ते विषय प्रतिपादितांना अगदीं सामान्य व्यवहारांतील दाखले व कथानकें योजून जिज्ञासूंची तहान भागवितात. त्यांची ईश्वरावर श्रद्धा, सद्‌गुरुवचनावर दृढ विश्वास, भगवन्नामग्रहण व स्वस्वरूपचिंतन यांवर विशेष कटाक्ष असल्यानें त्या त्या विषयांचा ते मोठ्या कळकळीनें व अंतःकरणापासून श्रोत्यांस व जिज्ञासूंस उपदेश करून त्यांचीं मनें आल्हादित करून सोडतात.

अशा विभूतीस ईश्वरानें दीर्घायुष्य देऊन त्यांच्या बोधामृताचा लाभ आपणांस वारंवार द्यावा अशी त्या जगन्नियंत्याजवळ प्रार्थना करणें हें आपलें कर्तव्य आहे व तें आज आम्ही यथाशक्ति बजावीत आहोंत. तें परमेश्वरचरणीं रुजू असो.

एकंदरींत वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें शास्त्रीबुवांच्या अंगच्या गुणांचा व त्यांनीं श्रोत्यांस करून दिलेल्या ज्ञानाचा लाभ या सर्वांनीं आदरपूर्वक

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

गौरव करून हें प्रशस्तिपत्र आम्ही अखिल सनातनी ब्रह्मवृंद एकमतानें त्यांचे चरणीं अर्पण करीत आहोंत. इत्यलम्.

शुभं भवतु

आपले नम्र,

विष्णु नारायण वर्तक, गंगाधर बाबा देशपांडे, वामन गणेश गाडगीळ, ह. का. खासगीवाले, हरिद्वारी जनार्दन महादेव, रघुनाथ चिंतामण सोहनी, धोंडो कृष्ण साठे, रा. दा. जोग, श्रीपाद बाजी जोग, वामन अनंत वेलसरे, श्रीकृष्ण नीलकंठ चापेकर, (वगैरे अनेक श्रोते).

पुण्यांतील हे दोन महिने फारच आनंदांत गेले. पुणेकरांनीं मला फारच ममतेनें वागावलें. कोणी वितंडवाद केला नाहीं अगर कुत्सित शंकाही विचारल्या नाहींत. पुण्यांत राहण्याबद्दल लोकांनीं मला फारच आग्रह केला. या दोन महिन्याच्या अवधींत चालकांच्या विनंतीवरून अनेक संस्थांना भेटी दिल्या. वेदशास्त्रोत्तेजक सभेनें घेतलेल्या परीक्षेसमयीं वेदांतविषयाचा परीक्षक होतों. वेदशास्त्रोत्तेजक सभेनें माझा सत्कार करून एक शाल दिली. अनाथ विद्यार्थिगृह, शंकराचार्य मठ, वर्णाश्रम स्वराज्यसंघ, सनातनधर्मरक्षक मंडळ वगैरे संस्थाना यथाशक्ति मी देणग्या दिल्या. असा हा दोन महिन्यांचा गोड मुक्काम हलवून पुणेकरांच्या इच्छेविरुद्ध मी नागपुरास गेलों. माझ्या प्रवचनांची सविस्तर हकीकत छापण्याकरितां केसरीजवळ टाईमच शिल्लक नव्हता. नाहीं तर बातमी आल्याशिवाय राहिली नसती खास !

नागपुराहून काशीस जाऊन मुलीचें (सुशीला) लग्न १९३७ च्या ज्येष्ठ कृष्ण ६ रोजीं वे. मू. बापुदीक्षित पितळे यांचे चि. भाऊदीक्षित यांच्याशीं केलें. मुलीचें लग्न व मुलाचीं दोन लग्नें अशीं तिन्ही कार्यें शारदा कायदा मोडून केलीं. लग्न आटोपल्यावर भयंकर आजारी पडलों. जगण्याची जवळ जवळ आशाच नव्हती पण त्यांतून बरा होऊन नागपुरास गेलों. येथपर्यंत हीं अनेक धडामोडींचीं चौदा वर्षें (नागपुरांत) गेलीं व

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्याबरोबर संबंध आयुष्याचा पन्नास वर्षें पूर्ण झालीं.

येथें माझ्या चित्रपटाचा दुसरा अंक संपतो.

अंक तिसरा.

# पुण्यांत आगमन १९३९

स्वभावजेन कौंतेय निबद्धः स्वेन कर्मणा ।
कर्तुं नेच्छसि यन्मोहात् करिष्यस्यवशोऽपि तत् ॥

नागपुरांत असतांना १९३९ च्या एप्रिल व मे महिन्यांत पुनः भयंकर आजारी पडलों. ह्यावेळीं तेथें मी अगदीं एकटाच होतों. अशा वेळीं माझ्या शेजारीं रहात असलेले रा. प्रल्हादराव फडणीस व रा. गणपतराव ऊर्फ नाना गद्रे व त्यांची मंडळी ह्यांची मला फारच मदत झाली. त्यांनी तारा करून घरच्या सर्व मंडळींना बोलावून घेतलें. नंतर थोडें बरें वाटूं लागलें. त्यावेळीं मी मनांत असें ठरविलें होतें कीं, आतां यापुढें प्रवचनादि सर्व ऐहिक कार्यक्रम बंद करून, आपलें उर्वरित आयुष्य काशींत गंगातीरावर बसून, ईशचिंतनांत घालवावें. त्याप्रमाणें निरवानिरवहि पण केली. परंतु योगा-योगामुळें, प्रकृतीस जास्त बरें वाटावें असा लोभ उत्पन्न होऊन हवापाणी पालटण्याकरितां पुण्यासच यावेसें वाटलें. त्याप्रमाणें चि. रामचंद्रास बरो-बर घेऊन पुण्यास आलों. येथें आल्यावर प्रकृतींत पुष्कळच सुधारणा झाली. पूर्वी १९३६ सालीं आनंदाश्रमांत माझीं प्रवचनें झालेलीं असल्यामुळें बऱ्याच पुणेकर मंडळींशीं माझा निकट परिचय झाला होता. त्यामुळें अनेकांनीं मला प्रवचनांचा आग्रह केला. परंतु मी नुकताच आजारीपणांतून उठलों होतों, व अशक्तपणा चांगलाच जाणवत होता. त्यामुळें कोठे तरी बिऱ्हाड मांडून रहावें, प्रवचनाकरितां एखाद्या देवळाची भिक्षा मागावी आणि तेथें रोज प्रवचन करावें, इतकी दगदग सोसण्याचे सामर्थ्य व इच्छा माझ्यामध्यें राहिली नव्हती. म्हणून परत नागपुरास गेलों. मी नागपुरास पोहोचतों न पोहोचतों तोंच, माझें प्रवचन ऐकण्यास मिळालें नाहीं म्हणून तळमळ-णाऱ्या अनेक मंडळींपैकीं रा. वामन हरि जोशी (तात्या) श्री. रमाबाई-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

साहेब आपटे ( आनंदाश्रम ) व श्री. पार्वतीबाई लिमये यांनीं पुण्यास परत येण्याकरितां माझेवर पत्रांची सरबत्तीच सुरू केली. त्यामुळें माझा पूर्वीचा सर्वसंगपरित्यागाचा बेत रहित होऊन मी पुण्यास खेंचला गेलों. घरच्या सर्व मंडळींना काशीस पाठवून ता. १२–७–३९ रोजीं पुण्यास येऊन श्री. पार्वतीबाई लिमये (७२२ सदाशिव) यांचे घरीं उतरलों. बाईंचा परिचय प्रथम काशी येथें झालेला होता व नंतर १९३६ सालीं मी पुणें येथें प्रवचनाला असतांना तो विशेष दृढावला. श्री. लिमयेबाई या प्राचीन श्रीमंत घराण्यांतील आहेत. तरुण व सुशील एकुलत्या एक पुत्राच्या वियोगानें त्या सर्व बाजूंनीं दुःखीकष्टी झाल्या आहेत. त्यामुळें माझ्या येण्यानें त्यांना समाधान मानून घेण्यास जागा झाली. त्यांनीं मला मोठ्या आदरानें आपल्या देवघरांतच आश्रय दिला आहे. व घरच्या प्रमाणेंच माझी सर्व व्यवस्था ठेविली आहे. सदाशिव पेठेंतील खुन्या मुरलीधराचे मालक रा. गोविंद पांडुरंग खरे यांनींहि मोठ्या प्रेमादरानें आपल्या देवळांत मला प्रवचनास जागा दिली. त्याप्रमाणें ता. १७–७–३९ रोजीं वेदस्तुतीवर प्रवचनास आरंभ केला.

## श्री खुन्यामुरलीधर

मल्लानामशनिर्नृणां नरवरः स्त्रीणां स्मरो मूर्तिमान् ।
गोपानां स्वजनोऽसतां क्षितिभुजां शास्ता स्वपित्रोः शिशुः ॥
मृत्युर्भोजपतेर्विराडविदुषां तत्त्वं परं योगिनाम् ।
वृष्णीनां परदेवतेति विदितो रंगं गतः साग्रजः ॥१॥

या मुरलीधराचें ' खुन्या मुरलीधर ' हें नांव पडण्याचीं कारणें अनेक लोक अनेक सांगतात.

जयपूर येथील कुशल मूर्तिकार बखतराम ह्यानें ही मूर्ति केली. त्यानें पुनः अशी मूर्ति करूं नये म्हणून त्याच्या हाताचे आंगठे कापण्यांत आले, असें कांहींचें म्हणणें आहे. कोणी म्हणतात, या कारागिराचा खून करण्यांत आला. अलीकडील कांहीं लोक या नांवाचा संबंध येथील चाफेकर प्रकरणाशीं

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पं. भाऊशास्त्री वझे ( पुणें १९३९ )




ब्लॉक व छपाई [illegible] प्रेस पुणें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

जोडून देवालयानजीकच झालेल्या द्रविडबंधूंच्या खुनाशीं लावतात. परंतु हीं सर्व विधानें निखालस खोटीं आहेत.

श्रीमुरलीधराची स्थापना झाली तो पेशवाईच्या अखेरीचा व क्रान्तीच्या धुमाकुळीचा काळ होता. या काळांत झालेल्या अस्मानी सुलतानीमध्यें मंदिरासंबंधीं संपूर्ण माहिती देणारीं अस्सल कागदपत्रें अस्तित्वांत राहिलीं नाहींत. त्यामुळें मंदिराचा यथार्थ इतिहास मिळणें कठीण झालें आहे. परंतु ऐतिहासिक लेखसंग्रहांतून मिळणाऱ्या माहितीवरून (मिरजेचे वा. वा. खरे ह्यांचे ऐतिहासिक लेखसंग्रह भाग १० पत्र क्रमांक ३९५२ पान क्रमांक ५१२६) त्याचप्रमाणें श्री. खरे (देवस्थानचे सध्यांचे मालक व वहिवाटदार) ह्यांचे घराण्यांत परंपरागत चालत आलेल्या माहितीवरून व श्रीमंत सरदार नानासाहेब फडणीस (सं. बेलबाग) ह्यांनीं दिलेल्या माहितीवरून खुन्या मुरलीधर हें नांव पडण्याचें कारण सांपडतें तें तर्कशुद्ध व विश्वसनीय वाटतें.

शके १७१९ (इ. स. १७९७) मध्यें श्री. रा.रा. सदाशिव रघुनाथ ऊर्फ दादा गद्रे यांनीं आपल्या बागेंत श्रीमुरलीधराची स्थापना केली. दादा गद्रे हे पेशव्यांचे सावकार होते. शनिवार पेठेंतील गद्रेवाडा (हल्लीं येथें अनाथमहिलाश्रम आहे) व आप्पा बळवंत चौकांतील किबेवाडा म्हणून हल्लीं प्रसिद्ध असलेला वाडा--(या वाड्यामध्यें ज्ञानप्रकाशचें ऑफिस असतांना वाड्यास आग लागली. हल्लीं कांहीं भागांत प्रभात टॉकी थिएटर आहे) हे दोन्ही दादा गद्रे यांचे रहाते वाडे होते. पेशवाईमधील राजकारणी पुरुष नाना फडणीस, यांस दादा गद्रे यांची मुलगी दिली होती. अशा गद्रे व फडणीस यांचा निकटचा आप्तसंबंध होता. बखतराम याजकडून दादा गद्रे यांनीं मुरलीधराची मूर्ति करविली. ती अत्यंत सुरेख उतरलेली पाहून महत्त्वाकांक्षी नाना फडणिसांस ती मूर्ति आपणाला मिळावी असें वाटलें. त्याप्रमाणें त्यांनीं दादा गद्रे यांजकडे मागणी केली. गद्रे यांनीं मूर्ति दिली नाहीं. मूर्तीसंबंधीं सासरे-जावयांत तेढ उत्पन्न झाली. मूर्ति मिळण्याकरितां नानांनीं कारस्थान रचलें. येथील बेटावर असलेल्या ईस्ट इंडिया कंपनीच्या वकिलाकडे गुप्तपणें लिहिलें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मुरलीधराची मूर्ति गद्रेवाड्यांतून प्राणप्रतिष्ठेकरितां देवळाकडे नेण्यांत येईल त्यावेळीं वाटेवरच छापा घालून ती हस्तगत करून नानांकडे पोहोंचती होईल अशी व्यवस्था करण्यांत आली. या कामावर मेस्तर बेट (Mister Boyed याचा अपभ्रंश) याची नेमणूक झाली. दादा गद्रे यांनीं मूर्तीच्या मिरवणुकी-करितां निमंत्रणें देऊन मिरवणुकीची जय्यत तयारी केली. कांहीं दगाफटका होणार हें त्यांस गुप्त हेरांकडून कळलें असतांही त्यांनीं कांहींच माहिती नस-ल्याचा बहाणा करून मूर्ति रातोरात गुप्तपणें मंदिरांत आणवून ठेविली. दादा गद्रे श्रीमंत सावकार होते. हुंड्या परगांवीं पोहोंचविणेचे वेळीं संरक्षणार्थ त्यांनीं दोन-अडीचशें अरब पदरीं ठेविले होते. या अरबांस गद्रे यांनीं मंदिराचे संरक्षणार्थ बाहेर ठेवून मंदिराचे रस्त्यांची नाकेबंदी केली. ठरल्याप्रमाणें मेस्तर बेट आपले लोक घेऊन गद्रेवाड्यापासून मंदिराचे रोखानें निघाला. वाटेंत कोठेंही मूर्ति न आढळल्यामुळें थेट मंदिरापर्यंत येऊन पोहोंचला. मंदिराचे आवारांत शिरून मूर्ति मिळविण्याचा त्याचा इरादा होता. गद्रे यांच्या अरबांनीं त्यांस रोखतांच चकमकीस सुरुवात झाली. दोनही बाजूंचीं शेंपन्नास माणसें ठार झालीं. मंदिरांत मूर्तीवर प्राणप्रतिष्ठेचा वैदिक मंत्रांनीं अभिषेक होत असतांनाच मंदिरा-बाहेर मुडद्यावर मुडदे पडत होते, हा हृदयभेदक देखावा लोकांच्या दृष्टीस पडला. स्थापनेच्या वेळींच मूर्तीकरितां खून पडले म्हणून ह्या मुरलीधरास त्या वेळेपासून 'खुन्या मुरलीधर' ह्या नांवानें संबोधण्यांत येऊं लागलें. प्राणप्रतिष्ठा होऊन गेल्यामुळें मूर्ति मिळणें अशक्य झालें हें पाहून नाना फडणिसांनीं मेस्तर बेट याजकडून खुन्यामुरलीधरप्रकरणीं काम यशस्वी झालें नाहीं म्हणून बेटला कामावरून दूर केलें व त्या जागीं मि. टोन यांस नेमलें. आपल्याच सासऱ्याच्या मूर्तीवर उघडपणें छापा घालून मूर्ति पळविणें नानांस कमी-पणाचें कसें वाटलें नाहीं हें आश्चर्य आहे. कोणताही वाईटपणा न येतां मूर्ति हस्तगत करण्याचा हा नानांनीं केलेला प्रच्छन्न डाव पूर्णपणें फसला.

दुसऱ्या बाजीरावांच्या कारकीर्दींत नाना फडणीस व त्यांचे पक्षपाती लोक यांचा अनन्वित छळ झाल्याचें प्रसिद्ध आहे. नाना फडणीस यांचे-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

बरोबर दुसरे कित्येक लोकांस बाजीरावानें कैदेंत टाकलें होतें. दादा गद्रे यांचें बरेंच मोठें कर्ज पेशव्यांवर होतें. दादा गद्रे यांस तुरुंगांत डांबून ठेवून त्यांची चीजवस्त जप्त करून कर्जातून मुक्त होण्याचा हा सोपा मार्ग रावबाजींनीं अवलंबिला. दादा गद्रे यांचे राहते वाडे, बाग व मंदिरही जप्त करण्यांत आलें. पेशवाई बुडल्यानंतरही कित्येक वर्षें दादा गद्रे तुरुंगांत होते. अव्वल इंग्रजी सुरू झाल्यावर इ. स. १८३५ च्या सुमारास दादा गद्रे तुरुंगांतून सुटले. पेशव्यांचे जागीं कंपनी सरकार येऊन सर्व अधिकार चालवूं लागल्या-मुळें कंपनी सरकारास जबाबदार धरून दादानीं पेशव्यांकडून येणें असलेलें कर्ज आणि त्यांनीं आदावतीनें जप्त केलेली मालमत्ता परत मिळण्याची खटपट चालविली. कंपनी सरकारांतून दादा गद्रे यांस त्यांच्या स्थावर मिळकतीपैकीं त्यांचा बाग, मंदिर व लगतचा बंगला हीं परत मिळालीं. सालीना पांच हजार रुपये पेन्शन, चरितार्थाकरितां सुरू करण्यांत आलें. गद्रे व खरे घराण्यांचा संबंध मालक व कारभारी असा कित्येक पिढ्यांचा होता. त्यामुळें दादा गद्रे यांनीं त्यांस परत मिळालेली बाग, बंगला व मंदिर खरे यांच्या स्वाधीन केलें. ज्या ठिकाणीं सोन्याचीं फुलें उधळलीं त्या ठिकाणीं गोवऱ्या वेंचित बसण्याची वेळ आलेली पाहून या स्वाभिमानी पुरुषानें नाशिक क्षेत्रीं जाऊन संन्यास घेतला. सालीना मिळणाऱ्या पेन्शनमधून कांहीं रक्कम गद्रे दरसाल खरे यांस देत असत व उरलेल्या पैशांचा दानधर्म करीत. दादा गद्रे नाशिक येथेंच नारायणरूप झाले.

दादा गद्रे यांनीं देवाची स्थापना केल्यापासून मंदिराची व्यवस्था रा. खरे यांचेकडेच होती. मध्यंतरीं गडबडीच्या काळांत कांहीं काळ मंदिर पेशव्यां-तर्फे नेमलेल्या इसमांच्या ताब्यांत होतें, तरी मंदिराची व्यवस्था मात्र रा. खरे यांचेकडेच राहिली होती. दादा गद्रे यांनीं मंदिर खरे यांच्या स्वाधीन केल्या-पासून आजपर्यंत हें मंदिर खरे यांच्याच पूर्णपणें कबजांत आहे. मंदिराची सर्व व्यवस्था खरे मंडळींनीं फारच उत्तम ठेविली आहे. पूर्वीपासून चालत आलेले सर्व उत्सवमहोत्सव त्यांनीं मोठ्या कळकळीनें व हौसेनें अव्याहत चालू

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ठेविले आहेत. कार्तिक महिन्यांतील काकडआरती व विशेषतः रांगोळीचे गालिचे अत्युत्तम काढण्याविषयीं या मंदिराची सर्व शहरांत फार मोठी ख्याति आहे.

अशा या ऐतिहासिक महत्त्वाच्या मंदिरांत माझ्या प्रवचनाचा कार्यक्रम सुरू असल्यामुळें व लोकांनाही मंदिराचा इतिहास यथार्थ कळावा म्हणून मी माझ्या स्वभावाप्रमाणें विषयांतर करूनही हा इतिहास जरा विस्तारानें दिला आहे.

येथील प्रवचनास १९३६ प्रमाणेंच सर्व जातींचे सर्व मतांचे व सर्व पेशांचे लोक व कधीं कधीं त्यांचे नवे जुने पुढारीही येतात. अशा रीतीनें हा प्रवचनांचा कार्यक्रम चालू आहे.

हा पुण्यांतील प्रवचनांचा प्रसंग म्हणजे माझ्या चित्रपटाच्या तिसऱ्या अंकाचा प्रारंभच होय. ह्या अंकाचा आरंभ अशा रूपांत होईल हें माझ्या ध्यानींमनींही नव्हतें. पण शेवटी 'करिष्यस्यवशोऽपि तत्' हें भगवत् वचनच खरें ठरलें. या अंकाचें भरतवाक्य कोठें, केव्हां व कोण करणार तें त्या मुरलीधरालाच माहीत !

शके १८६१ कार्तिक शुक्ल पौर्णिमा २६–११–१९३९ पुणें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# परिशिष्ट १.

॥ श्रीः ॥ ग्वाल्हेर स्टेशनरोड.
ता. २७-११-३९

रा. न. वि. वि. आपलें पत्र येऊन बरेच दिवस झाले. इतर कामामुळें उत्तरास उशीर झाला. अद्यापि वेळ व मनःस्वास्थ्य असावें तेवढें नसल्यामुळें माझ्या सुदैवानें आपण मजवर सोंपविलेली कामगिरी योग्य रीतीनें पार पाडतां येणार नाहीं ह्याचें वाईट वाटतें.

प्रथम माझे परमप्रिय मित्र पण्डित भाऊशास्त्री वझे यांचें चरित्र लिहून प्रसिद्ध करण्याचा आपण म्हणजे पुणेकरांनीं विचार केला याबद्दल मी त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करितो. अलीकडच्या धामधुमीच्या व सुधारणेच्या काळांत सुद्धां पुण्यानें आपल्या गुणज्ञतेचा पेशवाईपासून चालत आलेला लौकिक कायम ठेविला, हें पाहून संतोष होतो. भाऊशास्त्री यांचें चरित्र लिहून आपण प्राचीन परम्परेच्या एका खऱ्या विद्वानाचा व त्या निमित्तानें आमच्या शास्त्री पण्डितांचाच गौरव केला असें मी समजतों. अनायासेंच या योगानें ज्या ज्या महापण्डितांजवळ शास्त्रीबुवांनी अध्ययन केलें व ज्या ज्या सत्पुरुषांचा त्यांचेवर अनुग्रह झाला, अशा महात्म्यांची थोडी बहुत ओळख वाचकांना होऊन जाईल.

शास्त्रीबोवांचे विद्वत्तेबद्दल व वक्तृत्वाबद्दल माझ्यापेक्षां फार मोठ्या अधिकारी पुरुषांनीं वर प्रशंसा केलीच आहे. हिन्दुस्थानांतील ज्या ज्या प्रान्तांत त्यांचे जाणें झालें, तेथील सर्व मताचे सर्व वयाचे व सर्व दर्जाचे हजारो श्रोते त्यांच्या प्रवचनपटुत्वाची साक्ष देतील. त्याबद्दल मी लिहिण्याची गरज नाहीं. माझा शास्त्रीबुवांशी प्रथम परिचय सन १९०६ मध्यें मी एम्. ए.'चा अभ्यास करीत असतांना झाला. आणि त्यानंतर सारखी कांहीं वर्षें सहवासाचा योग आला नसला तरी, गेली बत्तीस वर्षें एकवार घडलेला स्नेह अखंडित पत्रव्यवहारानें व मधून मधून होणाऱ्या भेटीमुळें आजपर्यंत

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तसाच कायम आहे. यामुळें त्यांच्या खाजगी व्यवहाराची स्वभावाची व गुणावगुणांची चरित्रकारांस जेवढी आवश्यकता आहे तेवढी आठवणी-वरून व मजजवळ असलेल्या पत्रांवरून देण्याचा माझा प्रयत्न कितपत सफल होईल हें सांगवत नाहीं.

सन १९०१ सालीं मी हिन्दुकॉलेजमध्यें शिकत असतां प्रथम शास्त्री-बोवांची बालमूर्ती ब्रह्माघाटावरील शिवगोविन्दधाम मठांत आपले वडीलांचे ऐवजीं पुराण सांगतांना पाहिल्याचे मला स्मरतें. माझें वय तेव्हां १८ वर्षांचें असलें तरी, त्या तेजस्वी बालमूर्तीस व्यासपीठावर बसून निर्भयपणें अस्खलितवाणीनें पुराण सांगतांना पाहून मला अत्यन्त कौतुक वाटे. त्या मठांत वाचनालय असल्यामुळें रोज संध्याकाळीं कॉलेजांतून आल्यावर माझा तेथें जाण्याचा परिपाठ असे. या स्वारीचा परिचय होऊन त्याचे आजन्म स्नेहांत रूपान्तर होईल ह्याचें त्यावेळीं मला स्वप्नसुद्धां नव्हतें.

शास्त्रीबोवांचा परिचय केव्हां व कसा झाला तो दिवस व तो प्रसंग आठवत नसला तरी सन १९०६ मध्यें एम्. ए. च्या अभ्यासाकरितां मी काशीस आल्यावर थोड्याच दिवसांत त्यांचा परिचय झाला. आमच्या दोघांच्या वयांत ६–७ वर्षांचें अंतर असलें तरी, कांहीं समानधर्मांमुळें लव-करच आमचा स्नेह जडला काशींतील महाराष्ट्रीय समाजांत एकिकडे अगदीं वेदपाठी ब्राह्मण, तर दुसरीकडे अर्धवट इंग्रजी शिकलेले परंतु जुने संस्कार नाहींसे झालेले आणि नवेहि चांगले संस्कार उत्पन्न न झालेले असेच लोक बहुधा असत. त्यामुळें अगदीं बालवयापासून या दोन्हीही प्रकारच्या संगतींचा त्यांना मनापासून तिटकारा असे. पूर्वसंचित वाडिलांचा आदर्श, सत्पुरुषांचा समागम आणि सुसंस्कृत अशा जुन्या व नव्या पण्डितांचा सहवास या कार-णामुळें, व पुढें आपल्या गंगाजलाप्रमाणें निर्मल व पवित्र अशा वर्तनानें, आणि ' अन्तस्त्यागी बहिः संगी ' या वृत्तीमुळें, त्यांनीं समाजांत फार मोठें स्थान मिळवावे अशी भवितव्यता असल्यामुळें, काशींतील समाजांत सामा-न्यतः दिसून येणारें कोणतेहि व्यसन त्यांना शिवलें नाहीं. त्यांचे उभयतां

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

शास्त्रगुरु पूज्यपाद पण्डित श्रीनित्यानंदशास्त्री व पूज्यपाद पण्डित लक्ष्मण-शास्त्री द्रविड हे माझेहि गुरु असल्यामुळें आमची गट्टी जमली. पुढें साहित्य-शास्त्राचें अध्ययन शास्त्रीबोवांनीं गुरुवर्य श्रीगंगाधरशास्त्री तैलंग यांचेकडे केलें. ते माझेहि गुरु होते. पूज्यपाद पण्डितजींकडे आम्ही कांहीं पाठांत सहाध्यायी होतों. दर्शनशास्त्रें आणि त्यांतून वेदान्तशास्त्र आणि तसेंच साहित्यशास्त्र यांकडे शास्त्रीबोवांचा लहानपणापासूनच कल होता. आणि पुढेंहि याच शास्त्रांचा तात्विक अभ्यास संस्कृत-वाङ्मयांतून व जुन्या प्रासादिक मराठी धार्मिक-वाङ्मयांतून त्यांनीं केलेला माझ्या चांगला आठवणींत आहे. श्रीमत् भागवताचें बाळकडूच ज्यास घरीं लहानपणीं मिळालें व ज्यानें तें आत्मसात करून घेतलें आणि आचरणांत उतरविलें त्याचें काया वाचा व मन तिन्हीहि पूर्ण सुसंस्कृत झाल्यास आश्चर्य नाहीं. प्राचीन पण्डितांत प्राकृत वाङ्मयाबद्दल दिसून येणारी उपेक्षाबुद्धि ह्यांचे ठिकाणीं मुळींच नव्हती. ह्याचें कारण ह्यांच्या शास्त्रगुरूंचा जुन्या संतवाङ्मयाबद्दल अत्यंत आदर होता हें होय. आमचे परमगुरु श्रीशांताश्रममहाराज ह्यांची लहानपणापासून शास्त्री-बुवांवर फार कृपा होती. तसेंच आपले गुरु पण्डित लक्ष्मणशास्त्री यांचे-प्रमाणें अद्वैतस्वामींचा मठ, तारकमठ वगैरे मठांत प्रस्थान त्रयीवर प्रवचनें केल्यामुळें त्यावेळचे मोठमोठ्या यतिवर्यांच्या संगतीचा यांना लाभ घडला. गोभक्तशिरोमणि चौंडेमहाराज नुकतेच काशींत आले होते. त्यांनीं स्थापि-लेल्या राममंदिरांत भजन करतांना लोकलज्जा सोडून नाचतांना यांना पुष्क-ळांनीं पाहिलें असेल. शास्त्रीबोवांनीं २–४ वेळां कीर्तनहि केलें होतें. तें मला इतकें आवडलें कीं, त्यांनीं कीर्तनकार व्हावें असा मी आग्रह धरला. परन्तु कीर्तनास लागणाऱ्या गायनाचें विशेष अंग नसल्यामुळें किंवा कोण-त्याही कारणानें त्यांनीं तो नाद सोडून दिला. काशीचे प्रसिद्ध कीर्तनाचार्य रामचंद्रबुवा चांदवडकर यांचें शास्त्रीबोवांवर फार प्रेम असे. आणि याचें कारण, बोवांची गुणग्राहकता हेंच होय. मी काशीस गेल्यापासून तरी अन-ध्यायाचे दिवशीं किंवा वेळांत वेळ काढून आम्हीं संगतीनें किंवा कधीं

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

बाहेर हिंडावयास जात असूं. त्यावेळीं होणाऱ्या भाषणांतील विचारांचा पोक्तपणा त्यांच्या वयाच्या मानानें खरोखरच कौतुकास्पद वाटत असे. त्यांचें गार्हस्थ्य विशेष समाधानकारक नसतांनाहि त्यांच्या मनाची शांति कायम राहिली. इतकेंच नव्हे तर, प्रतिकूल परिस्थितीमुळें त्यांची तशी वृत्ति बनण्यास मदतच झाली. त्यांच्या पत्रांतील कांहीं उतारे मी पुढें देणार आहें त्यावरून अगदीं लहानपणापासून विवेक, वैराग्य, निस्पृहता, त्याग इत्यादि गुणांचा त्यांच्या ठिकाणीं होत असलेला विकास पहावयास सांपडतो. संत आपल्या जन्मभूमीस उजवे जात नाहींत या अनुभवावरून शास्त्रीबोवांनीं काशींतील संकुचित क्षेत्रांतून बाहेर पडावें असें माझें मत मी त्यांना नेहमींच सांगत असें. माझ्यासारख्या मित्रांच्या म्हणण्यापेक्षां ईश्वरी प्रेरणेनेंच त्यांना बाहेर आणिलें. पुढें श्रीनारायणमहाराज यांचे सान्निध्यांत आणि नंतर नागपुरांत व इतर ठिकाणीं विद्या, सदाचार व वाक्पटुत्व यामुळें त्यांची समाजावर कशी छाप बसली हें सर्वश्रुतच आहे. संसारतापानें तप्त झालेल्या जीवास सुदैवानें लाभलेल्या शास्त्रीबोवांसारख्या मित्रांचीं मधून मधून येणारीं पत्रें म्हणजे एक प्रकारचें अमृतसिंचनच होय. हें मी स्वानुभवावरून लिहीत आहें. शास्त्रीबोवांचे हजारों चहाते असतील आणि मोठमोठे स्नेही असतील, प्रत्येकास आपण हवेसे वाटावें असें करून टाकण्यासारखे गुण त्यांच्या अंगीं आहेत. आत्मनिरीक्षण करीत असतां पदोपदीं स्वतःमध्यें असणाऱ्या अनेक दोषांची मला जाणीव होते. तेव्हां या माझ्या १।२ स्नेह्यांचा मजवर अकृत्रिम व अकारण लोभ कां असावा हे शोधीत असतां केवळ "व्यतिषजति पदार्थानान्तरः कोऽपि हेतुः, न खलु बहिरुपाधीन्प्रीतयः संश्रयंते " असेंच म्हणावें लागतें.

यावरून शास्त्रीबोवांत मनुष्यसुलभ दोष मुळींच नाहींत असें नाहीं. त्यांच्या कांहीं ठराविक आवडीनिवडी आहेत. कांहीं विशिष्ट स्वभावाचींच माणसें त्यांना पसंत असतात. त्यांच्या मर्जीविरुद्ध कोणतीहि गोष्ट त्यांना खपत नाहीं व ती झाल्यास त्यांचेकडून सहसा क्षमा होत नाहीं. अशा

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

किरकोळ स्वभावांतील वैचित्र्यापलीकडे मला ठळक असे दोष दिसले नाहींत. ह्याचें कारण, " सर्वः कान्तं आत्मीयं पश्यति " हेंहि असूं शकेल. शास्त्रीबोवांला दुटप्पीपणा किंवा लटपट यांची  र ची  आहे. ते स्वतः अगदीं सडेतोड असल्यामुळें इतरांकडूनहि तशाच वागणुकीची ते अपेक्षा करतात.

गेल्या ३२ वर्षांत असे कित्येक रोमहर्षण प्रसंग आले कीं, जेव्हां आम्ही स्वतःस विसरून अगदीं समरस झालों. असें समरस करून घेण्याची अजब जादू शास्त्रीबोवांजवळ काय आहे हें त्यांचा ज्यांना सहवास घडला ते सुद्धां सांगूं शकतील किंवा नाहीं याची मला शंकाच आहे. पुढील २।३ पृष्ठांत मजजवळ असलेल्या कांहीं पत्रांतील उतारे देत आहें.

पत्र नं. १ ता. ८–२–१२.

चैन न पडतां तेथें नाथादिक मित्र सज्जन करावे ।
तद्ग्रंथोक्तविचारें रमवावें इंद्रियास अकरावे ॥

पत्र नं. २ ता. १८–१०–१३.

"ज्या तीर्थांत स्नानें करूनहि मलनिवृत्ति होत नाहीं अशा चार काय पण शंभर तीर्थांत स्नानें करून काय उपयोग ? अशा तीर्थांत स्नान करावें कीं, पुनः स्नान करण्याची पाळी येऊं नये व त्रिकाळीं मलसंसर्ग होऊं नये तोच पुरुषार्थ."

" मीं पुढें यावें अशी आपली इच्छा. पण कोणत्या रूपानें यावें हाच संशय आहे. काय अमुक साहेबांचे हे नोकर आहेत किंवा स्वतंत्र रूपानें? नौकरींत कितपत सुख आहे हें आपण अनुभवितच आहां. वस्तुतः विचार केला असतां पारतंत्र्यापेक्षां स्वातंत्र्यांत सुख आहे हें कोणीहि कबूल करील व माझीहि इच्छा अशीच आहे. परंतु प्रारब्धाची इच्छा काय असेल ती ईश्वरासच माहीत "

पत्र नं. ३ ता. २४–५–१३.

" ईश्वर करो कीं, या यःकश्चित् उदरपूर्तीकरितां धनमदोन्मत्त शूद्रप्राय लोकांचे पाय धरण्याचा व त्यांस वेदांतासारखीं अमूल्य रत्नें पैशावर विकावयाचा प्रसंग न यावा. "

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

"कोणतेंहि कार्य फलाभिसंधिरहित ईश्वरसेवारूपानें केलें असतां त्याचें फल ईश्वर देतो. व सेवा करणाऱ्याची लाज ईश्वरच राखतो. 'मामनुस्मर युद्ध्य च" या श्लोकाचें हेंच तात्पर्य आहे. सारांश, कर्म करण्यास प्रयत्न करावयास नको. कारण तीं प्रारब्धकर्में साहजिकच होणार; परंतु ईशस्मरण मात्र प्रयत्नानें सर्वदा करीत असावें."

पत्र नं. ४ ता. ३०–१२–१५.

"काशीहून प्रथम पुण्यास गेलों. तेथें पुढें येण्याचें साधन माहीत नसल्यामुळें म्हणा किंवा आपला ग्रहयोग म्हणा धन व कीर्ति यांचा मुळींच लाभ झाला नाहीं. तसेंच मुंबईतही, पण येथें त्रास झाला नाहीं. रा. नरसोपंत केळकर यांस आपलें पत्र दिलें, पण त्याविषयीं त्यांची उदासीनता दिसली, कारण, "तुम्हींच भेटावें, माझी येण्याची आवश्यकता नाहीं" असें मला सांगितलें. नंतर दुसऱ्या दिवशीं मी स्वतःच लोकमान्यांना भेटलों. गीतेसंबंधीं भाषण झालें. रहस्याचें एक पुस्तक मला त्यांनीं स्वतः दिलें. तेवढी एक व्यक्ति सोडून बाकीची मंडळी "दुरून डोंगर साजरे" या म्हणीखालींच येतात."

पत्र नं. ५ ता. ६–४–१६.

"कर्तव्य समजून ईश्वरावर पूर्ण विश्वास ठेवून व जन्माची इतिकर्तव्यता येथेंच संपते असेंहि न समजतां कोणतेंहि व्यावहारिक कार्य करीत राहिल्यानें चित्तास उद्वेग व अपयशाचें भय वाटणार नाहीं. म्हणून हितेच्छुस्व ओळखून त्यांच्याशीं वागावें."

पत्र नं. ६ ता. २२–१–१६.

"श्रीहरि ज्या स्थितींत ठेवील त्यांत आनंदच आहे."

"केव्हांहि सद्वासनेचें उत्तम फळ मिळणार, लौकिकदृष्ट्या आपलीं अनेक कर्तव्यें आहेत, पण संतांच्या मतानें व खरा विचार केला असतां, भगवच्चिंतन हेंच मुख्य कर्तव्य ठरतें. तें कोणत्याहि स्थितींत विसरूं नये असें नाथादिक सत्पुरुष सांगतात."

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पत्र नं. ७ ता. २९-५-३०.

" आजपर्यंतचें माझें आयुष्य कोणाचाहि नोकर न म्हणवितां गेलें. आतां उत्तरार्धांत डाग लावून घेण्याची माझी इच्छा नाहीं."

" आपल्याविषयीं मित्र या नात्यानें वाटलें तें लिहितों. मालवीय अस्थिर वृत्तीचे व कृतीचे आहेत, केव्हां दोषारोप करून काढतील याचें प्रमाण नाहीं असा अनुभव बऱ्याच लोकांना आहे. हातचें सोडून पळत्याच्या मागें लागण्यासारखें होईल. अस्पृश्योद्धार, शुद्धि, विधवाविवाह वगैरे आधुनिक धर्माभिमानी मालवीय आहेत. तोच उपदेश धर्मोपदेशकांस करावा लागेल. हा धर्म आपल्या परमपूज्य पंडितजीप्रभृति गुरुजनांना संमत नाहीं आणि त्यांच्या इच्छेविरुद्ध कोणतीहि गोष्ट करणें श्रेयस्कर नाहीं. म्हणून तुम्ही त्या भानगडींत पडूं नये अशी माझी इच्छा आहे."

पत्र नं. ८ ता. १६-९-३२.

आलेल्या परिस्थितीस आनंदानें तोंड देऊन संचिताचें कौतुक करतांना तिचेबद्दल हर्षविषाद मानण्यास सवडच नाहीं. सिनेमांतील चित्रपटावरील प्रसंगांना जेवढी किंमत तेवढीच संसाराला."

पत्र नं. ९. हें पत्र सर्वांत जुनें. काशी ४-२-१९१०.

" प्रियमित्र, आपलें पत्र पावलें. संकल्पविकल्प हेंच मनाचें रूप असल्यामुळें त्याबद्दल त्यास शांतता येणार कोठून? आली तरी तिची विश्रांति होण्यास येथील कोणतीही साधनें कारण नसून केवळ आपल्याकडील उत्तर हेंच कारण होय.

आपण आपल्याविषयीं जें लिहिलें कीं, "आम्ही मात्र संसारतापानें होरपळावें" तें व्यर्थ आहे. तुम्ही आम्हापेक्षांही धन्य आहांत. कारण आपण दूर असल्यामुळें आपल्या हृदयांत स्मरणरूपी अमृताची नदी सतत वहात आहे. अशा नदींत स्नान करणाऱ्यास संसारतापाचा संभवच नाहीं. चवदा वर्षें जरी लक्ष्मण रामचंद्राबरोबर होता, तथापि लक्ष्मणापेक्षांही भरताचें प्रेम विलक्षणच होतें. गुरुही म्हणाला कीं, लक्ष्मणापेक्षां भरत धन्य आहे.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

आम्ही भागीरथीच्या तटीं राहूनही दिवसांतून एकदादेखील तिचें स्मरण करीत नाहीं. उलट तिचा पदोपदीं अपमान मात्र करीत आहोंत. हजारों कोसांवर कुग्रामांत राहणारे लोक इच्या दर्शनाकरितां रात्रंदिवस मनांत तिचें स्मरण करीत असतात ते आमच्यापेक्षां धन्य नव्हत का?

श्रीकृष्णानें गोपींस आपण मथुरेस राहण्याचें कारण हेंच लिहिलें कीं, 'यत्वहं भवतीनां वै दूरे वर्ते प्रियो दृशाम्। मनसः सन्निकर्षार्थं मदनुध्यानकाम्यया ॥ यथा दूरचरे प्रेष्ठे मन आविश्य वर्तते। न तथा रमते चेतः सन्निकृष्टेऽक्षगोचरे ॥' भगवद्विरहानें भगवंताचें रात्रंदिवस स्मरण करणाऱ्या गोपी यादवापेक्षांही धन्य होत. उद्धव म्हणाला कीं, "वन्दे नन्दव्रजस्त्रीणां पादरेणुमभीक्ष्णशः" म्हणून आपण आम्हांपेक्षांही धन्य आहांत.

द्वितीयेची उत्प्रेक्षा आपल्यास दुःख व्हावें या हेतूनें केली नसून केवळ विनोदानें केली होती. त्याबद्दल खेद करणें व्यर्थ आहे. वस्तुतः विचार केला असतां खेद करण्यास जागाच नाहीं. कारण अविद्येपासून उत्पन्न झालेल्या विषयांस जर कधीं सत्यता व सुखरूपता असती तर त्यांसंबंधानें दुःख किंवा सुख मानणें ठीक आहे. बीजच जर दुःखरूप तर त्याचीं फळें सुखरूप कशीं असणार? "ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते। आद्यन्तवन्तः कौन्तेय न तेषु रमते बुधः" असे विद्युल्लतेप्रमाणें चंचल व पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें नश्वर विषय प्राप्त झाले म्हणून त्या योगानें विद्वान् पुरुष सुखी होत नाहीं व ते प्राप्त झाले नाहींत म्हणून दुःखीही होत नाहीं. स्वप्नांमधील प्राप्त झालेल्या राज्याबद्दल सुख तें काय व स्वप्नांतील राज्य गेलें म्हणून दुःख तें काय? आपल्यापेक्षां अतिशय बाह्य अशा दुःखरूप विषयांचा अभिमान घेऊन आपण सुखरूप असतांना व्यर्थ दुःखी होऊन बसणें यास काय म्हणावें? दुःखामध्यें दिवस न काढितां विचारसुखामध्यें मोठे लोक दिवस काढीत असतात."

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पत्र नं. १०.

हें पत्र अगदीं ताजें आहे; पुणें ता. ८–९–३९

"आतांच चि. रामचंद्राचें पत्र आलें. त्यांत रामा भागवताकडून राजगृहीं गणेशोत्सवाप्रीत्यर्थ निमंत्रण येणार आहे असा आपला निरोप आला असें लिहिलें आहे. म्हणून मी आपलें मत अगोदरच आपणांला कळवीत आहें.

प्रथम मला हें कबूल करावें लागेल कीं, राजगृहीं प्रवचन होण्याइतका मी मोठा नाहीं. निमंत्रण येण्याचा जो संभव आहे तो केवळ मजविषयीं आपलें जें अकृत्रिम प्रेम आहे त्याचा तो परिणाम आहे. यांत संशयच नाहीं. खरोखरीच जर निमंत्रण यावयाचें असेल तर, श्रीहरीनें माझी परीक्षाच पहावयाचें ठरविलें आहे असेंच मी म्हणेन. कारण आजच ता. ८ च्या 'केसरीं' त माझी 'नम्र विनंति' प्रसिद्ध झाली आहे ती आपण वाचलीच असेल आणि आजच चि. रामचंद्राचें पत्रांत निमंत्रणाचा मजकूर वाचला या योगानें तर मी थक्कच झालों. प्रवचनाचे श्रम जास्त होत असल्यामुळें येथील व बाहेरगांवचीं टिळक व जुन्या पंचांगाप्रमाणें होणाऱ्या गणेशोत्सवांचीं अनेक निमंत्रणें आलीं तीं सर्वच नाकारलीं. उभयपक्षीं पोस्ट खर्च पडूं नये म्हणून शेवटीं आजच 'केसरीं' त 'बोलवूं नका' अशी जाहीर विनंति केली. आतां ग्वाल्हेरचें राजगृहाचें निमंत्रण स्वीकारलें तर मी तत्वनिष्ठ नसून लोभी आहें असें ठरणार आहे. गरीबांना दूर सारून राजाला मान दिल्यामुळें मजवर असलेली सज्जनांची निष्ठा पार नाहींशी होईल. इतकेंच नव्हे तर हें शल्य माझ्या हृदयाला जन्मभर टोंचत राहील म्हणून आतां निमंत्रण स्वीकारतां येणार नाहीं. करितां निमंत्रण येण्याचे अगोदरच आपण निमंत्रण न पाठविण्याची व्यवस्था करावी. म्हणजे राजगृहाचाही मजकडून अपमान होणार नाहीं. अनेक प्रलोभनें दाखवून श्रीहरीनें माझ्यासारख्या अशक्ताला तत्वभ्रष्ट करूं नये अशी त्याचे चरणाजवळ माझी नम्र प्रार्थना आहे. आणि माझें हें व्रत चालवून माझें रक्षण करावें अशी आपणांला नम्र विनंति आहे."

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ह्या दोन पत्रांत जवळ जवळ तीस वर्षांचें अंतर आहे. पहिलें पत्र विसावे वर्षीं तर शेवटचें एकावन्नावे वर्षीं लिहिलें आहे. पहिल्यांत पुढील विशाल फलभरित वृक्षाचे अंकुर दिसतात तर, शेवटल्यांत त्याचीं सुंदर फळें चाखावयास मिळतात.

या एकंदर उताऱ्यांवरून शास्त्रीबोवांची ईश्वरनिष्ठा, धर्मश्रद्धा, स्वतंत्र वृत्ति, निस्पृहता इत्यादि गुणांचा विकास कसा होत गेला याची कल्पना येईल. त्यांचेबरोबर लिहिण्याचा, वाचण्याचा, प्रवासाचा, गप्पा मारण्याचा, खासगी सार्वजनिक काम करण्याचा असे कितीतरी प्रसंग आलेले आठवतात. अगदीं अल्पवयांत आपल्यापेक्षां तिप्पट वयाच्या अनुभवी विद्वान अशा गृहस्थ व संन्याशांना आपलेसें करून त्यांच्यांत समरस होऊन जाण्याची कला किंवा योग्यता शास्त्रीबोवांचे ठिकाणीं अपूर्व आहे. माझे परमपूज्य प्रोफेसर गुरुवर्य पाटणकर यांचा शास्त्रीबोवांशीं फार लोभ होता. याचें खरें कारण म्हणजे अगदीं अल्पवयांतसुद्धां त्यांच्या ठिकाणीं जन्मतःच उगम पावलेल्या पवित्र विचारांच्या गंगेचा अखंड प्रवाह हें होय. यामुळेंच त्यांना आपल्यापेक्षा अधिक वयाच्या, जास्त अनुभवाच्या नव्या व जुन्या पंडितांच्या सहवासाची आवड असे व तेहि त्यांना आपल्याच पैकीं एक समजत. पुढील आयुष्यांतील त्यांचे अनुभव व माहिती स्वतः त्यांचेकडून व त्यांच्या मोठमोठ्या मित्रांकडून व चाहत्यांकडून आपणांस मिळालीच असेल.

विश्वनाथशास्त्री द्रविड.
( M. A. संस्कृत प्रोफेसर )

नागपुर. ३०—११—३९

## व्यक्तिदर्शन

"गु. पं. भाऊशास्त्री वझे यांचें आत्मचरित्र प्रसिद्ध होण्याचा योग येणें व त्यांत दोन शब्द लिहिण्याचा प्रसंग येणें ही गोष्ट माझ्या दृष्टीनें जशी भाग्याची तशीच आनंदाचीही आहे. रा. दाते यांनीं हा सुयोग आणून दिला त्याबद्दल त्यांचे आभार मानावे तितके थोडेच आहेत. भागानगर

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

निःशस्त्रप्रतिकाराच्या संग्रामांत वांट्याला आलेला कारावास संपवून या वर्षीच्या जुलै महिन्याच्या शेवटच्या आठवड्यांत मी पुण्याला गेलों असतांना शास्त्रीबुवा तेथें असल्याची बातमी मला समजली. कारागृहांत जाण्यापूर्वी मी त्यांचा आशीर्वाद घेतला होता. आल्यानंतरही तोच प्रेमळ आशीर्वाद मिळावा म्हणून मी त्यांना भेटावयास गेलों. त्या वेळीं इतर अनेक गोष्टींबरोबर सहजच आत्मचरित्राच्याही गोष्टी निघाल्या. व तेथेंच आत्मचरित्राच्या एकदोन प्रकरणांवरून मला दृष्टि फिरविण्याचीही संधि मिळाली. वेदस्तुतीवर नागपूरला झालेलीं त्यांचीं प्रवचनें पुस्तकरूपानें प्रसिद्ध व्हावीं अशी इच्छा बाळगणाऱ्यांमध्यें मीही एक होतों. पण शास्त्रीबुवा आत्मचरित्र लिहीत असतील ही कल्पना निदान मी तुरुंगांत जाईपर्यंत म्हणजे एप्रिल महिन्यापर्यंत तरी मला नव्हतीच. पण तें हस्तलिखित प्रत्यक्ष पाहण्याचा योग आल्यावर शक्य झालीं तींच प्रकरणें मी किती अधाशीपणानें वाचलीं असतील हें माझें मलाच माहीत. कारण शास्त्रीबुवांचें आत्मचरित्र म्हणजे काशीच्या विद्यापीठांतील परंपरागत पांडित्याचा इतिहास, मानवी मनाच्या निरनिराळ्या भागांचें विश्लेषणात्मक पृथक्करण, जगाच्या अनुभवाचा चालताबोलता सांठाच होय.

माझा व शास्त्रीबुवांचा संबंध माझ्या एकट्या व्यक्तीपुरताच नसून तो आमच्या सर्व कुटुंबाचा आहे. माझे वडील बंधु आहिताग्नि विश्वनाथशास्त्री हरदास हे प्रथम त्यांचे मित्र व नंतर शिष्य झाले. स्वतः मी त्यांचा शिष्यच आहें. माझे बंधु त्यांचेजवळ वेदांतसूत्रें व उपनिषदें शिकले. मी त्यांचेबरोबर साहित्यादि इतर शास्त्रेंहि शिकलों. पण निव्वळ गुरुशिष्यसंबंधापुरतेंच हें नातें राहिलें नसून त्यांचें माझ्यावर अपत्यवत् प्रेम आहे—नव्हे आमच्या कुटुंबांतील प्रसंगविशेषीं कान धरण्याचा अधिकार असलेला व प्रसंगीं पोटाशीं धरून ममता करणारा असा श्रेष्ठ पुरुष म्हणून आम्ही त्यांना मानतों.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्यांच्या जवळ शिकत असतांना त्यांच्या शिकविण्यासंबंधीं [illegible] आतुर-

तेचा व प्रेमाचा मला अनेकवार अनुभव आला. शिकवितांना त्यांनीं जवळ कधीं पुस्तक घेतल्याचें मला आठवत नाहीं. भामतीसारखा कठिण ग्रंथ. पण आम्ही पंक्ति वाचतों न वाचतों तोंच त्यांनीं त्यांची सहज लीलेनें फोड करून दाखवावी. 'आचार्यपरीक्षेच्या वेळीं त्यांनीं मला जें शिकविलें त्याची मी आवृत्ति सुद्धां न करतां मला परीक्षेंत उत्तीर्ण होतां आलें. फार काय, पण जें त्यांनीं शिकाविलें आहे तें अजूनही डोळ्यांसमोर चित्र काढल्याप्रमाणें उभें राहतें. जी प्रवचनांत रसाळपणाची लयलूट तीच शिकविण्यांतही. शिकवितांना शास्त्रीबुवा रागावत. पण ते फक्त आम्हां शिष्यांच्या अनियमितपणालाच काय ते. आम्ही अनुपस्थित असलों तर ते चौकशी करीत असत. पण वाटेल त्या वेळीं–अवेळीं सुद्धां त्यांच्या शिणलेल्या मनाला आम्हीं प्रश्न विचारण्याचा हवा तो त्रास दिला. तरी ते कधीं कंटाळले आहेत असें झालेंच नाहीं.

आजवर शास्त्रीबुवांचा पुष्कळ व्यक्तींशीं संबंध आला. पण कित्येक व्यक्तींचा त्यांच्याकडे पाहण्याचा दृष्टिकोण, त्यांचें व्यक्तित्व समजावून घेण्या-ऐवजीं त्यांच्यावर स्वतःची कांहीं तरी छाप पाडावी अशा प्रकारचा अस-ल्यामुळें कित्येक लोकांनीं त्यांच्यासंबंधीं निष्कारण गैरसमज करून घेतलेले आहेत. शास्त्रीबुवांचें एका शब्दांत वर्णन करावयाचें झाल्यास मी एका निराळ्या अर्थानें आर्ष प्रकृति या शब्दांत करीन. आर्ष म्हणजे रूक्ष नव्हे. जुन्या वैदिक काळांतील तपस्वी ऋषींसारखी त्यांची प्रकृति आहे. म्हणजे त्यांना अप्रामाणिकपणा कधीं खपत नाहीं. कारण ते स्वतः अत्यंत प्रामाणिक आहेत. आंतल्या गांठीचीं कावेबाज माणसें त्यांना क्षणभरही नको असतात. कारण ज्याला आपलें म्हटलें त्याच्याशीं त्यांनीं स्वप्नांतही कपट केलेलें नाहीं. मैत्रीचें सोंग व प्रेमाचें ढोंग त्यांना नको असतें. कारण असली बता-वणीची वर्तणूक त्यांनीं कधींही केलेली नाहीं. अनियमितपणा त्यांना अगदीं आवडत नाहीं. कारण ते स्वतः अत्यंत नियमित आहेत. तात्पर्य, स्वतः त्यांचीं तत्त्वें व वर्तणूक अत्यंत शुद्ध असल्यामुळें एखाद्या प्राचीन कर्म-

CC-0 Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

योग्याप्रमाणेंच अन्यायाबद्दल सहनशीलता व दुष्प्रवृत्तीबद्दल कानाडोळा करणें या गोष्टी त्यांना साधत नाहींत. मला वाटतें केवळ याचमुळें या लबाड जगांत त्यांना चांगले अनुभव फार थोडे आले. त्यांच्याबद्दल गैरसमज करून घेऊन स्वतःशींच फुरगटून बसलेल्या ज्या अनेक व्यक्तींशीं माझा थोडाबहुत संबंध आला त्याचें याहून दुसरें कांहींच तात्पर्य निघूं शकत नाहीं. प्रत्यक्ष नांवें घेणें शिष्टाचाराला सोडून असल्यामुळें तीं वगळून यावर प्रकाश पाडणारी एक घटनाच काय ती येथें देतों. नागपूरला आमच्या घरीं एकदां एका शास्त्री-महाशयांचें प्रवचन झालें. कांहीं मंडळींच्या नसत्या आग्रहावरूनच या भानगडींत आम्हांला पडणें भाग पडलें होतें. प्रवचनकार काय बोलत होते हें त्यांचें त्यांना कदाचित् कळत असेल, पण श्रोत्यांना मात्र खास समजत नव्हतें. होतां होतां "शंकराचार्यांनी पळवाट काढली व टिळकांना तर कांहींच समजलें नाहीं" अशीं वाक्यें त्यांच्या तोंडून निघालीं. श्रोते मंडळींत भाऊ-शास्त्रीहि होते. या वाक्यांनीं मात्र पूज्यपाद आचार्यांचा जाज्वल्य अभिमान असणाऱ्या त्यांच्या सहनशीलतेची तार तुटली व व्याजस्तुतीनें पण प्रवचन आटोपल्यावर अत्यंत सभ्य भाषेंत त्यांनीं या प्रकाराचा निषेध केला. लगेच त्यामुळें रागावलेल्या कांहीं अहंमन्य शिष्टांचा "वझेशास्त्र्यांचें अनौचित्य" म्हणून महाराष्ट्रांत लेख झळकला. अनौचित्य होतें यांत शंकाच नाहीं. पण तें प्रवचनकारांचें, लेखकांचें कीं त्यांच्या प्रोत्साहकांचें एवढाच प्रश्न आहे! शास्त्रीबुवांनीं स्वतः कधीं पूज्य व्यक्तीची टवाळी केली नाहीं म्हणूनच ती कुणी केलेली त्यांना खपावयाची नाहीं. यालाच मी आर्ष अथवा ऋषींची स्वभावरचना म्हणतों. त्यांच्या व्यक्तित्वाचें विश्लेषण असेंच करतां येईल.

शास्त्रीबुवांचें सार्वजनिक आयुष्य सर्वांच्या समोर आहे, त्यांचीं रसाळ व उद्बोधक प्रवचनें सर्वांच्या परिचयाचीं आहेत. दिवटीनें सूर्यप्रकाश दाखवावा त्याप्रमाणें मी त्यासंबंधीं लिहिणें अनावश्यक आहे. पण मोठ्या माणसांच्या लहान गोष्टीहि अत्यंत चित्तवेधक असतात. मनुष्याच्या सार्वजनिक आयुष्यांत त्यांच्या कांहीं उत्कट गुणांचाच काय तो परिचय होतो. कारण

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

असे कांहीं उत्कट गुण असल्याशिवाय मनुष्य मोठा होऊं शकत नाहीं. शास्त्रीबुवांचे हे उत्कट गुण जगासमोर आहेत. मोडकळीस आलेली प्रवचन-संस्था उदयास आणून तिला ज्ञानयज्ञाचें पवित्र उज्ज्वल स्वरूप त्यांनी प्राप्त करून दिलें यांतच त्यांचें अलौकिकत्व आहे. पण त्यांचा मार्मिक-पणा, सहृदयत्व इत्यादि गुण त्यांच्या खाजगी आयुष्यांतच चांगले प्रतीत होतात. दोन्ही डगरींवर हात ठेवून वागणाऱ्या मनुष्याला 'उभयान्वयी-अव्यय, मानलेल्या मुलाला 'पुत्रीकृतोऽसौ वृषभध्वजेन' तर एखाद्या हट्टी मुलीला 'देवयानी' अशीं ते गमतीनें नांवें देतात. भागवतांतील कृष्ण-चारित्र सांगतांना डोळ्यांवाटे अश्रुपात चालणारे शास्त्रीबुवा, भरतभेटीच्या वेळीं हजारों श्रोत्यांना रडविणारे शास्त्रीबुवा व कर्णवधाच्या वेळीं संताप-लेले शास्त्रीबुवा एकच आहेत असें पाहून त्यांच्याविषयीं धन्यता वाटते. वाटेल त्या रसांत तन्मय होऊन ते हवा तो ग्रंथ तितक्याच रसाळपणानें सांगूं शकतात. त्यांची प्रतिभा ग्रंथानुगामी रसनिबद्ध नाहीं हें त्यांच्या वक्तृत्वाचें वैशिष्ट्य होय. त्यांची काव्यशक्तिहि विलक्षण आहे. साहित्य-शास्त्र शिकवीत असतां क्वचित् ते स्वतः श्लोक तयार करून रसाचें व ध्वनीचें स्वरूप स्पष्ट करीत. ते प्रसंग मला उत्कटतेनें आठवतात."

( साहित्याचार्य ) बाळ व्यंकटेश हरदास, दक्षिणामूर्ति.

नागपुर. २-१२-३९

"वे. शा. सं. गुरुवर्य भाऊशास्त्री वझे महाराज यांनीं मला पाजलेलें उपदेशामृत मी या जन्मांत विसरणार नाहीं. नागपूर मुक्कामीं चवदा वर्षे प्रवचन ऐकून सहवास केला. मनुष्यदेहांत गृहस्थाश्रमांत राहून मुमुक्षूंनीं परमार्थ कसा साधावा हें ज्ञान नागपूरचे जनतेस पाजलें आहे. शास्त्रीमहा-राजांचे गैरहजेरींत नागपूर ओसाड भासतें. नागपूर मुक्कामीं शास्त्री पंडित आहेत व शास्त्रीमहाराजांचा मत्सरही ते करतात; पण सकाळीं वेदांत प्रव-चन करून त्यांची रिकामी झालेली जागा कोणीही भरून काढीत नाहीं.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

## महाराजांच्या सहवासांतील कांहीं आठवणी

एके दिवशीं शास्त्रीमहाराजांनीं स्वतः मला "जालंदर बंध" करून दाखविला; तो प्रयोग आणि प्राणायामविधि अजून माझ्या डोळ्यासमोर खेळत आहे. तोंडांनीं सांगणारे पुष्कळ आहेत पण स्वतः कृति करून अनुभव घेऊन सांगणारे शास्त्रीमहाराज आहेत.

नागपूर मुक्कामीं जी मिळकत शास्त्रीमहाराजांना झाली त्यांतील अपूर्व गोष्ट म्हणजे महाराजांनीं माझे पुराणाची समाप्ती अमुक दिवशीं आहे किंवा मला श्रोत्यांनीं कांहीं द्यावें असें कधींच म्हटलें नाहीं. परंतु लक्ष्मीपतीची महाराजांवर कृपा असल्यामुळें नको नको, पुरे पुरे म्हणत असतांना श्री त्यांचे मागें कशी धावत येते हा मला पूर्ण अनुभव आहे.

नागपूर मुक्कामीं शास्त्रीमहाराजांनीं उपनिषदें, गीता, भागवत, शतश्लोकी, सनत्सुजातभाष्य, वेदस्तुति सकाळीं सांगितली. शिवाय रात्रीं रामायण, भारत वगैरे ग्रंथ सांगितले. नागपूर म्हणजे अद्वैतवेदांताचें एक क्षेत्रच त्यांनीं निर्माण करून ठेविलें आहे. ब्रह्मनिरूपण ऐकण्याची लालसा श्रोत्यांत उत्पन्न केली. शास्त्रीबुवांना ईश्वराची अशी अद्भुत देणगी आहे कीं, कोणत्याही वेळेस कोणताही विषय सांगितल्यास तो तात्काळ उत्तम रीतीनें सांगण्याची त्यांची तयारी असते.

एक दिवसाची शास्त्रीबुवांची गैरहजेरी म्हणजे एक वर्षाचा भास होतो. शास्त्रीबुवांकडे कोणी कोणत्याही रूपानें येवो व प्रश्न करो त्याची शंका निरसन करून देण्यास ते कधींच आळस करीत नाहींत. मोठ्या प्रेमानें व विनयानें त्याला खूष करून व समाधान करून पाठवितात. यामुळें त्यांच्या प्रकृतीवर बराच परिणाम झाला आहे, पण त्याची फिकीर न करतां त्यांनीं आपलें विद्यादानाचें औदार्य कायम ठेविलें आहे. आपल्या शारीरिक व मानसिक पीडेबद्दल त्यांनीं कोणाजवळहि आपणहोऊन शब्द देखील काढलेला मला आठवत नाहीं. स्वतःच्या प्रकृतीची विकृति त्यांना कळून येतांच ते स्वतःच्या बुद्धीनेंच औषधोपचार करतात. कोणी आग्रह केला तर ते दुसऱ्याकडूनही उपचार करून घेतात.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

एकटे राहण्याचा प्रसंग त्यांना नेहमीं येतो, पण एकांतवास व एकाग्र चित्त करण्याचा त्यांचा अभ्यास त्यांना अंगवळणीं पडल्यामुळें "बोले तैसा चाले" हीं कडकडीत वैराग्याचीं लक्षणें त्यांचे ज्ञानोत्तर भक्तीस आणि तपश्चर्येस उपयोगी पडलीं आहेत.

शास्त्रीमहाराज आपण होऊन कोणाच्या वाटेस गेलेले मला आठवत नाहीं पण विनाकारण त्यांचे वाटेस कोणी गेला तर तो कितीही मोठा असला तरी ते क्षमाही करीत नाहींत. ज्या मठांत महाराज उपनिषदें सांगत होते तो डोकीबुवांचा मठ, त्याच्या मालकानें डॉ. कुर्तकोटीस्वामींना अर्पण केला होता. त्या वेळेस ते शंकराचार्यांच्या गादीवर होते. एके वेळीं कुर्तकोटी त्याच मठांत असतांना महाराजांचें ईश्वरासिद्धीवर प्रवचन चालू होतें. प्रवचन ऐकण्यास कुर्तकोटी आले होते. प्रवचनाचे शेवटीं शास्त्री-बुवांनीं विनयानें म्हटलें कीं "आपल्या पीठाचा मी शिष्य आहें. आपलीच प्रवचनरूपानें सेवा करीत आहें." हें ऐकतांच डॉ. कुर्तकोटी म्हणाले कीं, "तुम्ही चुकीचें सांगत आहांत" इतकें ऐकतांच शास्त्रीमहाराज म्हणाले कीं, "माझी चूक दाखवून द्यावी." स्वामींना चूक दाखवितां येईना पण त्यांनीं कांहींतरी बोलण्यास आरंभ केला. मग काय विचारतां, महाराज भयंकर रागावले व वादाचा आरंभ झाला. त्या दिवशीं तो वाद तसाच श्रोत्यांच्या विनंतीनें थांबविण्यांत आला. दुसरे दिवशीं पुनः महा-राजांनीं स्वामींना घेरून चूक दाखविण्याबद्दल हट्टच धरला. शेवटीं कुर्त-कोटींनीं तुम्ही चकीचें सांगितलें नाहीं असें कबूल केलें; पण "जास्त स्पष्टीकरण करावयास पाहिजे होतें" असें म्हणाले. त्यावर शास्त्रीमहाराज म्हणाले कीं, "मला स्पष्टीकरण करतां आलें नाहीं" हें मी कबूल करतो पण 'चुकीचें सांगितलें' हें मात्र मला सहन होणार नाहीं. कारण चुकीचें सांगून मी लोकांची वंचना करतों या आरोपाचें मला फार दुःख होतें." अशा रीतीनें हा वाद संपला. तेव्हांपासून डॉ. कुर्तकोटी नागपुरांत फारसे आले नाहींत व पुढें लौकरच तो मठ त्यांच्या हातून काढून घेण्यांत आला.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

हिंदुमुसलमानांच्या दंग्यांत अंदाजानें तीनचारशें रुपये दिले. टिळक पुतळ्यास ५१ रुपये व अनेक लहानसहान देणग्या देऊन सर्वांनाच त्यांनीं ऋणी करून ठेविलें आहे. ज्ञानाची देणगी त्यांनीं इतकी दिली आहे कीं तीपासून उत्तीर्ण होणें अशक्यच आहे. शारदाबिल पास होतांच स्वपराक्रमानें मिळविलेली महामहोपाध्यायाची पदवी त्यांनीं गवताप्रमाणें फेंकून दिली व बिलाविरुद्ध भयंकर चळवळ केली. " आधी केलें मग सांगीतलें " ही गोष्ट त्यांनीं प्रत्यक्ष करून दाखविली. नागपुरकर शास्त्री पुराणिक, मंडळींनी मत्सरानें त्यांचेवर अनेक आरोप करून त्यांचा छळ केला; पण त्य नीं आपल्या गांभीर्य, विद्या, विनय, प्रसंगावधान, चातुर्य, धैर्य व लोकप्रियता या सर्व गुणांच्या योगानें प्रत्येक प्रसंगास तोंड देऊन आपलें स्थान कायम ठेविलें."

गणपतराव नारायण ( रॉली ब्रदर्स ).

नागपुर २–१२–३९

"मला वाटतें माझा व शास्त्रीबोवांचा परिचय कमींत कमी १२ वर्षांचा तरी आहे. शास्त्रीबुवा आमच्यांत बसत व ते वेळीं आपली भूमिका संभाळून प्रेमळपणानें वार्तालाप करीत."

शास्त्रीबोवा नेहमीं म्हणावयाचे कीं, मी प्रवचनास येतांनाच काय सांगावयाचें याचें मनन करीत असतों व तेंच खरेंही असावें. कारण ते येतांना अगदींच कोणाशीं न बोलतां रस्त्याच्या एका बाजूनें चालत येत असत. परततांना त्यांच्या मागें कांहीं मंडळींचा घोळका असावयाचा. पण माझ्यासारखा त्यांचा स्नेही सांपडला म्हणजे तेवढ्याही घोळक्यांतून बाजूला होऊन माझ्या खांद्यावर थाप मारीत. कधीं कधीं शास्त्रीबुवांबरोबर मला जेवावयाची हौस यावयाची. तेव्हां ते मजकडे जेवावयास येत. शास्त्रीबोवा मानधन आहेत. त्यांना त्यांची अवास्तव स्तुति आवडत नाहीं, तसाच त्यांना अपमानही खपत नाही. तथापि त्यांची वृत्ति मात्र आनंदी असते. शास्त्रीबोवांना पैसा कधीं कमी पडला नाहीं. पण तो सर्व त्यांनीं मान राखून

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मिळविला. शास्त्रीबुवांना येथें कांहीं हितशत्रु निर्माण झाले होते. परंतु शास्त्रीबुवांची लोकप्रियता एवढी दांडगी कीं, त्यांच्यापासून त्यांना केव्हांच उपसर्ग पोहोंचला नाहीं. विरोधी लोक मात्र बापडे एकाकी पडले.

शास्त्रीबोवा नागपुरास येण्यापूर्वी फार झालें तर भागवतापर्यंत येथील पुराणिकांची मजल जात असे. येथील एकाही प्रवचनकारानें शास्त्रीबोवांच्या आगमनापूर्वी भगवद्गीतादेखील सांगितली नव्हती. किंबहुना ४–५ शें लोक प्रवचनास जमणें ही गोष्टच नागपुरकरांस माहीत नव्हती. १०।१२ वर्षें सतत ३।३ शें लोक शहराच्या निरनिराळ्या भागांतून एकत्रित होणें निदान या अश्रद्धेच्या काळांत अपूर्व होय. ५० वर्षांपूर्वी एक भारताचार्य म्हणून नागपुरास आले होते. त्यांच्या मागें तेवढे कांहीं लोक लागले. त्यानंतर शास्त्रीबोवांचें प्रवचन हीच गोष्ट पुनरावृत्त झाली. उपनिषदें ही काय वस्तु आहे हें तर सामान्य माणसाला माहीतच नव्हतें. फक्त गृहस्थाश्रमी संत मोतीबोवा जामदार नेमक्या श्रोत्यांसमोर उपनिषदें सांगत. शास्त्रीबोवांनीं मात्र नवीनच पायंडा पाडला. शास्त्रीबोवा धार्मिकेतर पीठावर कधींच बोललेले मला आठवत नाहीं. हिंदुमुलींच्या शाळेला शास्त्रीबुवांनीं एक २५ रु. चें घड्याळ बक्षीस दिले आहे. शास्त्रीबोवा कोणत्याही संस्थेशीं सहसा संबंध ठेवीत नाहींत.

शास्त्रीबोवांच्या कोट्या, समर्पक दृष्टांत, उपमा, साधी पण अलंकारिक भाषा, विषयविश्लेषण, आंग्लविद्येची फारशी जोड नसतां प्रचलित विषयांविषयींची त्यांची दृष्टि, सनातन तत्त्वांचा त्यांचा अभिमान, श्रोत्यांचें मन आकर्षून घेण्याची बुद्धीची तीव्रता, प्रेमळ व विनोदी स्वभाव, प्रसंगावधान वगैरे गुण वाखाणण्यासारखे आहेत. माझ्या माहितीप्रमाणें शास्त्रीबोवांच्या उपदेशानें कित्येकांत आध्यात्मिक बदल झाला आहे. परंतु विद्वत्तेबरोबर शास्त्रीबोवांस तपोबल लाभलें तर अधिक जीव कृतार्थ होतील."

के. गो. लांडगे, ( B. A. L. L B. )
( मॅनेजर, सी. पी. कॉ. को. बँक )

SRI JAGADGURU VISHWARADHYA
JNANA SIMHASAN JNANAMANDIR
LIBRARY
Jangamawadi Math, Varanasi
CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

